भारत-गौरव-ग्रंथमाला

पुष्प १९ वें

# स्वप्नमय आयुष्य



न हि ज्ञानेन सदृशं पवित्रमिह विद्यते

—भगवान् श्रीकृष्ण

लेखक :

प्रभाकर

द्वितीयावृत्ति

कापडी बांधणी ] १९३६ [ किंमत एक रुपया

# प्रास्ताविक

ही कादंबरी १९१६ सालीं मालेंतून प्रथम प्रसिद्ध झाली. मालेचीं जीं लोकप्रिय पुस्तकें आहेत व ज्यांना नेहमीं मागणी असते अशांपैकींच हीहि एक आहे.

ही लोकप्रिय कादंबरी आज बरींच वर्षें दुर्मिळ होती आणि ती पुनर्मुद्रित करावी असा लोकांचा सारखा आग्रह चालू होता. पण तिचें प्रकाशन मात्र अपेक्षेच्या मानानें लांबत चाललें होतें.

शेवटीं नवसाहित्यमालेचें तृतीय पुष्प म्हणून ती छापली जात असतांना मालेकरितां म्हणून मुद्दाम चांगल्या कागदावर तिच्या कांहीं प्रती छापून घेऊन त्यांची मजबूत कापडी बांधणी करवून घेण्यांत आली आहे. पूर्वींप्रमाणेंच लोकांकडून तिचें स्वागत केलें जाईल असा भरंवसा आहे.

**प्रकाशक**

# स्वप्नमय आयुष्य

## प्रकरण पहिलें

## निर्झराचें स्वर्गीय संगीत

सृष्टिरूपी आंथरलेल्या पटावर ज्या नानाविध वस्तु परमेश्वरानें ठेवल्या आहेत, त्यांतल्या कांहीं सौंदर्यानें, तर कांहीं विशिष्ट आकारानें, कांहीं अद्भुततेनें, तर कांहीं भीषणतेनें लोकांचीं मनें आपापल्याकडे आकर्षण करीत असतात. परंतु सौंदर्य, अद्भुतता, भीषणता किंवा विशिष्ट आकार यांत मनुष्याचें मन आकर्षण करण्याची कितीहि शक्ति असली, तरी या सर्वापेक्षांहि ज्या वस्तूच्या दर्शनानें अंतःकरणांत पवित्र, उदात्त व असेच अनेक उच्च विचार उत्पन्न होतात, ती वस्तु कितीहि क्षुद्र व अगदीं साधारण असली, तरी त्या वस्तूचें महत्त्व प्रत्येकास फार वाटतें. सर्व महाराष्ट्रभर पसरलेल्या सह्याद्रीसंबंधानें देखील असेंच म्हणतां येईल. इटलींतल्या ज्वालामुखींप्रमाणें तो भीषण नाहीं, हिमालयाप्रमाणें तो हिमाच्छादित नाहीं, धवलगिरीप्रमाणें सह्याद्रीचीं शिखरें आकाश भेदून वर गेलेलीं नाहींत, मनाला रमविणाऱ्या वृक्षराजींनीं तो शृंगारलेला नाही आणि हरद्वार, केदार किंवा नारायण यांसारखीं प्रसिद्ध स्थळेंहि त्यावर नाहींत, तरी सह्याद्रि एकट्या महाराष्ट्रासच काय, पण साऱ्या हिंदुस्थानास भूषणभूत होऊन राहिला आहे. ह्या पर्वतराज सह्याद्रीचें दर्शन होतांच अंतःकरणांत ज्या अनंत विचारलहरी उत्पन्न होतात, त्या अकल्पनीय होत. त्याची रम्यता, त्याचें विशालत्व, त्याची उंची व लांबी हीं जरी हिमालयापेक्षां पुष्कळ कमी असलीं आणि हिमालयाइतका जरी तो प्रसिद्ध नसला, तरी सह्याद्रि एवढा शब्द उच्चारला कीं, आम्हां महाराष्ट्रियांचें हृदय हलून जातें. मग त्या शब्दांत अशी कोणती जादू सांठविली आहे, तें ईश्वरास माहीत. तिकडे हिमालयानें अमृतोदधि गंगा-यमुना निर्माण करून सर्व जगास लाजविणाऱ्या भारतीय संस्कृतीच्या उत्पादक ऋषींना आपल्या शरीरावर आश्रय दिला, तर इकडे सह्याद्रीनें गोदावरी व कृष्णा या शक्तिमयी नद्यांना जन्म देऊन त्या भारतीय संस्कृतीचें संरक्षण करणाऱ्या मराठे

मावळ्यांना आपल्या शरीरावर खेळविलें ! आणि त्यापूर्वीं त्यानें कांहीं ऋषींना आश्रय दिला नाहीं, असेंहि कांहीं नाहीं. सह्याद्रीचें चांगल्या रीतीनें निरीक्षण करणारांस अजूनहि ऋषींच्या पदकमलांनीं पवित्र झालेल्या अनेक गुहा दृष्टीस पडतात. अर्थात् हिमालय कितीहि विस्तृत असला, कितीहि प्रसिद्ध असला आणि कितीहि आश्चर्य-कारक असला, तरी आम्हां महाराष्ट्रियांना आमचा सह्याद्रीच अधिक महत्त्वाचा वाटावा, यांत अस्वाभाविक असें कांहीं नाहीं. सह्याद्रीवर पाऊल ठेवल्याबरोबर कोणाहि सहृदय महाराष्ट्रियास पर्वताला प्रेमभरानें वंदन करण्याची जी स्फूर्ति उत्पन्न होते, ती अगदीं साहजिक होय. त्याच्या अंतःकरणांत त्या वेळीं अनेक गोष्टींची स्मृति जागृत होते आणि तीमुळें त्याचें हृदय केव्हां हर्षानें गहिंवरून येतें, तर केव्हां तें दुःखानें करपूनहि जातें. अमुक अमुक ऋषि या पर्वतावर रहात होते, या आठवणीनें पर्वताच्या प्रत्यक्ष एकाद्या गुहेजवळ असतां कोणाचें हृदय पवित्र भावानें भरून जाणार नाहीं ? त्या सौख्यसंपन्न दिवसांची आठवण झाली असतां कोणाचें हृदय गहिंवरून जाणार नाहीं ? समर्थ रामदास आपल्या शिष्यमंडळीसह या रस्त्यानें आले असतील, या रस्त्यानें गेले असतील, हें मनांत आल्यावर कोणाच्या डोळ्यांतून आनंदाश्रु पडणार नाहींत ? संतश्रेष्ठ तुकाराम महाराज आपल्या हजारों वारकऱ्यांसह पांडुरंगाच्या नांवाचा जयघोष करीत या रस्त्यानें पालखी घेऊन गेले असतील, ही कल्पना मनांत जागृत झाली, म्हणजे कोणाचें अंतःकरण भक्तीनें ओथंबून जाणार नाहीं ? गो-ब्राह्मणप्रतिपालक छत्रपति शिवाजी महाराज आपल्या मराठे मावळ्यांच्या प्रचंड फौजा घेऊन या घाटानें गेले असतील, त्या घाटानें आले असतील, ही आठ-वण पूर्ववैभवाची इमारत डोळ्यांपुढें उठवून कोणाचें हृदय करपून टाकणार नाहीं ? आणि ठिकठिकाणचे मोडकळीस आलेले किल्ले दृष्टीस पडल्यावर कोणाचें मन उद्विग्न होणार नाहीं ? सारांश, सह्याद्रि हा महाराष्ट्राच्या पूर्वेतिहासाचा स्मृतिस्तंभ आहे. त्याच्यावर जीं सुवर्णाचीं व रक्ताचीं अक्षरें अदृश्यतेनें कोरलीं गेलीं आहेत, तीं अनंत काळ लोटला, तरी कायम आहेत आणि प्रलयकाळापर्यंत हीं भूषणें सह्याद्रि आपल्या अंगावरून केव्हांहि काढून टाकणार नाहीं.

हिमालय सौंदर्यसंपन्न तर खराच; पण आमचा सह्याद्रीहि कांहीं कमी सौंदर्यसंपन्न नाहीं. तो हिमाच्छादित नसल्यामुळें उन्हाळ्यांत कांहींसा रुक्ष दिसतो खरा; पण पावसाळ्याचा एकादा महिना लोटण्याबरोबर तो ज्या अपूर्व वनश्रीनें अलंकृत होतो, तसली वनश्री क्वचितच कोठें दृष्टीस पडण्यासारखी आहे. तसेंच स्वास्थ्यदायक ठिकाणेंहि या पर्वतावर विपुल असल्यामुळें नवीन आगंतुक लोकवस्तीहि अलिकडे

पुष्कळ ठिकाणीं झाली आहे. बोरघाटांतल्या खंडाळा स्टेशनापासून जवळच असलेल्या सोमेश्वर नांवाच्या खेड्याजवळ जो एक लहानसा टुमदार बंगला दृष्टीस पडतो, त्या बंगल्यांतून तर सह्याद्रीच्या एका भागाचें जें अपूर्व सृष्टिसौंदर्य दृष्टीस पडतें, तें अवर्णनीय होय. ज्या जागी हा बगला बांधलेला आहे, त्या जागेवर दृष्टि फेंकतां-क्षणींच बंगला बांधणारा गृहस्थ सृष्टिसौंदर्याचा मोठा भोक्ता असावा, असें सहज लक्षांत येतें, आणि खरोखर त्या गृहस्थाचा उद्देशहि तोच होता. त्याचें सह्याद्रीवर उत्कट प्रेम होतें. या पर्वतराजाचें सृष्टिसौंदर्य नित्य पहावयास मिळावें व त्याच्या सान्निध्यानें स्वास्थ्यकारक हवापाणी मिळून अंतःकरणांत नेहमीं उच्च मनोवृत्ति उत्पन्न व्हाव्यात, अशा सदुद्देशानें त्या गृहस्थानें सोमेश्वरखेड्याच्या अगदीं जवळ पर्वताच्या पायथ्याशींच हा बंगला बांधलेला आहे. सोमेश्वर हें लहानसेंच खेडेगांव आहे; पण तें फार स्वच्छ व सुंदर आहे. या खेड्यापासून खंडाळ्याचें स्टेशन तीन चार मैल आहे. या खेड्याचें हवापाणी अत्यंत स्वास्थ्यकारक असल्याबद्दल सर्वत्र प्रसिद्धि आहे व केवळ याच उद्देशानें पुष्कळ श्रीमंत लोक तेथें उन्हाळ्यांत राहण्यासाठीं जातात. येथून सह्याद्रीचें व आसमंतांतील प्रांताचें जें सृष्टिसौंदर्य दिसतें, तें अत्यंत अपूर्व, स्फूर्तिदायक व रमणीय होय. उंचच उंच होत गेलेलीं पर्वतशृंगें, खोल दऱ्या, तुटलेले कडे, झुळझुळ वाहणारे जलस्रोत, नानाप्रकारच्या वृक्षांनीं गजबजलेलीं लहान लहान जंगलें, मधून मधून दिसणाऱ्या मराठे मावळ्यांच्या झोंपड्या, उंच सखल पृष्ठभागावरील लहान लहान जमिनी, आणि त्या जमिनींत काबाडकष्ट करणारे ते साध्या वृत्तीचे मराठे मावळे; या सर्वांचें अकस्मात् दर्शन झाल्यावर जी मौज वाटते व अंतःकरणांत जे अनंत विचार उत्पन्न होतात, त्यांचें शब्दचित्र कागदावर उमटविणें अशक्य होय. विशेषतः दाट वस्तीच्या व रात्रंदिवस गजबजलेल्या शहरांत ज्यांचें पुष्कळसे आयुष्य गेलेलें असतें, त्यांच्या अंतःकरणावर वरील देखावा पाहून निराळाच परिणाम होतो. आपण एकाद्या स्वप्नसृष्टींतच आलों आहों असें त्यांना वाटतें व आपली कष्टकारक स्थिति ते तेथें बहुतेकांशीं विसरून जातात. या सोमेश्वर खेड्याच्या पश्चिम दिशेला पर्वतांच्या जरी अनेक रांगा पसरलेल्या आहेत व अनेक शृंगें आकाशाशीं स्पर्धा करतांना जरी दृष्टीस पडतात, तरी वर सांगितलेल्या बंगल्याच्या अगदीं समोर जो एक पर्वत प्रचंड स्वरूप धारण करून उभा आहे, तो कोणाहि प्रेक्षकाचें मन अगदीं प्रथम व सहज आकर्षण करतो. तो पर्वत केवळ सर्वांत मोठा असल्यामुळें प्रेक्षकाचें मन आकर्षण करतो असें नाहीं, तर प्रशस्तपणा-बरोबरच त्याचा आकारहि मोठा गमतीचा असल्यामुळें त्याच्याकडे साहजिकच मन

वेधलें जातें व सृष्टिसौंदर्याची विशेष आवड असणारांना तर एकवार त्या पर्वतावर जाऊन त्या सर्व पर्वताचें निरीक्षण करण्याची प्रबळ इच्छा होते. पर्वताच्या पायथ्याशीं सोमेश्वर या नांवाचें महादेवाचें एक लहानसेंच, पण फार सुंदर देवालय आहे. बांधण्याच्या पद्धतीवरून देवालय फार प्राचीन काळीं बांधलें असावें, असें स्पष्ट दिसतें, पण तें अद्याप ताठ्यानें व निर्भंग दृष्टीनें प्रेक्षकाकडे पहात असून त्यावर वृद्धापकाळची छटा मुळीच उमटलेली नाही. देवालय पूर्वाभिमुख असून त्याच्या समोरून थोड्या अंतरावरून एक लहानसा ओढा वहात आहे. या ओढ्याचें उगमस्थान जिवंत असल्यामुळें कोणत्याहि ऋतूंत ओढ्याचें पाणी कमी होत नाही. पावसाळ्यांत मात्र ओघ थोडासा मोठा होऊन आरंभी कांही दिवस पाणीहि गढूळ होतें; पण पावसाळा संपल्यावर ओढ्याचा जो ओघ असतो, तो दुसरा पावसाळा येईपर्यंत कायम असतो. हा ओघ पर्वतावरून वहात असल्यामुळें तो साहाजिक वेगानें वाहातो व कित्येक ठिकाणी लहान लहान कड्यांवरून पाणी उड्या घेत असल्यामुळें त्या ओघाविषयीं थोडें कुतूहलहि उत्पन्न होतें. या ओढ्याचें उगमस्थान स्पष्ट नसून तें डोंगराच्या एका खबदाडांत अदृश्य झालेलें आहे. देवालयापासून सुमारें दोन मैलांवर एक डोंगराची आंत आंत पोखरत गेलेली भित सारखी पाझरत असून तें पाणी भितीच्या बुडाशीं असलेल्या लहानशा खळग्यांत सांचतें व तेथून हा ओढा सारखा वाहातो. या ओढ्याचा ओघ देवालयासमोर सुमारें पांच सहा हात उंचीच्या कड्यावरून खाली पडतो. वर सांगितलेल्या बंगल्याच्या मालकानें हा कडा कारागिराकडून फोडवून त्याला चतुर्भुजा देवीचें स्वरूप आणलें आहे. त्यामुळें तेथील कृत्रिम सौंदर्यात अधिक भर पडली असून अंतःकरणांत थोडी पूज्यबुद्धीहि उत्पन्न होते. देवीच्या एका हातांत कमळ व दुसऱ्या हातांत त्रिशूल असून दुसऱ्या दोन हातांच्या ओंजळीतून ओढ्याचा ओघ वहात आहे. देवीच्या पायाशीं दहा हात लांब, पांच हात रुंद व पांच सहा हात खोल असें एक दगडाचें कुंड बांधलेलें असून देवीच्या हातांतून ओघाची धार प्रथम या कुंडांत पडते. यानंतर खालच्या बाजूला अशीच आणखीं दोन कुंडें बांधलेलीं आहेत. हीं कुंडें बांधण्यांत बंगल्याच्या मालकाचा स्वार्थ आणि परार्थ अशीं दोन्हीहि साधली आहेत. पहिल्या कुंडाचें पाणी पिण्यासाठीं राखून ठेवलेलें असल्यामुळें त्या कुंडांत कोणी स्नान करीत नाहीं व धुणीं वगैरेहि धूत नाहीं. मधलें कुंड अधिक प्रशस्त व खोल असल्यामुळें त्यांत स्नान चांगल्या रीतीनें करतां येतें व थोडेंसें पोहतां देखील येतें. तिसऱ्या कुंडाचा उपयोग धुणीं वगैरे धुण्यासाठीं होतो. हीं तिन्ही कुंडें बंगल्यापासून

थोड्या अंतरावर असल्यामुळें त्याचा उपयोग बंगल्यांतल्या लोकांना फार होतो. तसेंच हीं कुंडें सोमेश्वर खेड्यापासून फार दूर नसल्यामुळें खेड्यांतील लोकांनाहि त्यांचा हरहम्मेश उपयोग होतो. शेवटच्या-तिसऱ्या कुंडाला ओघ बाहेर सोडण्यासाठीं जें दार ठेवलें आहे, तें थोडा वेळ बद ठेवले म्हणजे तिसऱ्या कुंडांत पाणी स्वाभाविक फुगूं लागतें व तें त्या कुंडाला जो एक पाट काढलेला आहे, त्या पाटानें वहात जाऊन बगल्याच्या भोंवतालीं असलेला सर्व बाग भिजवून टाकतें. या तिन्ही कुंडांना सीताकुड, रामकुंड आणि कुशावर्त अशी अनुक्रमें नांवें दिलेली असून तीं नांवें आतां इतकी रूढ झालेली आहेत कीं, त्याबद्दल त्या भागांतील लोकांना प्रेम व अभिमान उत्पन्न झाला आहे.

आश्विन महिना बहुतेक संपत आला होता. पहांटेच्या वेळीं चांगली थंडीहि चमकूं लागली होती. अशा थंडीच्या भरांत, दिसतें न दिसतें अशा पहांटच्या सुमारास एक पन्नास पंचावन वर्षांची प्रौढ विधवा स्त्री बरोबर चवदा पंधरा वर्षांच्या मुलीला घेऊन वर सांगितलेल्या बगल्यांतून बाहेर पडली. ती रामकुंडावर येऊन धुणीं वगैरे धुवूं लागली आणि मुलीनें बरोबर जीं भांडी आणलीं होतीं तीं घांसण्यास आरंभ केला. दोघींची धुणीं व भांडी धुवून झाल्यावर त्यांनीं त्याच कुंडांत स्नानें केलीं व ओलेतीं धुवून घेऊन त्या सोमेश्वराच्या दर्शनासाठीं देवळांत गेल्या. देवाचें दर्शन घेऊन नियमाप्रमाणें प्रदक्षणा वगैरे घातल्यावर त्या तेथून सीताकुंडावर आल्या व भांड्यांत पाणी भरून घेऊं लागल्या. पाणी भरीत असतां ती तरुण मुलगी त्या प्रौढ स्त्रीला म्हणाली, " आई, तूं कळशी नी तांब्या घेऊन घरीं जा, मी घागर नी गडवा घेऊन मग दादाबरोबर येईन. तो स्नानाला यायची वेळ आतां झालीच आहे. " त्या प्रौढ स्त्रीनें मुलीच्या या म्हणण्यास फारसे आढेवेढे न घेतां संमति दिली व ती घरीं निघून गेली. जातांना ती म्हणाली, " पण इंदू, घरीं लवकरच या हो. त्यालाहि पाण्यांत फार वेळ डुबूं देऊं नकोस. " आईचे हे शब्द ऐकून इंदिरा गालांतल्यागालांत हांसली. मातृहृदय किती प्रेमळ व वात्सल्ययुक्त असतें याची इंदूला कल्पना नसल्यामुळें इंदूला हंसूं आलें. तिला वाटलें, मी पधरा वर्षांची, माझा दादा तर सतरा अठरा वर्षांचा, तेव्हां आम्हां दोघांना आतां प्रकृतीला जपण्याचा उपदेश करण्याचें कारण नाहीं; परंतु मातेच्या उदार हृदयांत एवढालीं मोठीं मुलें देखील लहान दिसतात, हें अद्याप इंदूला माहीत झाले नव्हतें. असो. इंदूच्या आईचें नांव अन्नपूर्णा असें असून तिला हीं एवढी दोनच अपत्यें होतीं. मुलीचें नांव इंदिरा असें असून मुलाचें नांव पांडुरंग असें होतें. मुलीला पंधरावें वर्ष लागलें होतें; पण अद्याप ती अविवाहित

होती. इंदिरेची आई तेथून गेल्यावर इंदू सीताकुंडाच्या एका पायरीवर बसली आणि देवीच्या ओंजळींतून जी पाण्याची धार कुंडांत अविरतपणें पडत होती, त्या धारेकडे एकाग्र दृष्टीनें पाहूं लागली. ती त्या धारेकडे पहात असतां लवकरच तिची वृत्ति इतकी एकतान झाली कीं, ती सर्व जगाला विसरली आणि तेवढी एक पाण्याची धारच तिच्या दृष्टीपुढें दिसूं लागली. प्रत्यही दृष्टीस पडणाऱ्या साधारण पाण्याच्या धारेनें त्या मुलीचें चित्त आपणाकडे ओढून घ्यावें, असें त्या धारेंत विशेष तें काय होतें? हा प्रश्न पुष्कळांना इतका महत्त्वाचा वाटणार नाहीं; परंतु ज्यांची हृदयें थोर आहेत, त्यांना त्या लहानशा धारेंतदेखील केवढाले चमत्कार दृष्टीस पडतील. निरीक्षण करण्याची शक्ति ज्यांच्या दृष्टींत नाहीं, त्यांना कशाचेंच महत्त्व वाटणार नाहीं; पण ही शक्ति ज्यांना आहे, त्यांना सूक्ष्म अणुरेणूपासूनहि पुष्कळ शिकण्यासारखें आहे. ती तरुण मुलगी जेव्हां एकाग्र दृष्टीनें पाण्याच्या धारेकडे पाहूं लागली, तेव्हां त्या देवळासमोरचा तो एकदर देखावा फारच मनोहर दिसूं लागला. एकादी वनदेवता अथवा श्वेतपाषाणाची सुंदर मूर्ति ती वारिधारा अवलोकन करीत आहे, हें ज्याच्या म्हणून दृष्टीस पडलें असेल, त्याला तेथल्या मूळच्या सौंदर्यांत अधिक भर पडलेली खात्रीनें दिसली असेल. ही मुलगी सुमारें पंधरा वर्षांची होती, हें खरें; पण ती अंगानें सुदृढ व थोडी उंच बांध्याची असल्यामुळें आणि शिवाय तारुण्यामुळें स्वभावतःच ती अधिक वयाची दिसत होती. या मुलीचा जन्म एका कुलीन दक्षिणी ब्राह्मण घराण्यांत झाला होता. या घराण्याचा लौकिक व त्याची चालरीत यांकडे लक्ष दिलें असतां जरी ती मुलगी स्वतः सुशिक्षित असून एका सुशिक्षित गृहस्थाची मुलगी होती, तरी तिचें लग्न या आधींच व्हावयास पाहिजे होतें; परंतु भवितव्यतेच्या घोटाळ्यांत सांपडल्यामुळें ती कौमार्यावस्थेंतच एकेक दिवस मोजीत होती. या मुलीच्या चेहऱ्यावर विवाहाच्या काळजीची छटा कांहींशी उमटली होती, पण त्यामुळें तिच्या सौंदर्यांत बिलकुल उणेपणा पडला नव्हता. केवळ सौंदर्याच्या दृष्टीनें पाहिल्यास तिचे सर्व अवयव अगदीं रेखीव नसल्यामुळें तिला सुंदर असें कांहीं म्हणतां यावयाचें नाहीं; परंतु तिच्या मुखावरील गांभीर्य, तेज, डोळ्यांतील पाणी आणि मार्दव यांमुळें तिचा चेहरा पुष्कळ सुंदर चेहऱ्यांतूनहि डोळ्यांत भरत असे. तिचा वर्ण पूर्ण गोरा नव्हता; पण जो होता तो गोऱ्यांतच मोडण्यासारखा होता. इतकेंच नव्हे तर त्या वर्णांत रानांतल्या मोकळ्या हवेची तांबूस छटा मिसळलेली असल्यामुळें तो वर्ण त्या मुलीला फारच खुलवीत होता. मुखावर कृत्रिम नाजुकपणाची छिचोर छबा मुळीच नव्हती, तर त्या ऐवजीं गांभी-

यांचा प्रशांतपणाच अधिक खेळत होता. तिचें रुंद कपाळ, घवघवीत नाक, विस्मृत पण अत्यंत तेजस्वी डोळे आणि गाल व हनुवटीवरील स्वाभाविक लाली, यामुळें ही मुलगी कमलासनस्थ लक्ष्मीप्रमाणें पूज्य व सुंदर दिसत होती. विशेषतः या वेळीं त्या मुलीच्या अंतःकरणांत जे विचार घोळत होते, त्यामुळें तिच्या सौंदर्यांत अधिक भर पडली होती.

खरें सौंदर्य कशावरून ओळखावयाचें हा मोठा प्रश्न आहे. सौंदर्य हा केवळ मनाचा आभास होय. जें ज्याच्या चित्ताला आवडतें, तें तो सुंदर आहे, असें म्हणतो. निष्कलंक, स्वच्छ व निर्मळ अशी वस्तु बहुतेकांशीं सुंदर असते व या दृष्टीनें (सौंदर्याची व्याख्या ('पवित्रता हेंच सौंदर्य') अशी करणें भाग आहे. अशीं अनेक माणसे होऊन गेलीं आहेत कीं, तीं वास्तविक सुंदर तर काय, पण कुरूप देखील होतीं; परंतु केवळ त्यांच्या पवित्र आचरणाच्या तेजामुळें लोकांना तीं माणसें सुंदर अशीच भासली. पुष्कळ कुमार्गगामी लोक सुंदर असतात, त्यांचे चेहरे अगदीं रेंखीव असतात; परंतु मौज ही की, असल्या सुंदर माणसांचा चेहरा दृष्टीस पडतांच अंतःकरणांत आदर उत्पन्न होण्याऐवजीं तिरस्कार उत्पन्न होतो. अर्थात् ज्या सौंदर्याला सदाचरणाची जोड मिळाली नसेल, तें सौंदर्य खरें सौंदर्यच नव्हे. मृगजळाच्या मागें लागून अज्ञान हरिणें जशीं व्यर्थ धडपड करीत असतात, तद्वत् कांहीं अविचारी माणसें दुराचारी सौंदर्याच्या मागें लागून सुखाऐवजीं दुःखाची मात्र जोड मिळवून घेतात. अलीकडच्या नवशिक्षित तरुणांनीं आपल्या सहधर्मिणीची निवड करतांना सौंदर्य ओळखण्याची ही साधी गुरुकिल्ली लक्षांत ठेवण्यासारखी आहे. गोरागोमटा चेहरा आणि नटण्यामुरडण्याची तऱ्हा यांवर उडी मारून संसारसौख्याची आशा करणे आणि मृगजळानें तहान भागविणें या दोन्ही गोष्टी जवळ जवळ सारख्याच आहेत, असें म्हणणें कांहीं अतिशयोक्तीचें होणार नाहीं. पवित्रता, सदाचरण आणि शालीनता यांवांचूनचें सौंदर्य प्रेताप्रमाणें होय. तें खरें सौंदर्यच नव्हे. असल्या सौंदर्यानें कोणत्याहि समाजाची संघटना झालेली नसून समाजाची घडी मात्र बिघडविली आहे. रंभा, मेनका, उर्वशी वगैरे अप्सरा सुंदर असूनहि पूजार्ह ठरल्या नाहींत. हाच नियम समाजासहि लागू आहे. ज्या समाजाचें नैतिक बल अधिक, तोच समाज आदर्शभूत होय आणि म्हणूनच प्रत्येकानें 'पवित्रता हेंच सौंदर्य' हा अगदीं साधा नियम लक्षांत ठेवला पाहिजे.

इंदिरा ही सुंदर असून शिवाय सदाचरणी असल्यामुळें ती साहजिकच अधिक तेजस्वी व गंभीर दिसत होती. तिच्या अंतःकरणांत केव्हांहि उदात्त विचार खेळत

असत व ते या वेळींहि ती पाण्याची लहानशी धार पाहून तिच्या अंतःकरणांत उत्पन्न झाले होते. ती अगदीं एकतान वृत्तीनें त्या जलौघाकडे पहात होती, याचें तरी कारण हेंच होय. त्या वेळीं तिच्या अंतःकरणांत जे अनेक विचार उत्पन्न झाले होते, त्यामुळें ती बाह्य जगास बहुतेक विसरून गेली होती. अशा स्थितींत ती असतां थोड्या अंतरावरून 'इंदू' असा एक ध्वनि हवेंत दुमदुमला; परंतु इंदूचें चित्त पाण्याच्या धारेनें आपणाकडे ओढून घेतल्यामुळें तो शब्द तिच्या कानांत शिरला नाहीं. पुन्हां आणखी एकदां तो प्रदेश 'इंदू' या शब्दानें प्रतिध्वनित झाला; पण या वेळींहि तीं अक्षरें इंदूच्या कानांत प्रवेश करूं शकली नाहींत. पाण्याच्या धारेचा एकसारखा होणारा खळखळाट तिच्या कानांत घुमत होता. त्या निर्झराचें स्वर्गीय संगीत ऐकण्यांत ती अगदी तल्लीन होऊन गेली होती. यामुळें अर्थातच तिला 'इंदू' हा शब्द ऐकूं गेला नाहीं. आणखी थोडा वेळ मध्यें गेल्यावर इंदिरा ज्या पायरीवर बसली होती, त्या पायरीच्या जवळूनच कांहीं हर्षलहरी वाऱ्यांत मिसळल्या. या हर्षलहरी चांगल्या खणखणीत आवाजाच्या असल्यामुळें आणि त्या इंदूच्या अगदीं जवळूनच निघाल्यामुळें त्या तिच्या कानांत सहजच शिरल्या आणि तिनें आपली दृष्टि साहजिक मागें वळविली. तिनें आपली दृष्टि मागें वळवितांच तिच्या चेहऱ्यावर जें एकप्रकारचें चिंतायुक्त गांभीर्य आलें होतें, तें नाहींसें होऊन तिचा चेहरा आनंदानें कांहींसा प्रफुल्ल दिसूं लागला. या आनंदाचें कारण त्या मुलीच्या मागें एक सतरा अठरा वर्षांचा सुस्वरूप तरुण उभा होता, हें होय. या तरुणास आम्ही सुस्वरूप म्हटलें खरें; पण तेवढ्यावरून तो अगदीं मदनाचा पुतळा होता, असें मात्र कोणीं समजण्याचें कारण नाहीं. सौंदर्यापेक्षां त्या तरुणाच्या चेहऱ्यावर गांभीर्य व तेजस्विताच अधिक दिसत होती आणि यांमुळें त्याचा चेहरा केव्हांहि रुबाबदार दिसत असे. त्याच्याकडे पाहतांच त्याच्याविषयीं अंतःकरणांत आदर उत्पन्न व्हावा, अशी मोठी मनोहर त्याच्या चेहऱ्याची ठेवण होती. त्याचा वर्ण निमगोरा असून तो शरीरानें फार सुदृढ दिसत होता. हा तरुण कोण असावा, हें वाचकांनीं बहुतेक ओळखलें असेलच. पाण्याच्या कुंडाच्या कांठीं उभ्या असलेल्या इंदिरेचा तो बंधु होय. त्याचें नांव पांडुरंग. त्याच्या अंगावर यावेळीं शाल असून कांखेंत नेसावयाचें धोतर व हातांत एक मोठी पितळेची कळशी होती. तो रोजच्याप्रमाणें सकाळीं उठून स्नानासाठीं आला होता. इंदिरा त्याची वाट पहात उभी होती, हें वाचकांच्या स्मरणांत असेलच. हें वाचकांच्या स्मरणांत असेल, हें खरें; पण स्वतः इंदिरा मात्र ही गोष्ट अगदींच विसरून गेली होती.

तिला त्या साधारण लहानशा पाण्याच्या धारेंतच अनंत चमत्कार दिसले, आणि ते पहात असतां आपला दादा स्नानासाठीं यावयाचा आहे, हें देखील ती विसरून गेली. दादाला अकस्मात् मागें आलेला पाहून इंदिरेला जितकें आश्चर्य वाटलें, त्यापेक्षां किती तरी अधिक आश्चर्य इंदिरेनें ओ न दिल्यामुळें पांडुरंगास वाटलें. हातांतली कळशी व धोतर सीताकुंडाच्या एका पायरीवर ठेवीत असता तो म्हणाला, "इंदू, मी तुला दोन हांका मारल्या, तरी तूं ओ दिली नाहींस! इतकी कोणत्या विचारांत गर्क झाली होतीस?" पांडुरंगाचा हा प्रश्न ऐकून इंदू किंचित् स्मित करून म्हणाली, "एक दोन वेळां हांक मारल्याचा भास मला देखील झाला खरा; पण माझें लक्ष दुसरीकडे असल्यामुळें मला त्या ऐकूंच आल्या नाहीत. सीताकुंडांत पडणाऱ्या या पाण्याच्या धारेकडे पहातां पहातां माझें मन इतकें वेधून गेलें कीं, मला त्या धारेशिवाय कांहींच दिसेनासें झालें. दादा, उदासीनतेनें या धारेकडे पहाणारास तींत कांहीं विशेष आहे असें वाटणार देखील नाहीं; पण जे विशेष चिकित्सक बुद्धीनें त्या धारेकडे पहातील, त्यांना या लहानशा धारेंतहि केवढाले तरी चमत्कार दिसून येतील. काल रात्रीं आपण आंथरुणावर पडून जेव्हां झोंप घेत होतों, तेव्हां ही धार विश्रांतीची इच्छा न बाळगतां याच क्रमानें या कुंडांत पडत होती. रात्र अंधारी आहे, आतां मुळींच दिसत नाहीं; वगैरे कोणत्याहि प्रकारची कुरकुर न करतां ती आपला मार्ग एकसारखा आक्रमित होती. सगळें जग निद्रेच्या स्वाधीन होऊन सगळीकडे जेव्हां स्तब्धता पसरली होती, तेव्हांहि धारेचा खळखळ असा शब्द अविरत होत होता, आणि आतांहि हा ओघ आपल्या क्रमांत यत्किंचितहि खळ पडूं देत नाहीं. यांत खरोखर विचार करण्यासारखें कांहींच का नाही? दादा, तुझी मी स्तुति करतें असें समजूं नकोस; पण खरेंच सांगतें या पाण्याच्या धारेशी तुझ्या वर्तनाचें बरेंच साम्य मला दिसून आलें. आपल्या प्रयत्नाकडे कोणाचें लक्ष असो वा नसो, कर्तव्यांत खळ म्हणून पडूं द्यावयाचा नाहीं, असा या पाण्याच्या धारेचा जणू स्वभावच बनून गेलेला दिसतो. दुसऱ्यावर परोपकार करतांना आपल्या दयादाक्षिण्याकडे किती लोकांचे डोळे वेधले आहेत, इकडे पुष्कळ दात्यांचें बरेंच लक्ष असतें; परंतु ही पाण्याची धार लोकांच्या स्तुतीची व निंदेची बिलकूल फिकीर न करतां आपलें परोपकाराचें व्रत एकसारखें आचरीत आहे. मनुष्याचें आयुष्य खरोखर असें महत् असावें. आयुष्यांतला निमिषहि वृथा न जातां तें सर्व लोकोपकारासाठीं वेंचलें जावें. जें आयुष्य अशा रीतीनें खर्चं होत नाहीं, त्या आयुष्यावर जिवंतपणाचा केवळ आरोप आलेला असतो. बाकी असलें आयुष्य मृतापेक्षां अधिक किमतीचें खचित नाहीं. या लहानशा ओढ्याला

जन्म मिळून कित्येक युगें लोटलीं असतील; पण तेव्हांपासून त्याच्या या सदुद्यमशीलतेंत एक दिवसहि खळ पडला नसेल. आणखीहि कित्येक युगें—जगाच्या अंतापर्यंत देखील—या ओघाचा हाच क्रम चालेल. हा अविरत अविश्रांत उद्योग कोणीकडे आणि आम्हां कर्तृत्ववान् मनुष्यांची उद्योगशीलता कोणीकडे? दादा, हा ओघ या सीताकुंडांत पडतांना जो एक खळखळ असा ध्वनि होत आहे, तो ध्वनि जगाला किती तरी गोष्टी शिकवीत आहे. हें निर्झराचें स्वर्गीय संगीत ऐकून अंतःकरणांत ज्या अनंत भावना उत्पन्न होतात, त्या मानवी बुद्धीस अतर्क्य अशा होत." असें म्हणून इंदिरा पुन्हां निश्चल दृष्टीनें त्या ओढ्याच्या ओघाकडे पाहूं लागली. इंदूचे ते शब्द ऐकून पांडुरंगास मोठें आश्चर्य वाटलें. इंदू त्याची सख्खी बहीण असल्यामुळें तिचे विचार वगैरे त्याला अवगत होतेच; पण इंदूची बुद्धिमत्ता इतकी प्रगल्भ व सखोल असेल अशी त्याची कल्पना नव्हती. त्या ओढ्याच्या क्षुद्र ओघांत असे महनीय विचार सांठविलेले आहेत, अशी त्याची हा वेळपर्यंत समजूत नव्हती; पण इंदूचें भाषण ऐकून त्याचीहि दृष्टि एकदम पालटली आणि त्या पालटलेल्या दृष्टीनें तो जेव्हां त्या ओढ्याकडे पाहू लागला, तेव्हां त्यालाहि त्या ओघांत अनंत चमत्कार दिसूं लागले. तो एकाग्र दृष्टीनें त्या ओघाकडे पहात असतां इंदू म्हणाली, "दादा, निर्झराचें हें स्वर्गीय संगीत ऐकून मन केव्हां प्रसन्न होतें, तर केव्हां तें उदासहि होतें. माझ्या अंतःकरणांत आतां असे कांहीं गुंतागुंतीचे प्रश्न उत्पन्न झाले आहेत, कीं त्या प्रश्नांची उत्तरें मला मुळींच सुचत नाहीत. अंतःकरणांतल्या खोल—अगदीं खोल—जागेंत कसली तरी आकांक्षा उत्पन्न झाली आहे; पण ती कोणती आकांक्षा तेंच मला कळत नाही. ओढ्याची ही निरलस कर्तव्यपरायणता पाहून स्वतःचें क्षुद्रत्व लक्षांत येतें आणि आपणच आपला धिःकार करून घ्यावा असें वाटतें. आमचा आळस, कर्तव्यपराङ्मुखता आणि असहिष्णुता ही हृदयांत कशीं शल्यासारखीं टोंचूं लागलीं आहेत. या ओघाच्या एक शतांशाहि जरी आम्ही कार्यक्षम होऊं, तरी देखील सर्व मानव-जातीचें केवढें तरी कल्याण होईल? दिवस असो वा रात्र असो, आपल्या प्रयत्नाकडे कोणाचें लक्ष असो वा नसो, कोणी स्तुति करो वा निंदा करो, काय वाटेल तें झालें, तरी आपल्या कर्तव्यांत एक निमिषभरहि खळ म्हणून पडूं द्यावयाची नाहीं; अशा बाणेदार प्रवृत्तींनीं अलंकृत झालेलीं मानवी हृदयें जगांत किती असतील बरें? आपल्या कर्तव्यावर पाण्याच्या धारेचें केवढें हें प्रेम! कोण ही निष्ठा आणि केवढी ही एकाग्रता! दादा, अशा उत्साहानें जर आम्ही कर्तव्यरत होऊं, तर जगांत केवढी तरी क्रांति होईल; पण आम्ही अत्यंत थोर

म्हणविणारीं माणसें कलह, हेवा, अकर्मण्यता, खोटा अभिमान आणि स्वार्थ या सर्वांचें सहाय्य घेऊन शांतिसौख्यानें आम्हांपासून जणूं काय पळून जावें म्हणून त्यास हांकून देत आहों." हे शब्द उच्चारीत असतां त्या सुंदर मुलीचें मुखारविंद अधिकच लाल झालें व ती पुन्हां त्या पाण्याच्या धारेकडे पहात असतां तिचे डोळे पाण्यानें भरून येऊन त्यांतून दोन अश्रु खालीं पडले. इंदिरेला त्या स्थितींत पाहून पांडुरंगास विलक्षण विस्मय झाला. त्यामुळें त्याचा चेहरा थोडा गंभीर झाला; पण त्या गांभीर्यांतहि आनंदाच्या लहरी मधून मधून उसळत होत्या. यावरून बहिणीच्या त्या विचारामुळें त्याला मोठा आनंदहि झाला होता, हें अगदीं उघड होय. इंदूला तिच्या वडिलांकडून जें कांहीं घरगुती उच्च शिक्षण मिळालें होतें, व सध्यां आपण जें कांहीं तिला शिकवीत आहों, त्याचा उपयोग कितपत झाला आहे, हें आज अनायासें पांडुरंगास इंदूच्या वरील भाषणामुळें कळून आल्याचें त्याला साहजिक मोठें समाधान वाटलें. इंदूच्या मुखावरील गांभीर्य, तिच्या डोळ्यांत चमकणारें पाणी आणि गालांवर पडलेले अश्रु यांमुळें पांडुरंगास इंदूची तेजस्विता आज कांहीं निराळीच भासली. इंदूप्रमाणें त्यालाहि त्या पाण्याच्या धारेंत अनंत चमत्कार दिसूं लागले. जणूं काय अनंत काळचा एक ऋषि त्या ओघाच्या रूपानें सदुद्यमशीलतेचा जनतेस उपदेश करीत आहे, असे पांडुरंगास वाटलें. तो म्हणाला, "इंदु, एका सामान्य पाण्याच्या धारेंत तुला जे आज चमत्कार दिसले, त्यांवरून परमेश्वरानें निर्माण केलेल्या या विश्वांत सामान्य असें कांहीं नाहीं, हें तुझ्या आतां चांगलें ध्यानांत आलें असेल. एकादें लहानसे पान, गवताची काडी किंवा मृत्तिकेचा कण यांपासून देखील पुष्कळ शिकतां येण्यासारखें आहे. पण आमच्या अंतःकरणांत जेव्हां ज्ञानाविषयींची तळमळ उत्पन्न होऊन त्या दृष्टीनें जेव्हां आम्ही निरीक्षण करूं, तेव्हांच कोठें हें ज्ञान अल्पस्वल्प झालें तर होतें. कोणतेंहि कार्य करतांना अंतःकरणांत पूज्यभावना असली पाहिजे. अखिल मानवजातीचें कल्याण साधणें हाच आमचा प्रत्येक कार्याचा निष्कर्ष असला पाहिजे. जनहित आणि ज्ञानलालसा यांसाठीच जर आम्हीं आमचें प्रत्येक पाऊल टाकूं, तर केव्हां ना केव्हां तरी आपला खरा मार्ग सांपडेल; पण केवळ बाह्यावरणास भुलून मृगजळाच्या मागें पळत सुटलों, तर अनंतकाळ लोटला, तरी जन्ममरणाच्या फेऱ्या आम्हांस चुकवितां यावयाच्या नाहींत. या फेऱ्या चुकविणें हेंच मनुष्याचें ध्येय होय. या कार्याला फारच दांडगा विश्वास लागतो आणि हा विश्वास उत्पन्न होण्यासाठीं सर्व विश्वावर प्रेम करण्यास शिकणें हाच ओ ना मा होय. आम्हीं मृत्तिकेचा एक कणहि पूज्य मानला पाहिजे. त्यांत चैतन्य आहे, म्हणून

तो पूजार्ह मानला पाहिजे. हें जें आमची आर्य-संस्कृति आम्हांस पदोपदीं शिकवीत असते, त्याचा उद्देश एकच आहे, आणि तो प्रेमविकास हा होय. काष्ठ, पाषाण व धातूंच्या अनेक प्रकारच्या मूर्तींची हिंदु पूजा करतात. म्हणून त्यांना कित्येक लोक हंसतात; पण ते जर त्यांतल्या उद्देशाकडे लक्ष देतील, तर सर्व विश्वसंसारावर प्रेम करण्यास शिकविणारी ही एकच पद्धत सोपी व श्रेयस्कर आहे, असें त्यांना कबूल करावें लागेल. जगाच्या पाठीवर अनेक धर्म आहेत—अनेक पंथ आहेत; परंतु सर्वांवर प्रेम करण्यास शिकविण्याची धमक फक्त हिंदुधर्मातच आहे. तसें नसतें, तर भरतखंडांतले लोक इतरांप्रमाणें हिंसा, द्वेष, आणि स्वार्थ यांमुळें रक्तपिपासु बनले असते, आणि मग या पंचवीस कोट लोकांनीं जगांत कोठेंहि शांतता म्हणून नांदू दिली नसती. आमच्या आर्य-संस्कृतीनें जेव्हां सर्व अंतःकरणें ओतप्रोत भरून जातील, तेव्हांच कोठें सर्व जगास शांतिसौख्याचा अनुभव मिळेल. शेवटीं या आर्य-संस्कृतीचाच जय व्हावयाचा आहे. तो होण्यास पुष्कळ काळ लागेल हें खरें. पण तो झाल्यावांचून राहणार नाहीं, हें मात्र खचित. पूर्वी शेंकडों वर्षें एकांतांत राहून शांतिसौख्याची खरी किल्ली ऋषींनी शोधून काढली आणि ती त्यांनीं सर्वांच्या स्वाधीन केलेली आहे. तिचा जे उपयोग करतील त्यांची आयुष्यनौका केव्हांहि शांतिसौख्याच्याच दर्यावरून वहात जाईल.”

इंदूच्या प्रश्नास उत्तर म्हणून पांडुरंगानें हें एक व्याख्यानच दिलें. अल्पस्वल्प प्रश्नोत्तरांतहि पांडुरंगाची ही व्याख्यान झोडण्याची खोड पाहून त्याचें स्वभावचित्र कोणी कदाचित् निराळेंच रंगवील; परंतु खरोखर असें अस्वाभाविक वागण्याची किंवा विद्येची घमेंड जेथें तेथें दाखविण्याची पांडुरंगास मुळींच खोड नव्हती. त्याचा हा ब्रह्मज्ञानाचा पाठ सहज बोलतां बोलतांहि फक्त स्वतःच्या बहिणीजवळ मात्र सुरू होत असे. याचें कारण इंदूची परिस्थिति हें होय. इंदूच्या भवितव्यतेचीं निरनिराळी दुःस्वप्नें त्याला दिसूं लागल्यामुळें तो इंदूला केव्हांहि ऋषींच्या गंभीर वाणीची ओळख पटवून देऊन तिच्या अंतःकरणांत नेहमी उदात्त विचारांचें बीजारोपण करीत असे. भावाच्या या असल्या भाषणामुळें इंदूला देखील थोडीशी व्याख्यानी धाटणीनें बोलण्याची संवय लागली होती; पण तीहि केवळ भावाजवळच होय. पांडुरंगाचें वरील लांबलचक भाषण ऐकल्यावर तिला एक प्रकारें संतोषच झाला. कारण अंतःकरणास पटावीं, अशीं त्यांत पुष्कळ तत्त्वें होतीं. तें भाषण ऐकल्यावर ती पांडुरंगास म्हणाली, “दादा, तूं एकदां म्हणाला होतास कीं, सोमगडावर गुहा असून तींत पूर्वी ऋषी रहात होते. त्या गुहा एकदां पहाव्यात

अशी फार इच्छा झाली आहे. मग आपण पुण्यास गेल्यावर कांहीं लवकर पहावयाला मिळावयाच्या नाहींत. येथें आहों तोंपर्यंतच बघितल्या पाहिजेत. उद्यां तुला कांहीं काम नसेल, तर उद्यांच जाऊं. तूं सांगशील तर मी बरोबर घेण्यासाठीं आज फराळाचें देखील तयार करून ठेवीन. मागें चार दोन वेळां जाऊं जाऊं म्हणून म्हणाला होतास; पण जाणेंच झालें नाहीं." पांडुरंगासहि इंदूचा हा विचार पसंत पडला. सोमेश्वर येथील स्वतःच्या शेतीचे वगैरे उद्योग पाहून तोहि थोडा कंटाळलाच होता. तेव्हां एक दिवस सोमगडावर जाऊन स्वस्थ घालवावा असें त्यालाहि वाटलें. तो म्हणाला, "उद्यां मला कांहीं विशेष काम नाही, तेव्हां उद्यांच जाऊं. पण इंदू, डोंगर बराच उंच आहे हो. वर जतांना अगदीं थकल्यासारखें होतें." इंदू किंचित् हंसत हंसत म्हणाली, "काय वाटेल तें होवो, उद्यां गडावर गेल्यावांचून कांही रहावयाचें नाहीं. बसत उठत कसें तरी जाऊं." इंदूनें असें सांगितल्यावर पांडुरंगानें स्नानास आरंभ केला. त्याचें स्नान व धोतरधुणें होई तों इंदूनें पाण्याच्या कळशा वगैरे घांसून स्वच्छ पाण्यानें भरून घेतल्या आणि नंतर सोमेश्वराचें दर्शन घेऊन त्या दोघांनी लवकरच घर गांठलें.

## प्रकरण दुसरें

# सोमगडावर

सोमगडावर जाण्याचें निश्चित झाल्यावर इंदूला मोठा उत्साह वाटूं लागला. त्या दिवशीं सगळा दिवसभर तिच्या अंतःकरणांत सोमगडासंबंधानेंच विचार घोळत होते. पर्वतासंबंधानें अनेक कल्पना तिच्या मनांत येत होत्या. ज्या सृष्टींत आपण नेहमीं वावरतों, जेथें आपदाविपदांचेंच राज्य दृष्टीस पडतें, स्वार्थ, मत्सर आणि द्वेष हींच जेथें सर्वत्र आढळतात आणि अशा परिस्थितीमुळें जेथें जीव अगदीं कंटाळलेला असतो, त्यापेक्षां अगदीं निराळ्या अशा ठिकाणीं–जेथें मत्सर नाहीं, स्वार्थ नाहीं, द्वेष नाहीं–अशा एकाद्या जणूं काय निराळ्याच लोकांत आपण जाणार आहों, असें इंदूला वाटत होतें. भारत-रामायणादि ग्रंथांतून ऋषींच्या आश्रमांचीं वर्णनें वाचून जो आनंद होतो, तो आज प्रत्यक्षच अनुभवास येईल, असेंहि तिला वाटत होतें. पर्वतावर अशा प्रकारचें कल्पनातीत कांहींतरी आपल्या दृष्टीस पडेल आणि तें पाहून आपणास कितीतरी नव्या गोष्टी कळतील, असें तिला वाटत होतें. तेथें ऋषींच्या ज्या गुहा आहेत

त्या पाहून अंतःकरणांत कितीतरी सद्विचार उत्पन्न होतील. प्राचीन काळचें सत्ययुग डोळ्यांपुढें उभें राहील वगैरे कितीतरी विचार इंदूच्या अंतःकरणांत एकसारखे येत होते. गडावरची हवा फार चांगली असून अत्यंत पाचक असें पाणीहि तेथें आहे, तेव्हां गडावर सकाळीं जावयाचें व सायंकाळीं परत यावयाचें, असा बेत असल्यामुळें दोन वेळेला पुरेल इतकें फराळाचें तिनें स्वतःच तयार करून ठेवलें. त्या दिवशी पांडुरंगाची आणि तिची जेव्हां जेव्हां गांठ पडे, तेव्हां तेव्हां ती त्याला सोमगडासंबंधानेंच कांहींतरी प्रश्न विचारीत असे. रात्रीं आंथरुणावर पडल्यावर तिच्या अंतःकरणांत तेच विचार घोळत असून पहाटेच्या सुमाराला तिला एक विलक्षण स्वप्नहि पडलें. जणूं काय आपण गडावर गेलों असून तेथील सर्व प्रकार पहात आहों, असें तिला स्वप्नांत दिसूं लागलें. डोंगराच्या पठारावर जिकडे तिकडे सुंदर वनराजि असून मध्यभागीं पाण्यानें तुडुंब भरलेलें एक सरोवर आहे. सरोवराच्या सभोंवतीं कांहीं पर्णकुटिका असून मस्तकावर जटाभार असलेले अनेक ऋषि एका स्वच्छ आंगणांत बसून वेदघोष करीत आहेत, कांहीं ऋषि–कुमार वेदाध्ययन करीत बसले आहेत, कांही ऋषिपत्न्या व कन्या सरोवरांत वल्कलें वगैरे धूत आहेत, लहान लहान मुलें हरिणांच्या मुलांबरोबर खेळत आहेत, वगैरे प्रकार इंदूला स्वप्नांत स्पष्ट दिसूं लागले. तो देखावा पाहून इंदू चित्राप्रमाणें स्थित झाली आणि विशेषतः ऋषिकन्यांच्या मुखांकडे ती अगदी एकाग्र दृष्टीनें पाहूं लागली. त्या मुलींच्या मुखांवरील तेज, शांतभाव, प्रेमळ दृष्टि आणि सुहास्य ही पाहून तिला अगदी लाजल्यासारखें झालें. या सुशील व सद्गुणसंपन्न मुलीपुढें आपण अगदींच कःपदार्थ आहों, असें मनांत येऊन इंदूचा चेहरा अगदीं म्लान झाला. ती सरोवराच्या बाजूला चालली होती, पण तिला त्या ऋषिकन्यांची भीति वाटूं लागली. त्या मुली तिला आपणाकडे येण्याविषयीं हातानें खुणावूं लागल्यावर इंदूला अधिक भीति वाटली. इंदू आपणाकडे न येतां उभी राहिली आहे, असें पाहून त्या मुलीच तिच्याकडे जाऊं लागल्या. इंदूला आतां फारच भीति वाटूं लागली. ती मागें परतली व घाईघाईनें डोंगर उतरूं लागली. इतक्यांत तिचा पाय निसटला आणि ती डोंगरावरून खालीं कोलमडली. या स्वप्नामुळें इंदू झोंपेतून मोठ्यानें ओरडून जागी झाली. इंदूची छाती या वेळीं धडधड करीत असून तिचा चेहरा खरोखरच कोमेजून गेला होता. तिच्या खोलींत तिच्याशिवाय दुसरें कोणी नसल्यामुळें तिचें ओरडणें कोणासहि ऐकूं गेलें नाहीं, नाहीं तर ही कां ओरडली ? अशी वाटाघाट साहाजिकच झाली असती आणि मग तिचें उत्तर देतां देतां इंदूला अधिक लाजल्यासारखें झालें असतें. या स्वप्नामुळें इंदूच्या अंतः-

करणांत भीति उत्पन्न झाली खरी; पण ती क्षणमात्रच टिकली. दुसऱ्या क्षणीं तिच्या प्रकृतिधर्माप्रमाणें तिच्या अंतःकरणांत ऋषिकन्यांच्या अनुकरणाचे विचार येऊं लागले. मीहि ऋषिकन्यांप्रमाणेंच पावित्र्य संपादन करीन अशी तिला या स्वप्नामुळें उमेद उत्पन्न झाली. दुसरी एकादी लेच्यापेच्या मनाची मुलगी या स्वप्नामुळें भिऊन जाऊन तिनें डोंगरावर जाण्याचे विचारच सोडले असते; परंतु इंदूचा संकल्प त्या स्वप्नामुळें मुळींच ढळला नाहीं. उलट तिला अधिक उत्साह वाटू लागला. स्नानाला जाण्याची रोजची वेळ झाली असे पाहून तिनें पांडुरंगास उठविलें व कुंडावर जाऊन त्या दोघांनीं स्नानें करून घेतली. नंतर घरीं जाऊन त्यांनीं फराळाचें वगैरे गड्याजवळ देऊन त्याला त्यांनीं बरोबर घेतलें आणि सोमेश्वराचें दर्शन घेऊन सूर्योदयाच्या आधींच सोमगडावर चढण्यास त्यांनीं आरंभ केला.

ही पर्वतारोहणाची कथा पुढें सुरू करण्यापूर्वीं इंदिरा व पांडुरंग यांची त्या बरोबरच कादबरींतील एकंदर पात्रांची थोडी–फार ओळख याच प्रकरणांत करून देण्याचें योजिलें आहे. पांडुरंगाच्या वडिलांचें नांव भगवंतराव असें असून आईचें नांव पार्वतीबाई असें होतें. भगवंतराव हे वाडवडिलांपासून सोमेश्वर गांवचे इनामदार असून ते पुण्याचे रहिवासी होते. पुण्यास त्यांचा वडिलोपार्जित जुना वाडा असून थोडा जमीनजुमलाहि होता. ते जरी खाऊन पिऊन सुखी होते व तो काळ श्रीमतांनीं विशेष विद्याव्यासंगांत पडण्याचा नव्हता, तरी भगवंतरावांस स्वभावतःच ज्ञानलालसा असल्यामुळें त्यांनीं इंग्रजी वगैरे शिक्षण उत्कृष्ठ संपादन केलें व घरीं चालून आलेली मुन्सफीची नौकरीहि त्यांनीं पत्करली. परंतु ही नौकरी त्यांनीं लवकरच सोडली व दक्षिणेंत जीं अनेक लहान लहान संस्थानें आहेत, त्यांपैकीं एका संस्थानची दिवाणगिरी त्यांनीं मिळविली. या संस्थानचें एक काल्पनिक नांव आम्हीं वाचकांपुढें ठेवतों आणि आमचे वाचक तेवढ्यावर समाधान मानतील असा आम्हांस भरंवसा आहे. पुण्यापासून जवळच दक्षिण महाराष्ट्रांत विजयगड नांवाचें जें एक सुंदर गांव आहे, तेंच हें संस्थान होय. हें संस्थान फार मोठें आहे असें नाहीं, तरी त्याच्या कक्षेंत पंचवीस–तीस खेडींपाडीं असून ऐन उत्पन्न दीड पावणेदोन लक्षाच्या जवळ होतें. संस्थानिकांचें नांव अनंतराव असें होतें; पण ते त्या गांवांत अण्णासाहेब या नांवानेंच प्रसिद्ध होते. त्यांचा आणि भगवंतराव यांचा स्नेह लहानपणींच शाळेंत असतां जडला. त्यावेळीं संस्थानिक आणि शिक्षण यांचें बहुतेक वांकडें असावयाचें; परंतु अण्णासाहेबांना जात्याच शिक्षणाची गोडी असून बुद्धीहि तरतरीत असल्यामुळें त्यांनीं भगवंतरावाच्या बरोबरीनें इंग्रजी शिक्षण संपादन

केलें होतें. अण्णासाहेबांचे वडील हिशोबी कामांत कच्चे व प्रत्येक गोष्ट विशेष डामडौलानें करावयाची अशा स्वभावाचे असल्यामुळें विजयगडसारख्या लहानशा संस्थानाची स्थिति साहजिक समाधानकारक नव्हती. कारभारी वगैरे करतील ती पूर्वदिशा अशा रीतीनें कारभार चालला होता. वडील वारल्यावर अण्णासाहेबांच्या हातीं सर्व कारभार आल्यावर त्यांनीं मोठ्या मेहनतीनें संस्थानची स्थिति सुधारण्याचा उद्योग आरंभिला. उधळपट्टीचे खर्च ताबडतोब बंद करून संस्थानांतल्या प्रत्येक कामावर त्यांनीं योग्य माणसांची नेमणूक केली. लांचखाऊ व लोकांना त्रास देणारीं माणसें नौकरीतून काढून टाकून त्यांऐवजीं नवीन, तरतरीत व चोख माणसांची नेमणूक त्यांनीं केली. तथापि अद्याप त्यांना कारभाऱ्याची अडचण भासत होतीच. त्यांनीं बरीच खटपट केली, तरी योग्य मनुष्य मिळेना; तेव्हां त्यांनीं आपले सहाध्यायी भगवंतराव यांना विशेष गळ घातली व त्यांना नौकरी सोडावयाला लावून आपणाकडे कारभारी नेमलें. भगवंतरावांचा रिघाव अशा रीतीनें या छोट्या संस्थानांत झाल्यावर हे विशेष चळवळे गृहस्थ संस्थानांत आतां कोणती क्रांति घडवून आणणार, याकडे पुष्कळांचे डोळे लागले. भगवंतरावचा विद्याव्यासंग जितका दांडगा होता, तितकीच त्यांची बुद्धि दांडगी होती. देशाच्या सांपत्तिक स्थितीची चांगली ओळख पटण्यासाठीं त्यांनीं अर्थशास्त्राचा सांगोपांग अभ्यास केलेला असून त्या दृष्टीनें सरकारच्या धोरणांतलीं कांहीं कांहीं मर्मस्थळें त्यांनीं प्रथमच लोकांपुढें ठेवलीं होतीं. त्या बाबतीतलें त्यांचें बुद्धिसामर्थ्य पाहून लोकांच्या मनांत त्यांच्याविषयी विलक्षण आदर उत्पन्न झाला हें खरें; पण अधिकारी वर्गात ते कांहींसे नावडते झाले, हें विसरून चालावयाचें नाही. हिंदुस्थानांतल्या दरिद्री लोकांना फार थोड्या खर्चात न्याय मिळावा या मताचे ते असल्यामुळें त्या मताची छाप त्यांनीं निकाल दिलेल्या प्रत्येक फियोदींत दिसून येत होती. कायम धाऱ्याच्या पद्धतीचे ते मोठे चहाते असून एका प्रसिद्ध इंग्रजी दैनिकांत त्यांनीं एका टोपण नांवानें अनेक सुंदर लेख लिहिले होते. अशा प्रकारच्या अनेक कारणांमुळें भगवंतरावांची कारकीर्द या संस्थानास कितपत फलप्रद होते, याकडे साहजिकच लोकांचें लक्ष लागलें होतें. भगवंतरावांस कारभारी नेमल्यामुळें संस्थानिक अण्णासाहेब यांजवरहि सरकारचा थोडा रोष झाला होता; परंतु आपल्या संस्थानचें भगवंतरावामुळें खात्रीनें कल्याण होईल, असा अण्णासाहेबांस भरंवसा असल्यामुळें त्यांनीं सरकारचा रोष सहन करूनहि भगवंतरावांच्या हातीं सर्व सूत्रें दिलीं होतीं. छोट्या संस्थानची ही दिवाणगिरी म्हणजे भगवंतरावांची परीक्षाच होती. संस्थानांतल्या जनतेची स्थिति

सुधारावयाची व त्याबरोबर संस्थानचा खजिनाहि रिकामा होऊं द्यावयाचा नाहीं, अशा प्रकारची विलक्षण जबाबदारी भगवंतरावांवर येऊन पडली होती. या वेळीं जर भगवंतरावांऐवजीं दुसरा कोणी लेच्यापेच्या मनाचा मनुष्य असता, तर त्यानें या सुळावरच्या पोळीला हातच घातला नसता; परंतु भगवंतरावांचें बुद्धिसामर्थ्य जितकें दांडगे, तितकेच ते मनोधैर्याचेहि बळकट असल्यामुळें त्यांनी संस्थानचा कारभार मोठ्या उत्साहानें हातीं घेतला आणि हळूहळू संस्थानची स्थिति सुधारण्यास आरंभ केला. औद्योगिक दृष्टीनें संस्थानांत शेतकीशिवाय दुसरा चांगलासा उद्योग नव्हता, तेव्हां त्याच उद्योगास भगवंतरावांनी प्रथम हात घातला. त्यांनी कायमधाऱ्याची पद्धत अमलांत आणून पडीत जमिनी लागवडीस आणण्यासाठीं शेतकऱ्यांना पुष्कळ सवलती दिल्या. संस्थानांतील श्रीमंत लोकांना पाटबंधाऱ्याची कल्पना पटवून देऊन त्यांनीं त्यांच्याकडून थोड्या व्याजानें बरेंच कर्ज उभारलें व एक नदी व एक तलाव यांस धरणें बांधून सर्व संस्थानांत पाणी खेळविलें. शेतकऱ्यांसाठीं त्यांनीं निराळ्याच पद्धतीच्या पुष्कळशा शाळा चालू केल्या. धड ना शेतकीचें ज्ञान, धड ना बौद्धिक ज्ञान अशा अर्धवट शिक्षणानें शेतकऱ्यांची स्थिति सुधारण्याऐवजीं खालावली मात्र आहे, अशी भगवंतरावांची समजूत असल्यामुळें सर्व संस्थानांत केवळ शेतकऱ्यांसाठीं मध्यवर्ती अशा दहा शाळा चालू केल्या. प्रत्येक शाळेस एकेक प्रयोगक्षेत्र असून त्यांत प्रत्यक्ष शेतकीचें शिक्षण मिळण्याची व्यवस्था केली. बेतापुरतें लेखनवाचन, हिशोबठिशोब आणि थोडें लोहारी व सुतारी शिक्षण, इतकें शिकविण्याची या शाळेंत व्यवस्था केली होती. याशिवाय शेतीच्या व दूधदुभत्याच्या जनावरांचें पालनपोषण, रोगनिवारण व त्यांची उत्कृष्ट पैदास कशी करावी हें शिक्षण शेतकऱ्यांना मिळावें अशी व्यवस्था त्यांनी केली. उत्तम बीं-बियाणें व नवीन प्रकारची खतें, हीं शेतकऱ्यांना सवलतीनें मिळण्याची व्यवस्था त्यांनीं केली होती. यानंतर भगवंतरावांनीं संस्थानांतल्या औद्योगिक बाबीकडे लक्ष दिलें. अशा रीतीनें संस्थानांत हळुहळू सुधारणा करून त्यांनीं सुमारें दहा वर्षांच्या अवधींत विजयगडच्या संस्थानास अगदीच नवें स्वरूप आणलें. शेतीची विलक्षण सुधारणा झाल्यामुळें संस्थानचें उत्पन्न साहजिकच वाढलें व त्यामुळें मोफत सक्तीचें शिक्षण वगैरे आणखी उपयुक्त सुधारणा त्यांनीं संस्थानांत घडवून आणल्या. विजयगड हें संस्थान लहानसें खरें; पण त्याची जी सुधारणा अल्पावधींत भगवंतरावांनीं घडवून आणली, ती पाहून सर्वांस विलक्षण आश्चर्य वाटूं लागलें. महाराष्ट्रांतल्या बऱ्याच वर्तमानपत्रांतून या लहानशा संस्थानासंबंधानें प्रशंसोद्गार निघूं लागले व या संस्थानचा किता ब्रिटिश सरकारनें गिरवावा असाहि कित्येक पत्रकारांनीं स्पष्ट उपदेश केला.

या लहानशा संस्थानची स्थिति हळु हळू अशा रीतीनें सुधारत होती हें खरें; पण संस्थानच्या बाहेर राहाणाऱ्या कांहीं कांहीं व्यक्ति या संस्थानावर नाखुष झाल्या होत्या व त्यांचा रोष भगवंतरावांवर विशेष झाला होता. यानंतर सर्व हिंदुस्थानांत स्वदेशी चळवळ सुरू झाली व त्या चळवळीचा प्रवेश या संस्थानांत विशेष सुगमतेनें होऊन ती तेथें चांगलीच भरारली. इतर ठिकाणचा हा आवेग कालावधीनें नाहींसा झाला; पण विजयगडांतील स्वदेशी वस्तुभांडारें पूर्वीच्याच जोमानें चालू राहिलीं. भगवंतरावांवर रोष होण्यास हें एक आणखी कारण झालें. एकाद्या संस्थानानें आपल्या प्रजेची सुबत्ता वाढविण्यासाठी जो प्रयत्न करावयाचा, तो शेजारच्या साम्राज्य सरकारच्या तंत्रानें व त्यांच्याच पावलावर पाऊल ठेवून करावयास पाहिजे. त्यापेक्षां निराळा प्रयत्न करून प्रजेस अधिक सुखी व संपन्न करणें हें कितीहि न्यायसंगत असलें, तरी तें अगदीं लहानशा संस्थानास पचनीं पडण्यास बरेंच कठिण जातें. संस्थानचा कारभार कसा काय चालतो हें पाहाण्यासाठीं ज्यांची योजना झालेली असते, त्यांना संस्थानची भरभराट नेहमींच पसंत पडते असें नाहीं. त्यांना न आवडणाऱ्या अशा प्रजेच्या सुखसमृद्धीच्या गोष्टी जरी असल्या, तरी त्या करण्यास संस्थानिकांना केवळ याचमुळें, साहजिक भीति वाटते. अशा प्रसंगीं संस्थानचा कारभारी जर शिकस्तीच्या खंबीर मनाचा असला, तरच त्यास संस्थानच्या प्रजेचें खरें कल्याण साधतां येतें. भगवंतरावांच्या अंगीं हें मनोधैर्य उत्कृष्ट असून त्यांची बुद्धिमत्ताहि विशाल व दांडगी असल्यामुळें त्यांना विजयगडची भरभराट करतां आली. त्यांच्या या गुणामुळें ते संस्थानांत अत्यंत लोकप्रिय झाले; परंतु ज्यांना ही भरभराट नको होती, त्यांना मात्र भगवंतरावासंबंधानें बरेंच वैषम्य वाटूं लागलें. भगवंतरावाचें वैषम्य बाळगणारीं माणसें चार दोनच होतीं हें खरें; पण त्यांच्या हातीं सत्ता विलक्षण होती, हें विसरून चालावयाचें नाहीं. हीं माणसें भगवंतरावांच्या कारभाराकडे विशेष तीक्ष्ण दृष्टीनें पहात होतीं; परंतु इतकी तीक्ष्ण दृष्टि पोहोंचवूनहि भगवंतरावांच्या कारभारांत एकादीहि चूक दिसून आली नाहीं. अशा रीतीनें सुमारें वीस वर्षें त्या संस्थानचा कारभार त्यांनीं यशस्वी रीतीनें चालविला. या वीस वर्षांच्या अवधीत संस्थानची स्थिति कल्पनेच्या बाहेर सुधारली होती. भगवंतरावांचा आतां वृद्धापकाळ झाला होता. पूर्वीप्रमाणें तडफडीनें त्यांना आतां सर्व कारभार स्वतःच पहातां येत नसे. त्यांना दोन अपत्यें होतीं. एक मुलगा व एक मुलगी. मुलगा वडील असून त्याचें नांव पांडुरंग असें होतें आणि मुलीचें नांव इंदिरा असें होतें. ही मुलें त्यांच्याचप्रमाणें करारी स्वभावाचीं असून हुशार व सदाचरणी होतीं.

भगवंतराव मुलांच्या शीलसंवर्धनासंबंधानें फार काळजी घेत असत व स्वभावतःच बुद्धीचा विकास पावेल अशा प्रकारचें शिक्षण ते मुलांना देत असत. ईश्वरकृपेनें त्यांना उत्कृष्ट गृहिणीची जोड मिळाली होती. त्या साध्वीचें नांव पार्वतीबाई असें असून ती गृहकृत्यांत अत्यंत दक्ष, प्रेमळ व शांत स्वभावाची होती. या तिघांची ओळख वाचकांना पहिल्या प्रकरणांत करून दिली आहे. सोमगडाजवळून वाहणाऱ्या ओढ्याच्या कांठीं वरील दोन मुलांना व पार्वतीबाईंना वाचकांनीं पाहिलें आहेच.

विजयगडचे संस्थानिक अण्णासाहेब यांचा परिवार फार मोठा होता असें नाहीं. आतां ते श्रीमंत असल्यामुळें बरेच आप्तस्वकीय त्यांच्या आश्रयास येऊन राहिले होते हें निराळें; पण खास अण्णासाहेबांचा परिवार अगदीं मोजका होता. ते स्वतः, पत्नी व एक मुलगा इतकीं तीनच माणसें त्यांच्या परिवारांत होतीं. स्त्रीचें नांव रमाबाई असें होतें; पण तिला सर्व माईसाहेब या नांवानेंच ओळखीत असत. मुलाचें नांव मुकुंदराव असे असून त्यास दादासाहेब म्हणून लोक म्हणत. अण्णा-साहेबांस एवढा एकच मुलगा असल्यामुळें त्याच्या शिक्षणासंबंधानें ते फार काळजी घेत असत व हें शिक्षण भगवंतरावांच्या सल्लयानेंच दिलें जाई. मुकुंद, पांडुरंग व इंदिरा हीं तिघेंहि शिक्षणासाठी पुण्यास राहिली होतीं. पुण्यास भगवंतरावांचें स्वतःचें घर होतेंच, परंतु अण्णासाहेबांनीं या तिघांनाहि आपल्या स्वतःच्या पुण्यांतील वाड्यांत ठेवलें असून त्यांचा सर्व खर्च तेच करीत असत. इंदिरा व मुकुंद या दोघांना लहानपणापासून एकत्र खेळतांना पाहून अण्णासाहेबांच्या मनांत इंदूविषयीं एक निराळाच मोह उत्पन्न झाला. तिचें सौंदर्य, टापटीप, बुद्धिमत्ता व गोड स्वभाव हीं पाहून अण्णासाहेबांनीं तिच्याबरोबर मुकुंदचा विवाह करण्याचा विचार केला. इंदू दहा-अकरा वर्षांची झाल्यावर ती गोष्ट त्यांनी भगवंतरावांजवळ एका स्नेह्याच्या मार्फत काढली. आपणासारख्या साधारण मनुष्याची मुलगी संस्थानिक आपल्या मुलाला मागत आहेत, याबद्दल भगवंतरावांना थोडें आश्चर्यच वाटलें. पुढें या बाबतींत अण्णासाहेबांचा पूर्ण निश्चय आहे, असें समजल्यावर भगवंतरावांनीं त्या संबंधानें स्वतःच अण्णासाहेबांकडे विचारपूस केली. त्या वेळीं अण्णासाहेबांचा स्पष्ट मनोदय कळल्यावर भगवंतराव म्हणाले, "आपला जर असा निश्चय असेल, तर इंदू मोठी भाग्यवान् आहे असें म्हटलें पाहिजे. ती संस्थानची मालकीण होणार या दृष्टीनें मी म्हणत नाहीं, तर दादासाहेबांकडे पाहून हें म्हणतों. त्यांच्यासारखा सुशील पति तिला मिळणें हेंच मी तिचें भाग्य समजतों; पण ती अद्याप लहान आहे. चवदा-पंधरा वर्षांची झाल्यावांचून तिचा विवाह न करतां तिला गृहशिक्षण

वगैरे देण्याचा माझा विचार आहे." भगवंतरावांचें हें म्हणणें अण्णासाहेबांना पसंत पडलें. त्यांनाहि मुकुंदच्या लग्नाची इतकी घाई नव्हतीच; पण हा योगायोग पुढें मोडूं नये म्हणून अण्णासाहेबांनीं आपल्या वाड्यांत एक मोठा समारंभ करविला व त्या प्रसंगीं भगवतरावांनीं आपली मुलगी इदू दादासाहेबांस देण्याचें निश्चित केलें आहे, असें अण्णासाहेबांनी सर्व प्रमुख गृहस्थांच्या निदर्शनास आणून दिलें. त्या वेळीं इंदू व मुकुंद यांचा एक जोड फोटो घेऊन शिवाय सर्व मंडळीचाहि एक फोटो घेतला होता. हा समारंभ झाल्यावर ही गोष्ट सर्वविश्रुत झाली आणि पुढें केव्हां तरी लवकरच या दोघांचा विवाह होणार, हें अगदीं निश्चित झाल्यासारखें झालें. हा समारंभ झाला त्या वेळी मुकुंदाचें म्हणजे दादासाहेबांचें वय पंधरा-सोळा वर्षांचें होतें. दादासाहेब दिसण्यांत सुंदर, रुबाबदार, स्वभावानें दिलदार, प्रेमळ व सात्विक वृत्तीचे होते. इतके दिवस या तिघांचें राहणें पुण्यास एका ठिकाणीच होतें; परंतु वरील समारंभापासून इंदूनें तेथें राहण्याचें नाकारलें व तें तिचें नाकारणें स्वाभाविक असल्यामुळें भगवंतरावांनीं तिला आपल्याजवळ ठेवलें.

आणखी कांहीं काळ निर्विघ्न असा गेला असता, तर आणखी चार-दोन वर्षांनीं हा लग्नसमारंभ मोठ्या थाटानें पार पडला असता; पण भवितव्यतेचा ओघ निराळ्याच दिशेनें वहात असल्यामुळें अण्णासाहेबांची प्रकृति एकाएकीं बिघडली आणि त्यांचा भरंवसा नाहींसा झाला. आपली जीवितयात्रा आतां लवकरच संपणार अशी स्वतः अण्णासाहेबांची जेव्हां खात्री झाली, तेव्हां त्यांनीं मुकुदाला जवळ बोलावलें आणि त्याला ते म्हणाले, "दादा, अद्याप तूं अज्ञान आहेस, तेव्हां संस्थानचा कारभार भगवंतरावांच्या तंत्रानें चालीव. तसेंच अनुकूल वेळ येतांच इंदूबरोबर विवाह कर. विवाहाच्या संबंधानें दुसऱ्या कोणाचाहि सल्ला घेण्याचें तुला कारण नाहीं. हल्लीं संस्थानचा कारभार योग्य नोकरांच्या हाती आहे. त्यांत तूं कारणावांचून ढवळाढवळ करूं नकोस. वाड्यांत तुझी मातोश्री व अन्य आप्तस्वकीय आहेत, त्या सर्वांचा परामर्ष घेत जा." मृत्युशय्येला खिळलेल्या बापाची ही आज्ञा मुकुंदासारख्या सुशील व आज्ञाधारक मुलाच्या अंतःकरणावर किती खोल कोरून निघाली असेल, याचें अनुमान सहज होईल. त्या वेळीं मुकुंदचे डोळे पाण्यानें भरून आले, आणि 'आपण सांगितलेल्या आज्ञेप्रमाणें वागेन' असें त्यानें आपल्या बापाला वारंवार सांगितलें. यानंतर लवकरच अण्णासाहेबांचें देहावसान झालें.

अण्णासाहेबांच्या पश्चात् पूर्वीप्रमाणेंच संस्थानचा व्यवहार सुरळीत चालेल, अशी दादासाहेबांची समजूत होती; परंतु पुढें काय होणार हें स्वप्न भगवंतरावांस अगोदरच

दिसत होतें. सुबत्ता उपभोगण्यास चटावलेल्या या संस्थानांत अण्णासाहेबांच्या मृत्यूनंतर लवकरच दादासाहेब अज्ञान म्हणून 'कोर्ट ऑफ वार्डसूचें' बिऱ्हाड आलें व नवी विटी नवें राज्य या म्हणीचा अनुभव लोकांना येऊं लागला. भगवंतरावांनीं संस्थानची जी घडी बसविली होती, ती हळूहळू विस्कळित होऊं लागली. भगवंतरावाचा केव्हां केव्हां अपमानहि होऊं लागला. केवळ मुकुंदासाठी म्हणून हा सर्व अपमान भगवंतराव सहन करीत होते; परंतु कोर्ट ऑफ वार्ड्सला विशेषतः आपलेंच शल्य अधिक जाणवत आहे, असें पाहून त्यांनी संस्थानास कायमचा नमस्कार केला व ते पुण्यास राहूं लागले. यानंतर चार-सहा महिन्यांनीं भगवंतरावांनींहि इहलोकचा त्याग केला.

आतां संस्थानची सर्व सत्ता नारायणराव नांवाच्या गृहस्थाच्या हातीं आली होती. यांनीं संस्थानांत पाय ठेवल्यावर त्यांना नानासाहेब असे बहुमानाचें पद प्राप्त झालें होतें. हे गृहस्थ तरुण बांड असून साहेबी पोशाकानें वागणारे होते. वृत्तीहि बहुतेक साहेबीच होती. ते पुण्यास पूर्वी वकिलीचा धंदा करीत असून अत्यंत सुधारणावादी म्हणून तेथे प्रसिद्ध होते. यांची वकिली पुण्यास चांगली चालली असती; पण पुण्यास वकील फार असल्यामुळें यांना अगदीच अत्यल्प प्राप्ति होई. हे जबरदस्त खटपटी असल्यामुळें त्यांनी पुष्कळ मोठमोठ्या लोकांच्या ओळखी करून घेतल्या होत्या, व त्यामुळें एकाद्या श्रीमंताचे अज्ञान चिरंजीव सज्ञान होईपर्यंत त्यांची मिळकत संभाळण्याचा प्रसंग यांच्यावर मधून मधून येऊं लागला. या धंद्यांत ते चांगले वाकबगार झाल्याचा बोभाटा झाल्यामुळें विजयगड संस्थानची दिवाणगिरीहि ओघानेंच त्यांच्याकडे चालत आली होती. नानासाहेबांनी संस्थानात पाऊल टाकल्याबरोबर पहिलें काम त्यांनी हें केलें कीं, दादासाहेबांचा मुक्काम पुण्याहून हलवून त्यांना कांहीं दिवस विजयगडास ठेवून घेतलें. दादासाहेबांच्या चालू शिक्षणांत त्यामुळें मोठाच खंड पडला; परंतु संस्थानचा कारभार त्यांच्या डोळयांदेखत चालणें श्रेयस्कर आहे, असें नानासाहेबांनी सर्वांना भासविल्यामुळें त्या बाबतीत कोणींच हरकत घेतली नाहीं. असें करण्याचें खरें कारण निराळेंच होतें. भगवंतराव व त्यांची मंडळी यांपासून मुकुंदाला दूर ठेवण्यापेक्षां नानासाहेबांचा दुसरा कोणताहि उद्देश नव्हता. यानंतर खजिन्यांत पैसा नाहीं या सबबीवर संस्थानांतील शेतकीशाळा बंद करून संस्थानांतील स्वदेशी चळवळीची नांगी मोडण्यास नानासाहेबांनी आरंभ केला. दादासाहेबांस हें सर्व पसंत पडेना; परंतु स्वभाव भिडस्त असल्यामुळें त्यांना नानासाहेबांच्या कोणत्याहि कार्यास प्रतिबंध असा करतां येईना. दादासाहे-

बांचें अशा रीतीनें एक वर्ष विजयगडाला निरर्थक गेल्यावर नानासाहेबांनीं त्यांना शिक्षणासाठीं मुंबईस ठेवलें व त्यांच्यावर देखरेख ठेवण्यासाठीं आपल्याच कंपूंतल्या कांहीं माणसांची योजना केली. अगदीं साधेपणानें राहणाऱ्या दादासाहेबांना आतां संस्थानिकाच्या दर्जानें कसें रहावयाचें, हें शिक्षण मिळूं लागलें. तरुण व ऐटबाज विद्यार्थी त्यांच्याभोंवतीं गोळा होऊं लागले व त्यांनीं दादासाहेबांना चैनीची चटक लावण्याचा प्रयत्न आरंभिला. १६।१७ वर्षांचें तरुण वय, श्रीमंती आणि मागें कोणत्याहि प्रकारची उपाधि नाही, अशी स्थिति असल्यामुळें दादासाहेबांचें मन मागें ओढीत असतांहि त्यांचें पाऊल चैनीच्या बाजूला पुढेंच पडत होतें. चैन आणि ऐटदार पोषाक यांत कांहीं अन्याय आहे, असे प्रथम कोणाच्याहि लक्ष्यांत येत नाही; परंतु अनीतीच्या मार्गावरून जाण्यासाठी मनाची जी तयारी व्हावी लागते, त्या तयारीला चैनीची चटक मदत करीत नाहीं, असे मात्र कोणी समजूं नये. अनीतीचे मार्गावर ज्यांचें पाऊल पडलेलें आहे, त्याच्या मुळाशीं चैनीची चटकच होती, हें पुष्कळ उदाहरणांवरून स्पष्ट होण्यासारखे आहे. निरनिराळे पोषाक आणि निरनिराळे साहेबी खेळ यांची दादासाहेबांना आवड उत्पन्न करून देण्यास नानासाहेबांना बराच त्रास झाला, हें खरें, परंतु ती आवड त्यांना उत्पन्न झाल्यावर आपण कोणी तरी 'वरपुरुषवासुदेव' आहों असा दादासाहेबांना साहजिक अहंकार उत्पन्न झाला, साधा पोशाक केलेल्या गृहस्थाकडे तुच्छतेनें पाहण्याची त्यांना संवय होऊं लागली आणि आपणावर खरोखर कोणती जबाबदारी आहे, याचा त्यांना विसर पडूं लागला. मनुष्याची वृत्ति स्वभावतःच सदाचरणाकडे ओढ घेते हें खरें; परंतु केवळ संगतिदोषामुळें ही वृत्ति पालटते आणि कुमार्गातच मौज वाटावयास लागते. भोंव-तालीं अनीतिमान लोकांनीं वेढा घातला, तर तो फोडून बाहेर पडण्यास सामर्थ्य लागतें किंवा आंतल्याआंत अलिप्त राहण्याचें चातुर्य लागतें. दादासाहेबां-जवळ या दोहोंचाहि कांहींसा अभावच होता. ते साधारणतः भोळ्या स्वभावाचे असल्यामुळें नानासाहेबांचें चांगलेंच फावलें आणि त्यांनी या छोट्या संस्थानिकास निव्वळ कळसूत्री बाहुलें करण्याचा घाट घातला. नानासाहेब आपलें जाळें सावज पकडण्यासाठी फार दक्षतेनें विणीत होते व तें विणण्यास त्यांना चांगली संधीहि मिळाली होती; परंतु अशी संधि नसतां, उलट भोंवतालीं अडचणी असतांहि नाना-साहेबांच्या जाळ्याचा एकेक धागा तोडण्याचा क्रम एका तरुणानें चालविला होता. या तरुणाचें नांव दिनकर असें होतें. तो, पांडुरंग व मुकुंद हे तिघेहि सहाध्यायी असून दिनकर विजयगडचाच रहिवासी असल्यामुळें त्यांचा स्नेह चांगला वाढला

होता. दिनकर विजयगडच्या एका सावकाराचा मुलगा असून मुंबईस त्याचा एक जवळचा नातेवाईक असल्यामुळें तो मुंबईस एका कॉलेजांत शिकत होता. दिनकराची बुद्धि तीक्ष्ण, दृष्टि दूरदर्शी आणि वाणी समयसूचक होती. तो अत्यंत करारी स्वभावाचा असून त्याचें वर्तनहि फार शुद्ध होतें. मुकुंद त्याचा चांगला स्नेही असल्यामुळें मुकुदच्या एकंदर स्थित्यंतराकडे त्याची फार बारीक नजर होती. दोघे निरनिराळ्या कॉलेजांत शिकत असल्यामुळें दोघांची गांठ अशी क्वचितच पडे; परंतु जेव्हां जेव्हां त्या दोघांची गांठ पडे, तेव्हां तेव्हां दादासाहेबांस दोन उपदेशाच्या गोष्टी सांगण्यास दिनकर कमी करीत नसे. दादासाहेबांचें पाऊल जें विशेष घसरलें नाहीं, त्याचें कारण हा दिनकराचा वारंवार होणारा उपदेशच होय. दिनकराच्या शब्दांत विलक्षण अधिकारयुक्तता असल्यामुळें ते शब्द दादासाहेबांच्या अंतःकरणांत बराच वेळ टिकून रहात. ते शब्द पुसट होत येतात, तोंच दिनकरकडून पुनः मात्रेचा दुसरा वळसा मिळे, यामुळें नानासाहेबांच्या जाळ्यास पूर्णता अशी केव्हांच आली नाहीं.

दादासाहेब आतां सज्ञान झाले. त्याबरोबर संस्थानची सूत्रें त्यांच्या हातीं जाण्याची व त्याच सुमारास इंदिरेबरोबर त्यांचा विवाह होण्याची वाटाघाट कांहीं शिष्टमंडळीत सुरू झाली. नानासाहेबांस या दोन्हीहि गोष्टी पसंत नव्हत्या. केवळ अठरा वर्षाचें वय झालें म्हणजे संस्थानचा कारभार पाहण्याची पात्रता अंगीं येते, असे कांहीं नाही. शिवाय दादासाहेबांचें शिक्षणहि अद्याप पूर्ण व्हावयाचें आहे, या सबबीवर त्यांनी दादासाहेबांच्या हातीं अधिकार देण्याचें टाळलें. तसेच पैशाची अडचण वरपांगीं दाखवून विवाहाचेंहि लांबणीवर टाकलें. हा विवाह नानासाहेबांना मुळींच पसंत नव्हता. इंदिरेसारखी मुलगी दादासाहेबांची अर्धांगी झाल्यावर दादासाहेबांच्या वृत्तींत निश्चयानें फरक पडेल व मग आपणास येथून लवकरच चंबूगवाळें उचलावें लागेल, अशी नानासाहेबांना भीति वाटत होती. हा विवाह लांबणीवर टाकण्यास दादासाहेबांच्या शिक्षणाची एक सबब होतीच; पण याशिवाय दुसरीहि एक योजना नानासाहेबांनी करून ठेविली होती. दादासाहेबांचा मुंबईस जेथे मुक्काम होता, तेथेंच एक तेराचवदा वर्षांची सुदर मुलगी प्रत्यहीं दादासाहेबांच्या दृष्टीस पडत होती. यांत कांहीं नानासाहेबांचा हात असावा, असा कोणास संशयहि आला नसता; परंतु ही सर्व योजना नानासाहेबांचीच होती. जिच्या आंगीं आपादमस्तक नटवेबाजपणा भरला आहे, अशा सुंदर तरुण मुलीस दररोज शाळेंत जातांना पाहून दादासाहेबांसारख्या ऐश्वर्यसंपन्न तरुणाच्या मनांत कोणतेच विचार

येत नसतील असें नाही. दादासाहेबांची मनोभूमिका विवाहासंबंधानें अशा रीतीनें बदलण्याचा डाव नानासाहेबांनी घातला होता. इकडे इदिरेचें वय वाढत चालले होतें व त्यामुळें पांडुरंगाकडून कोर्ट ऑफ वार्ड्सला वारंवार लग्नाच्या तगाद्याची पत्रे जात होती असल्या पत्रांना उडवाउडवीची उत्तरें कशी द्यावयाची हें नानासाहेबांना कोणी शिकवावयास नको होतें. शेवटी नानासाहेबांनी एक निराळीच रामबाण युक्ति योजिली. त्यांनीं विलायतच्या प्रवासाचें सुंदर चित्र दादासाहेबांपुढें रेखाटून त्यांना जास्त शिक्षण मिळण्यासाठी म्हणून इग्लंडला पाठवून दिले. आता दोन वर्षे नानासाहेबांना इदिरेच्या लग्नाची कटकट उरली नव्हती.

वरील विवेचनावरून इदिरेचें लग्न कां लांबले होतें, याचा उलगडा वाचकांच्या लक्षांत येऊन कादंबरीतील मुख्य पात्रांची प्राथमिक ओळखहि त्यांना झाली असेलच. तसेच पांडुरंग आणि इंदिरा या दोघांनी या प्रकरणाच्या आरंभी सोमगडावर चढण्यास आरंभ केला आहे, हेंहि वाचकांच्या लक्षांत असेलच. सर्वांच्या पुढें गडी फराळाचें ओझें घेऊन चालला होता व त्याच्यामागून पांडुरंग व त्याच्यामागून इंदिरा याप्रमाणे ती तिघे गड चढत होती. पायथ्यापासूनची थोडीशी चढण विशेष भानगडीची नसल्यामुळें ती तिघेहि झपाट्यानें चढून गेली. या वेळीं सूर्योदय नुकताच झाला होता: पण सूर्य सोमगड पर्वताच्या मागच्या बाजूला असल्यामुळें पर्वतावर पर्वताची छाया पसरलेली असून सूर्याची किरणें पर्वतावरून लांबवरच्या भूभागावर पडलीं होती. पर्वतावरून दूर दिसणारें तें कोंवळें ऊन पाहून या तिघांनाहि मोठी मौज वाटली व त्यांचा वर चढण्याचा उत्साह अधिक वाढला. आतां चढण थोडी अवघड लागल्यामुळें पांडुरंग जपून चढूं लागला व वारंवार मागे वळून 'संभाळून' 'हळूच' अशी बहिणीला इषारत देऊं लागला. इदिरा जपूनच चढत होती. पर्वतावर चढणें हें फारसें कठिण नाही, अशी हा वेळपर्यंत तिची समजूत होती; परंतु जेव्हां ती कठिण चढण चढूं लागली, तेव्हां पर्वतावर चढणें वाटतें तितकें सोपें नाही, असा तिला अनुभव आला. तिचा श्वास जोरानें चालू लागला आणि सकाळची थंड वेळ असूनहि तिच्या कपाळावर घामाचे थेंब दिसूं लागले. आणखी कांहीं चढण चढून गेल्यावर इंदिरा अगदींच थकली व तिनें थोडी विश्रांति घेण्याविषयीं भावास याचना केली. इंदिरेचा तो जोरानें होणारा श्वासोच्छ्वास आणि तिचें तें घामानें डबडबलेलें मुख ही पाहून त्याला हंसूं आलें. त्या हंसण्याचा भावार्थ इंदिरेच्या तेव्हांच लक्षांत आला. ती किंचित् लाजल्यासारखी होऊन म्हणाली, "दादा, मला चढण्याची अगदीच संवय नाही. त्यांतून ही चढण तर अगदींच उभट आहे. चढतांना माझे पाय

देखील थरथर कापूं लागले. त्या दगडावर क्षणभर बसूं आणि मग पुनः चढूं लागूं." पांडुरंगानें बहिणीचें तें म्हणणें मान्य केलें, व तीं दोघें एका आंब्याच्या झाडाखालीं चारदोन दगड सारखे बसविलेले होते, त्यांवर बसून विश्रांति घेऊं लागलीं. येथून खालची खांचखळग्याची जमीन साधारण सपाट दिसत असून मोठाले वृक्ष झुडपाप्रमाणें दिसत होते. तसेंच ज्या ओढ्याबद्दल इंदिरेच्या मनांत विलक्षण आदर वसत होता, तो ओढा पांढऱ्या स्वच्छ दोरीप्रमाणें दिसत होता. दूरवर दिसणारा खंडाळ्याचा घाट स्पष्ट ओळखतां येत असून आगगाडीच्या रस्त्याचे रूळ शाईच्या रेघेप्रमाणें दिसत होते. इतक्यांत एक मोठी मालगाडी आली आणि ती त्या रुळांवरून निघून गेली. तेव्हां तर त्या रस्त्यावरून मुंग्यांची रांग धांवत असल्याचा भास त्या दोघांना झाला. तो प्रकार पाहून इंदिरेला साहजिक हंसूं आलें. निमिषार्धात तिच्या चेहऱ्यावरील सर्व हर्षरेषा नाहीशा होऊन तो गंभीर झाला आणि किंचित् खिन्न स्वरानें ती म्हणाली, "दादा, येथून खालीं दृष्टि फेंकली म्हणजे सारा मुंग्यांचाच संसार दृष्टीस पडतो. मनुष्यास आपलें सौंदर्य, आपला आकार आणि आपलें कर्तृत्व यांबद्दल केवढा अभिमान; पण इतक्या उंचीवरून दृष्टि फेंकली म्हणजे मनुष्याच्या या अभिमानाबद्दल खरोखर कींव उत्पन्न होते. आम्हां मनुष्यांना आपल्या कर्तृत्वशक्तीबद्दल केवढा अभिमान वाटतो; पण आमचें अस्तित्व आम्ही जों जों उच्च दृष्टीनें पाहतो, तों तों आम्ही म्हणजे 'कोटिश्च कीटायते' हें प्रत्यक्ष दृष्टीस पडतें. तें सोमगड खेडें आतां अगदी भुईसरपट दिसत असून भोंवतालच्या शेतांतून वावरणारे शेतकरी किती तरी लहान दिसत आहेत. या विश्वसमूहांत आमची पृथ्वी म्हणजे मृत्तिकेचा एक कण आणि त्या कणावर कोटी कोटी मनुष्यांचा सुखानें समावेश होत आहे, यावरून मनुष्य म्हणजे किती क्षुद्र जीव आहे, याची सहज कल्पना पटते."

बहिणीचे हे विचार ऐकून पांडुरंग म्हणाला, "इंदू, तूं म्हणतेस तें खरें; पण आम्हीं आमचें हें क्षुद्रत्व मनांत वागवून स्वतःस केव्हांहि दुबळ समजतां कामा नये. आम्ही परमेश्वराचे अंशस्वरूप आहों, ही जाणीव नेहमीं मनांत असली पाहिजे, आणि त्याबरोबरच कर्तुमकर्तुम् सामर्थ्य आमच्या आंगी आहे, हें नेहमीं डोळ्यांसमोर दिसलें पाहिजे. असल्या चैतन्यापासून दूर राहून जो मनाच्या दुर्बळपणाच्या दडपणाखाली दबला जातो, त्याला वर उचलण्यास कोणीहि समर्थ नाहीं. मुक्ति अशा मनुष्यापासून दूर दूर पळत असते आणि जन्ममरणाच्या फेऱ्यांत तो अधिकाधिक गुरफटत असतो. दुबळ्या मनानें परमेश्वराचा कितीहि धांव केला, तरी तो परमेश्वराच्या कानापर्यंत पोहोंचत नाही. परमेश्वराला ऐकं-

जाईल, अशी जर हांक मारावयाची असेल, तर त्याला आत्मबळच पाहिजे. मी दुर्बळ आहें, मी सूक्ष्म आहें, कीटक आहें, हें भागूबाईचें दळण ऐकण्यासाठीं देवाला कानच नाहींत. त्याच्या कानांत फक्त त्याच्या खऱ्या भक्ताचे मर्दानी स्वर शिरत असतात. असो. यासंबंधानें पुढें केव्हांतरी मी तुला सांगेन. चल, आतां आपणास वर चढण्यास आरंभ केला पाहिजे. तो आपला मिवा गडी पहा, किती तरी उंच चढून गेला." पांडुरंग असें म्हणाल्यावर इंदिरा दगडावरून उठली व तिनें वर नजर फेंकली. तेव्हां तिला मिवा गडी बगळ्याप्रमाणें लहान दिसला. वर जाण्याची इंदिरेची इच्छा आतां अधिक वाढल्यामुळें ती झपाझप पाउलें टाकूं लागली. पुढील चढण अगदीं समोर अशी असल्यामुळें इंदिरेला थोडी भीति वाटत होती; पण चढण्याचा मार्ग अधिक सुरक्षितपणाचा असल्यामुळें तिची भीति हळुहळू कमी होत गेली. पुढील मार्ग आतां कांहीं विशेष नव्हता; पण गडाच्या अगदीं माथ्यावर पाऊल ठेवण्यास मध्यें आणखी दोन वेळां इंदिरेला विसावा घ्यावा लागला.

## प्रकरण तिसरें

# स्वप्नसृष्टि

सोमगडाच्या पठारावर पाऊल ठेवतांक्षणींच जो अभूतपूर्व देखावा इंदिरेच्या दृष्टीस पडला, तो पाहून इंदिरेचे डोळे दिपून गेले आणि तिच्या कल्पनेप्रमाणें नव्याच लोकांत आल्याप्रमाणें तिला वाटूं लागलें. तो पृष्ठभाग इतका शांत होता कीं, तेथें आल्यावर जणूं काय आपला आणि जगाचा संबंध तुटला असेंच क्षणभर वाटत होतें. पठार पुष्कळ विस्तृत असून त्याच्या उत्तर दिशेला एक शृंग आकाशांत उचच उंच गेलेलें दिसत होतें. तें पर्वताचें शिंग अगदीं चिंचोळें असून लहान लहान झुडपांनी हिरवेंगार दिसत होतें. इंदिरा व पांडुरंग ज्या वाटेनें पठारावर चढून आले होते, तीच वाट त्या शृंगाकडे गेली होती. ही वाट अगदीं सपाटीवरून गेलेली असल्यामुळें शृंगाकडे जाणें मुळीच कठिण नव्हतें. या शृंगाचें नांव गौतमशृंग असें असून पूर्वी गौतमऋषि आपल्या शिष्यगणांसह तेथें कांहीं वर्षें रहात होते, अशी आख्यायिका आहे. या गौतमशृंगाच्या पायथ्याला आठ दहा मोठमोठाल्या गुहा कोरलेल्या असून त्या अद्यापीहि चांगल्या स्थितीत आहेत. कोणी

कोणी या गुहा बुद्धकालीन असाव्यात असेंहि म्हणतात; परंतु बुद्धगुहांप्रमाणें तेथें कोणतीहि मूर्ति किंवा कसलीहि नकशी नाहीं, यावरून त्या गुहा वैदिक काळांतीलच असाव्यात, असेंहि पुष्कळांचें म्हणणें आहे. शिवाय त्या गुहा व तें शृंग गौतमांच्या नांवानें ओळखलें जातें, हेंहि लक्षांत ठेवण्यासारखें आहे. हें स्थान तपोवन या संज्ञेस पूर्ण योग्य असें आहे, असे तें पाहणारास आज देखील म्हणावें लागतें. तेथील प्रशांतपणा, तेथील सृष्टिसौंदर्य आणि स्वास्थ्यकारक हवापाणी हीं इतकीं अप्रतीम आहेत कीं, त्यांच्या दर्शनानें व अनुभवानें प्रापंचिकांच्या चित्तवृत्ती देखील क्षणभर उचंबळून येतात. ठिकठिकाणी उंचउंच हिरवेगार वृक्ष उभे असून लहान लहान झुडपें व वेली हीं तर सर्वत्र दृष्टीस पडतात. त्यांचीं पानें, फळें व फुलें हीं सर्वच नवीन असल्यामुळें त्या प्रत्येकाविषयीं अंतःकरणांत कौतुक उत्पन्न होतें. तीं तऱ्हेतऱ्हेचीं फुलें व फळें पहात असतां इंदू तर स्वतःस थोडा वेळ विसरूनच गेली. सुवासिक व सुंदर दिसणारी फुलें ती मधून मधून तोडून आपल्या पदरांतहि घेत होती. आणखी पुढें गेल्यावर जो एक रम्य देखावा इंदूच्या दृष्टीस पडला, तो पाहून इंदू आश्चर्यानें थक्क झाली. स्वच्छ पाण्याचें एक प्रचंड सरोवर व त्या सरोवरांत निरनिराळ्या रंगाचीं कमळें उगवलीं असून अनेक मनोहर पक्षी क्रीडा करीत आहेत, हें पाहून इंदूला साहजिक अत्यंत नवल वाटलें. त्या विस्तृत सरोवराच्या कांठीं ती उभी राहिल्यावर इंदूच्या पायावर जेव्हां पाण्याच्या लहान लहान लाटा आपटूं लागल्या, तेव्हां इंदूला अननुभूत असा आनंद होऊं लागला. पूर्वी एके काळी खरोखरच या सरोवरांत ऋषि व त्यांचा परिवार यांनीं स्नानें केल्यामुळें त्याचें पाणी अद्यापीहि पूर्ण उत्साहजनक आहे, असें इंदूला वाटलें. ती पांडुरंगाला म्हणाली, "दादा, तूं येथें चार दोन वेळां आलेला असल्यामुळें तुला एवढा आनंद वाटत नसेल; पण येथें आल्यापासून माझ्या अंतःकरणांत ज्या हर्षलहरी उचंबळत आहेत, त्यांची कल्पना खरोखरच तुला यावयाची नाहीं."

पांडुरंग हंसत हंसत म्हणाला, "इंदू, तुझा हा समज अगदीं चुकला. मी येथें पांच सहा वेळां तरी आलों असेन; पण त्या त्या वेळीं मनाला कमी आनंद झाला आहे, असें मुळींच नाहीं. अशी सृष्टिसौंदर्यानें नटलेलीं आणि अगदी एका बाजूला असलेलीं, पुष्कळ स्थळें आहेत; पण तीं पहात असतां एकट्या मनुष्यास क्वचित् भीति देखील वाटते. तसें येथें नाहीं. येथें केव्हांहि या, मनाला आनंद वाटून अंतःकरणांत पवित्र विचार उत्पन्न होतात. यावरून ही भूमि अनंत वर्षें साधुसमागम घडल्यामुळें पवित्र झाली असावी, हें अगदीं उघड होय. मागें मी एकदां आपल्या

दोघांतिघां स्नेह्यांना बरोबर घेऊन येथें आलों होतों. हें पहा, तें पहा, असें करतां करतां संध्याकाळ झाली, तेव्हां आम्ही तिघेहि जवळच असलेल्या एका गुहेंत खुशाल रात्रभर निजून राहिलों. त्या रात्रीं आमच्या चित्ताला भीति अशी शिवली देखील नाही. यावरून ऋषींच्या तपश्चर्येचा प्रभाव अजूनहि या भूमीवर राहिला आहे, हें उघड होय. प्रत्येक क्षणीं आनंदाच्या नवीनच लहरी अंतःकरणांत उत्पन्न करणारीं जी कांहीं स्थळें आहेत, तीं सर्व साधुसमागमामुळेंच इतकी प्रभावशाली झालीं आहेत. इंदू, आज तर मला पूर्वीपेक्षां अधिक मौज वाटत आहे. तुला इतके दिवस ज्या पुण्यभूमीबद्दल मी नुसत्या गोष्टीच सांगत होतों, ती भूमि तुला दाखविल्याबद्दल मला आज खरोखरच मोठी मौज वाटत आहे.” पांडुरंगाच्या मनांत आणखी कांही विचार उद्भवले; पण ते शब्दरूपानें बाहेर पडले नाहीत. ‘आज आपणाबरोबर दादासाहेब आले असते तर—’ असे शब्द त्याच्या अगदीं जिभेवर आले होते; पण इंदूच्या मनाला धक्का बसेल हा विचार मनांत येतांच ते शब्द त्यानें तसेच गिळले. वास्तविक या वेळी इंदूच्या अंतःकरणांतहि तेच विचार घोळत होते; पण आपल्या भावाच्या मनाला वाईट वाटेल एवढ्यासाठीं ती आपल्या मुखावर त्या विचाराची छाया देखील उमटवीत नव्हती. सरोवराच्या कांठीं उभी असतां ती किती वेळ तरी एकाग्र दृष्टीनें त्या सर्व सरोवराचें निरीक्षण करीत होती. ती सरोवरांतील रंगीबेरंगी कमलें व पक्षी यांकडे पहात होती हें खरें; पण तिच्या अंतःकरणांतले विचार त्याव्यतिरिक्त होते. काही वेळानें ती आपल्या दादाला म्हणाली, “दादा, आपण ज्या ओढ्याचें पाणी रोज उपयोगांत आणतों, त्या ओढ्याचें खरें उगमस्थान हें सरोवरच असावें नाहीं? पर्वताच्या अनेक छिद्रांतून हें पाणी खालीं येऊन नंतर आपण पाहतो त्या खबदाडांतून ओढ्याच्या रूपानें बाहेर पडत असावें. असेंच ना दादा?”

पांडुरंग म्हणाला, “होय इंदू. ज्या ओढ्याच्या पाण्याचें आपणास एवढें कौतुक वाटतें, तें पाणी याच सरोवराचें होय. तुला त्या ओढ्याची कर्तव्यतत्परता पाहून मोठें आश्चर्य वाटतें; पण या सरोवराची निश्चलता आणि ओढ्याची जागृति यांची संगति मात्र तुला लावतां येत नसेल. वास्तविक ओढा आणि सरोवर हीं एकच होत. ओढा या सरोवराचा एक अवयव होय. सरोवर देखील आपलें जनहिताचें कार्य अखंड करीत आहे; पण त्या जनहिताबद्दल सरोवराला मुळींच अभिमान नाहीं आणि म्हणून तो शांत आहे. महात्मे जगाच्या कल्याणासाठीं आपले देह कष्टवीत असतात; पण हें आपलें व्रत जगाच्या ते मुळींच लक्षांत येऊं देत नाहींत. इंदू

हा विश्वरूपी ग्रंथ म्हणजे ज्ञानभांडार होय. न वाचतां येणाऱ्या मनुष्यास पुस्तकापासून जसें कांहीं शिकतां येत नाहीं, त्याचप्रमाणें या विश्वरूपी ग्रंथाचें निरीक्षण करण्याची ज्यांना शक्ति नाहीं, त्यांना या प्रचंड विश्वकोशातूनहि कांही ज्ञानप्राप्ति होणार नाहीं. एकांतांत राहून परमेश्वरचिंतन करावें आणि जनतेंत राहून लोकसेवाहि करावी, हें तत्त्व या सरोवरापासून चांगलें शिकतां येण्यासारखें आहे. पावसाचा एकेक थेंब आपल्या उदरांत अगोदर सांठवावयाचा आणि मग लोकसेवेसाठी ओढ्याच्या रूपानें बाहेर पडावयाचें, या एका गोष्टीपासून हें उघड होतें कीं, ज्यांना उत्कृष्ट लोकसेवा करावयाची असेल, त्यांनीं अगोदर अगाध ज्ञानप्राप्ति करून घेतली पाहिजे. प्राचीन ऋषींच्या प्रत्येक शब्दाला जो अद्यापपर्यंत सर्व भरतखंडांत मान मिळत आहे, त्याचें कारण त्यांची ज्ञानपूर्णता हेंच होय. इंदू, चल, आपण आतां गुहांकडे जाऊं. ”

पांडुरंग असे म्हणाल्यावर इंदू त्याच्या मागें चालूं लागली; परंतु तिचें सर्व लक्ष सभोंवती दिसणाऱ्या देखाव्यानें आकर्षण केलें होतें. प्रत्येक पावलागणीं आपण नवाच चमत्कार पहात आहों, असे तिला वाटत होतें. सरोवरांपासून गुहांपर्यंत असलेला भाग साधारण सपाट असून त्यावर मधून मधून ओळखीची झाडें इंदूच्या दृष्टीस पडत होती. ती झाडें व सभोंवतालची जागा हीं पाहून पूर्वी एके काळीं तेथें ऋषींचा वास असावा, असे इंदूला उघड दिसून आलें. अथवा तिच्या डोक्यांत तेच विचार एकसारखे घोळत असल्यामुळें तिला तसें वाटलें असेल; पण इतकें खरें कीं, ती भूमि कोणाहि मनुष्याच्या दृष्टीस पडली, म्हणजे त्यास इंदूसारखेंच वाटत असे. लवकरच इंदू व पांडुरंग गुहांजवळ येऊन पोहोंचलीं. तेथें एका गुहेंत भिवा गडी अगोदरच येऊन विश्रांति घेत बसला होता. या गुहा सात असून त्या गौतम टेंगारावर कोरलेल्या होत्या. प्रत्येक गुहा एकमेकीपासून पृथक् असून एकेका गुहेंत पंधरावीस माणसांचा समावेश सहज होईल एवढी ती मोठी होती. गुहा उंच मात्र फार नव्हत्या. तरी कोणीहि उंच मनुष्य त्यांत सहज फिरूं शकेल एवढ्या त्या उंच होत्या. त्या सातहि गुहा इंदूनें फार काळजीपूर्वक पाहिल्या. तिची ती निरीक्षणपद्धति पाहून पांडुरंगाला हंसू आलें. तो म्हणाला, “ इंदू, काय शोधते आहेस ? ” पांडुरंगाचा हा प्रश्न ऐकून इंदू गंभीर स्वरानें म्हणाली, “ दादा, ज्या गुहांतून तपोनिधि ऋषी रहात होते, त्या गुहा पाहण्यास हे दोन डोळे अपुरे आहेत, असें मला वाटतें. त्या ऋषींचा प्रसाद–त्यांचीं कांहीं तरी स्मृतिचिन्हें येथें सांपडतील, म्हणून शोधतें आहें; पण कांहींच कोठें दिसत नाहीं. ” इंदूचे हे शब्द ऐकून पांडु-

रंगास पुनः हंसूं आलें. तो म्हणाला, "वेडे, केवढालीं तरी स्मृतिचिन्हें त्यांनीं मागें ठेवलीं आहेत. अनंतवर्षें तपश्चर्या करून त्यांनीं जीं तत्त्वें शोधून काढलीं, जीं ज्ञानमौक्तिकें त्यांनीं जगाच्या स्वाधीन केलीं, तींच त्यांचीं स्मृतिचिन्हें होत."

पांडुरंगानें असें सांगितलें, तरी इंदूनें त्या सातहि गुहा फार काळजीपूर्वक पाहिल्या. प्रत्येक गुहेस वंदन करून नंतर ती गुहेंत जात होती. सर्व गुहा साधारण स्वच्छ आहेत, हें पाहून इंदूला थोडें आश्चर्य वाटलें. तिनें त्यासंबंधानें पांडुरंगाला जेव्हां विचारलें, तेव्हां पांडुरंग म्हणाला, "इंदू, अजूनहि कांहीं महात्मे येथें येऊन रहात नाहींत, असें नाहीं. या शांत व आनंददायक स्थानाची ज्या कांहीं महात्म्यांना माहिती आहे, ते मधून मधून येथें येऊन राहतात. मी गुरुस्थानीं मानलेल्या एका महात्म्याची प्रथम याच गुहेंत गांठ पडली. ते पुष्कळ वेळां येथें येऊन राहतात."

त्या सर्व गुहा व त्यांसमोर दूर्वांकुरांनीं हिरवीगार झालेली सपाट भूमि पाहून इंदिरेच्या मनाला मोठा आनंद झाला. ती म्हणाली, "दादा, तूं सांगत होतास तितकें हें स्थान रमणीय असेल असें मला वाटलें नव्हतें; पण आतां प्रत्यक्ष पाहिल्यावर इतकें मनोहर व पवित्र स्थान हेंच एक असावें, असें वाटूं लागलें आहे. मला तर वाटतें, आजन्म येथेंच रहावें आणि ऋषीप्रमाणें परमेश्वरचिंतनांत काळ घालवावा."

इंदूचें हें भाषण ऐकून पांडुरंगाला हंसूं आलें. तो म्हणाला, "इंदू, असलीं रम्य स्थळें पाहिलीं म्हणजे बहुतेकांस असेंच वाटतें; पण अशा एकांतांत राहून परमेश्वरचिंतनांत काळ घालविणें वाटतें तितकें सोप नाहीं, हेंहि त्याबरोबरच लक्षांत ठेवलें पाहिजे. आमच्यासारख्यांनीं आपली आत्मोन्नति करून घ्यावयाची म्हणजे, ती समाजांत राहूनच करून घेतली पाहिजे. आम्ही अनेक सामाजिक ऋणांनी बद्ध झालेलों आहों. या ऋणांतून मुक्त झाल्यावर अशा एकांतांत येऊन राहिल्यास निर्विघ्नपणें परमेश्वरचिंतन करतां येईल; पण त्या अगोदर तसा प्रयत्न केल्यास आमच्या मनाकडूनच अनंत विघ्नें उत्पन्न होतील. समाजांतील आमचें प्रत्येक कर्तव्य आम्हीं चांगल्या रीतीनें करणें हा देखील परमेश्वरप्राप्तीचा एक मार्ग होय. 'आधीं प्रपंच करावा नेटका' म्हणून जो महात्म्यांनीं उपदेश केलेला आहे, त्याचा तरी उद्देश हाच होय; पण प्रपंच म्हणजे स्वार्थलोलुपता नव्हे, तर सर्वांचें कल्याण साधणें हा होय. आमचे बांधव अनेक प्रकारच्या विपन्नावस्थेंत सांपडलेले

आहेत, तेव्हां त्यांची ती कष्टजनक स्थिति दूर करून त्यांच्यासह आम्हांला ‘ नेटका प्रपंच ’ करावयाचा आहे, हें आम्ही विसरतां कामा नये. हें कर्तव्य न बजावतां सामाजिक ऋणांच्या भीतीनें जर आम्ही एकांतांत पळून येऊं, तर त्यानें आत्मोन्नति न होतां, अधोगति होण्याचाच अधिक संभव आहे.”

पांडुरंगाचे हे विचार इंदूला पसंत पडल्यासारखे दिसले नाहींत; पण ते त्याचे विचार खोडून कसे काढावेत हें तिला न सुचल्यामुळें तिनें मौनच स्वीकारलें होतें. राष्ट्रकार्य म्हणून एक मोठी जबाबदारी आपल्या शिरावर आहे, असें पुष्कळांना वाटतें आणि या जबाबदारीतून मोकळे होण्यापूर्वीच एकांतांत ईश्वरचिंतनांत काळ कठणें, ते भ्याडपणाचें समजतात. पांडुरंगहि याच मताचा होता, हें वाचकांच्या लक्षांत आलें असेलच. पर्वताच्या पठारावरील बहुतेक भाग पाहून झाल्यावर इंदिरा व पांडुरंग यांनी गुहेंत फराळ केले व दुपारचें ऊन कमी होईपर्यंत स्वस्थ विश्रांति घेतली. आणखी एकदोन घटकांनी सूर्यास्त होणार असे पाहून त्या तिघांनी खालीं उतरण्यास आरंभ केला. भिवा गड्यास डोंगरावर चढण्याउतरण्याची संवय असल्यामुळें तो डोंगराच्या उतारावरून भराभर उतरूं लागला. पांडुरंगासहि उतारावरून चालण्यास त्रास होत नव्हता; परंतु चढण्याच्या श्रमामुळें इंदिरेचे पाय लटपटावयास लागले होते आणि तशा स्थितीत उतरतांना तिच्या अंगाचा थरकांप होत होता. चढण्यापेक्षां पर्वतावरून उतरणें जरी सोपे असलें, तरी खोल खोल दऱ्या व तुटलेले कडे हीं एकदम डोळ्यांपुढें दिसत असल्यामुळें व उतारावरून झोंक जाण्याची भीति असल्यामुळें संवय नसलेल्या मनुष्यास साहजिक भीति वाटते. एक तर इंदिरा अगदीं थकून गेलेली आणि पाय निसटेल की काय अशी भीति वाटत असलेली; यामुळें डोंगरावरून उतरतांना इंदिरेची स्थिति अगदीं करुणाजनक झाली होती. उतरतांना देखील तिनें एक दोन ठिकाणीं विश्रांति घेतली आणि कित्येक ठिकाणीं तर तिला पांडुरंगाच्या हाताचा आश्रय घेऊन खालीं उतरावें लागलें. डोंगराच्या पायथ्याशीं जसजशी ती येऊं लागली, तसतशी तिची भीति कमी होऊन समोर दिसणाऱ्या सृष्टिसौंदर्याकडे तिचें लक्ष जाऊं लागलें. रानांतून गावांकडे पळत असलेले गुरांचे कळप, त्यांच्यामागें धांवणारे गुराखी, आपापल्या घरट्याकडे पळत सुटलेले पक्ष्यांचे थवे, तो नेहमीं डोळ्यांपुढें दिसणारा ओढा, स्वतःचें घर; हीं सर्व जेव्हां इंदिरेला दिसूं लागलीं, तेव्हां ती आपले श्रम साहजिक विसरली आणि त्यासंबंधानें पांडुरंगाबरोबर बोलण्यासहि तिनें आरंभ केला. इतका वेळ अगदीं गप्प असलेली इंदिरा आतां बोलत आहे, हें पाहून पांडुरंगासहि

साहजिक बरें वाटलें. खाली उतरल्यावर त्यांनी कुशावर्तांत हातपाय वगैरे धुवून थोडी विश्रांति घेतली व सोमेश्वराचें दर्शन घेऊन नंतर ते तिघे घरीं परतले. इंदिरा आज सोमगडावर गेलेली असल्यामुळें घरीं पार्वतीबाईला सारखी हुरहुर वाटत होती. तिघांनाहि समोरून येतांना पाहून तिची हुरहुर एकदम नाहींशी होऊन तिचें अंतःकरण गहिंवरून आलें. ती पांडुरंगाला उद्देशून किंचित् रागानें म्हणाली, "पांडुरंग, इंदूला संवय नाही. तिला कशाला बरें डोंगरावर घेऊन गेलास? तिचा चेहरा पाहिलास का किती सुकून गेला आहे तो!"

आईचे ते शब्द ऐकून पांडुरंगानें आपली नजर साहजिक इंदूकडे वळविली. त्याला आतां इंदूचा चेहरा बराच कोमेजलेला दिसला. तो त्यासंबंधानें आईला कांही सांगणार, त्याच्या आधींच इंदिरा म्हणाली, "आई, मला संवय नसल्यामुळें मी अगदीं थकून गेलें हें खरें, पण आज मीं जी मौज पाहिली, तशी पूर्वीं कोठें देखील पाहिली नव्हती. खरेंच आई, तूं येशील एकदां सोमगडावर?" इंदिरेच्या या प्रश्नास पार्वतीबाईनें कांहींच उत्तर दिलें नाहीं. ती स्वयंपाकघरांत गेली आणि रात्रीचा स्वयंपाक करूं लागली. या वेळीं इंदिरा जरी अगदीं थकली होती, तरी आई कांहींशी रागावली आहे, असें पाहून ती सोमगडावरच्या अनेक गोष्टी आई-जवळ बसून तिला सांगूं लागली. प्रथम पार्वतीबाईला त्या दोघांचाहि थोडा राग आला होता; पण इंदूच्या गोड गोड गोष्टी आणि पर्वतावरील मनोरंजक हकिकती ऐकून तिचा राग पार नाहींसा झाला. खरें पहातां पार्वतीबाईला राग आला होता, असे म्हणण्यापेक्षां अधिक प्रेम दाटून आलें होतें, असेंच म्हणणें अधिक सयुक्तिक होईल. डोंगरावर पाहण्यासारखें जसें पुष्कळ असतें, तसें भीती वाटण्यासारखेंहि पुष्कळ असतें, या समजुतीनें पार्वतीबाईनें त्या दोघांनाहि लवकर येण्याविषयी बजाविलें होतें. परंतु त्या दोघांनीं दिव्यांत वात पडेपर्यंत रानांत वेळ काढल्यामुळें तिला साहजिक काळजी वाटत होती व नाहीं नाहीं ते विचार तिच्या मनांत येत होते. इतक्यांत त्या दोघांना पाहून तिच्या अंतःकरणांत आनंदाचें साम्राज्य उसळलें, पण तोंडांतून मात्र रागाचे शब्द बाहेर पडले. हे शब्द ऐकून पांडुरंग व इंदिरा या दोघांनाहि वाईट न वाटतां, थोडा आनंदच झाला असावा.

पार्वतीबाईचा स्वयंपाक झाल्यावर इंदूनें कसे तरी दोन घास खाल्ले आणि ती आपल्या आंथरुणावर जाऊन पडली. ती अगदीं थकून गेली होती. तिचे पाय चांगलेच दुखावयास लागले होते; यामुळें बिछान्याला पाठ लागतांच तिला गाढ झोंप लागली. कांहीं वेळ गेल्यावर या गाढ झोंपेचा अम्मल संपला आणि तिला

एक स्वप्न पडण्यास आरंभ झाला. पुनः तो ओढा, तें सोमेश्वराचें देऊळ आणि तो सोमगड पर्वत हीं तिच्या डोळ्यांसमोर दिसूं लागलीं. एक व्यक्ति तिच्याजवळ उभी असून ती सोमगडावर येण्याविषयी इंदिरेला आग्रह करीत होती आणि इंदिरा निश्चल उभी राहून गडावर जाण्यास अनुत्सुकता दर्शवीत होती. शेवटीं त्या व्यक्तीचें म्हणणें इंदिरेला कबूल करावें लागलें. ती निमूटपणें तिच्यामागें जाऊं लागली. या व्यक्तीचा पोशाक साहेबी थाटाचा असून तिच्या मागून इंदिरा मोठ्या कष्टानें चालली होती. ही व्यक्ति म्हणजे विजयगडचे संस्थानिक दादासाहेब होत. यांच्याचबरोबर इंदिरेचा विवाह होण्याचें ठरलें होतें. दादासाहेब पुढें चालले असून इंदिरा त्यांच्यामागून चालली होती. वास्तविक दादासाहेबांना स्वप्नांत पाहून देखील इंदिरेला आनंद व्हावयाचा; पण या स्वप्नांत दादासाहेबांच्या चेहऱ्यावर रागाचीं आणि तिरस्काराचीं चिन्हें मुबलक दिसल्यामुळें इंदिरा त्यांच्यामागून भीत भीत चालली होती. जणूं काय सोमगडावर संधिप्रकाश पडलेला असून त्या प्रकाशांत आपण अडखळत अडखळत डोंगर चढत आहों, असे इंदूला स्वप्नांत दिसूं लागलें. इंदूनें आपला हात आपल्या हातांत द्यावा म्हणून दादासाहेब आपला हात वारंवार पुढें करीत होते; पण इंदिरा आपला हात मागें घेत होती. दादासाहेबांच्या हातांत हात देण्यास तिला भीति व संकोच वाटत होता. शेवटी दादासाहेबांनी आपले रागानें लाल झालेले डोळे इंदूवर रोंखले व तिची इच्छा नसतांहि तिचा हात बळजबरीनें आपल्या हातांत घेतला. इतकेंच नव्हे, तर त्यांनी तो हात करकचून दाबून धरला व ते तिला सोमगडावर ओढून नेऊं लागले. इंदिरेला अधिक अधिक भीति वाटूं लागली. ती केविलवाण्या नजरेनें दादासाहेबांकडे पाहूं लागली; परंतु त्यांना तिची दया येण्याऐवजी राग मात्र आला. दादासाहेब तिला ओढीत नेत असतां तिचे दोन्ही पाय ठेचाळले आणि त्यामुळें ती रडूं लागली. ती रडत रडत दादासाहेबांना म्हणाली, "मला सोडा, मला घरीं जाऊं द्या. पर्वतावर चढतांना मला फार भीति वाटते." यावर दादासाहेब आपले दांत चावून इंदिरेला वेडावीत म्हणाले, "भीति वाटते! वा! डोंगरावर तर फार मौज आहे. ऋषी आहेत, ऋषींच्या गुहा आहेत, तपोभूमि आहे आणि पवित्र तीर्थ आहे. हें असें वैभव राजवाड्यांत देखील पहावयाला मिळावयाचें नाहीं. तुला ऐश्वर्याचा कंटाळा आला असून गुहेंत राहून तपश्चर्या करावयाची आहेना? चल तर मग डोंगरावर. त्या गुहेंत बसवून मग मी तुझा निरोप घेईन." असें म्हणून दादासाहेब तिला फरफरां ओढून आपल्यामागून नेऊं लागले. दादासाहेब आपणः-

वर कां रागावले आहेत, हें आतां इंदिरेच्या लक्षांत येऊन ती निमूटपणें त्यांच्या-मागून चालूं लागली. डोंगराच्या सुळसुळीत सुळक्यावर देखील दादासाहेब बुटाच्या पायांनी झटकन् चढत होते; पण तोच सुळका चढण्यास इंदिरेला जीव अगदीं नकोसा होऊन जाई. चढतां चढतां तें सोमगडावरील पठार इंदूला दिसूं लागलें. दादासाहेब तिला आतां सरोवराकडे ओढून नेऊं लागले. अगदीं सरोवराच्या कांठीं आल्यावर दादासाहेब अधिक उग्र स्वरूप धारण करून म्हणाले, "इंदू, एका संस्था-निकाची गृहिणी होण्याला तू मुळीच योग्य नाहीस. जिच्या अंगी विलासलोलुपता नाही, अशा स्त्रीबरोबर विवाह करण्याची माझी इच्छा नाही. पण तुझ्याबरोबर वचनबद्ध झाल्यामुळें मला दुसरा विवाहहि करतां येणार नाही, म्हणून मी तुला या सरोवरांत फेकून देणार. तेथें मग खुशाल तपश्चर्या कर!" दादासाहेबांचे हे शब्द ऐकून इंदिरा भयानें अगदीं व्याकुळ झाली. तिनें एक हिसका मारून आपला हात दादासाहेबांच्या हातांतून सोडविला आणि ती त्वरेनें वाट सापडेल तिकडे पळूं लागली. तिच्या मागें दादासाहेबहि पळत होतेच. डोंगराच्या उतारावरून पळतां पळतां इंदूनें आपलें घर गांठलें; पण आतां दादासाहेब अगदीं तिच्या जवळ आल्या-मुळें तिनें मोठ्यानें किंकाळी फोडून आपल्या दादाला हांक मारली. डोंगरावरील चढण्याच्या श्रमानें या वेळीं पांडुरंगास अगदीं गाढ झोंप लागली होती; पण तो देखील इंदिरेची ती किंकाळी ऐकून जागा झाला. तो तत्क्षणीं इंदिरेच्या खोलीत गेला. तेथें इंदिरा आपल्या अंथरुणावर उठून बसलेली असून ती अगदीं घाबरलेली आहे, हें पाहून पांडुरंगाच्या पोटांत साहजिक धस्स झालें. तो घाईघाईनें म्हणाला, "इंदू, कां ओरडलीस? काय झालें?" इंदू त्या विलक्षण स्वप्नांतून जागी होऊन अंथरुणावर बसली होती, तरी अद्यापि तिची भीति कमी झाली नव्हती. तिचें सर्वांग घामानें डबडबून निघालेलें असून हृदय थरथर कांपत होतें. आपल्या भावाकडे कांहीं चमत्कारिक दृष्टीनें पाहून ती अस्पष्ट स्वरानें म्हणाली, "कांही नाही. मला एक चमत्कारिक स्वप्न पडलें आणि त्यांत मी ओरडलें. दुसरें कांही नाही." इंदूचें हें उत्तर ऐकून अशा कोणत्या चमत्कारिक स्वप्नामुळें ही घाबरली, हें जाणण्याची पांडुरंगास साहजिक इच्छा झाली व त्यानें तिला तें विचारलेंहि; परंतु इंदूनें आपला स्वप्नवृत्तांत सांगण्याची टाळाटाळीच केली. ती म्हणाली, "मला चांगले कांहीं आठवत नाही; पण मी डोंगरावरून घसरत आहें, असें मला स्वप्नांत दिसलें आणि त्यामुळें मी घाबरून ओरडलें." इंदूनें दिलेल्या या उत्तरानें पांडुरंगाचेंहि समाधान झालें. इंदिरा डोंगर उतरून नुकतीच आल्यामुळें तिला असें स्वप्न पडणें

साहजिक आहे, असें पांडुरंगास वाटलें व त्यानें त्या दृष्टीनें इंदिरेला दोन धीराच्या गोष्टीहि सांगितल्या. इंदिरेला पुनः भीति वाटूं नये म्हणून तो तिच्याच खोलींत निजला व त्याला थोड्या वेळानें चांगली झोंपहि लागली. परंतु इंदिरा मात्र अंथरुणावर जागीच होती. त्या स्वप्नासंबंधानें तिच्या मनांत अनेक प्रकारचे विचार येत होते व झोंप लागल्यास पुनः तेंच स्वप्न पडेल की काय, अशी तिला भीतीहि वाटत होती. वास्तविक एकाद्या स्वप्नानें भिऊन जावें, इतकी कांहीं इंदू भित्री नव्हती; पण या स्वप्नानें जणूं काय आपणास आपल्या भावी परिस्थितीचेंच चित्र दाखविलें, असें इंदूला वाटलें आणि त्यामुळें तिच्या मनांत तेच विचार एकसारखे घोळूं लागले. दादासाहेबांचा आणि आपला विवाह होऊं नये म्हणून जो कित्येकांचा प्रयत्न चालला आहे, तो अशा रीतीनें फलद्रूप होणार, असे इंदूला वाटूं लागलें. ती स्वतःशींच म्हणाली, "मजबरोबर विवाह न करण्याचा दादासाहेबांनी बहुतेक निश्चय केला असावा; आणि वडिलांच्या वचनांतून मोकळे होण्यासाठी ते मूर्ख लोकांच्या नादीं लागून माझा कांटा कदाचित् अशा निष्ठुर उपायानें काढणार नाहींत, हें तरी कोणीं सांगावें? दुसऱ्या एका मुलीची त्यांच्यासाठी योजना देखील झाली आहे, असें पुष्कळ सांगतात; तेव्हां या स्वप्नानें मला माझा भविष्यकाळच दाखविला नसेल कशावरून?".

अशा प्रकारचे शतशः विचार इंदिरेच्या मनांत घोळत होते. त्यांतले कांही विचार तर इतके क्षुद्र होते कीं, ते अंतःकरणात उत्पन्न झाल्याबद्दल इंदिरेला अत्यंत खेद झाला. वास्तविक एकाद्याचें अंतःकरण कितीहि उदात्त असलें, तरी केव्हां केव्हां क्षुद्र विचार चित्तांत सहज येतात. त्याला कांही उपाय नाहीं; परंतु तेवढ्यावरून अंतःकरणाची परीक्षा मात्र कोणीं करूं नये. या स्वप्नानें इंदिरेचें मन दादासाहेबांसंबंधानें साशंक झालें हें खरें; पण त्यांच्यासंबंधानें तिच्या मनांत वाईट असा एकहि विचार आला नाहीं. स्वतःसंबंधानें मात्र ती नाहीं नाहीं तीं भविष्यें वर्तवूं लागली. उरलेली सगळी रात्र तिनें त्याच विचारांत घालविली. या स्वप्नानें तिच्यासारख्या समजूतदार मुलीनें एवढें घाबरावयास नको होतें, हें खरें, पण तिच्या विवाहाची जी गुंतागुंत झाली होती, त्यासंबंधानें नेहमींच तिच्या मनांत नानाप्रकारचे विचार येत असत. त्यांत आणखी अशा प्रकारच्या स्वप्नाची भर पडल्यामुळें या विचारांचें क्षेत्र अर्थातच वाढलें आणि त्यांत अनेक बऱ्यावाईट विचारांची गर्दी होऊं लागली. हल्लीं दादासाहेबांच्या भोंवती जीं नीच वृत्तीचीं माणसें गोळा झालेलीं आहेत, त्यांच्या प्रयत्नास यश आलें आणि दादासाहेबांनी खरोखरच जर आपणाबरोबर विवाह करण्याचें नाकारलें, तर आपली स्थिति किती अनुकंपनीय होईल, हा विचार जेव्हां

इंदिरेच्या मनांत आला, तेव्हां खरोखरच तिचें अंतःकरण थरारून गेलें. दुर्दैवानें असें जर घडलें, तर आजन्म अविवाहित रहावें लागेल आणि अविवाहित राहिल्याबद्दल समाजाची सहानुभूति मिळण्याऐवजीं समाजाकडून आपली निंदा मात्र मुबलक होईल; हें दुःस्वप्न इंदिरेस स्पष्ट दिसूं लागलें. दुसऱ्या दिवशीं उजाडल्यावर ती जेव्हां घरांतले कांहीं उद्योग करूं लागली, तेव्हां तिला थोडें बरें वाटूं लागलें व तिची ती स्वप्नचिंता हळूहळू दूर होऊं लागली. घरांतलें काम संपल्यावर तिनें चांगलीं चांगली पुस्तकें वाचण्यासाठी घेतलीं आणि तिकडे आपलें मन गुंतविलें.

सोमेश्वर गांव लहान असल्यामुळें तेथें पोस्टाची सोय नव्हती. आठवड्यांतून एकदां शिपायी त्या गांवाला येई आणि कोणाची पत्रें वगैरे असल्यास तीं त्यांना देई. उन्हाळ्याच्या दिवसांत जे कित्येक हवा पालटण्यासाठीं तेथें जातात, त्यांना हा आठ दिवसांचा वायदा सहन होण्यासारखा नसल्यामुळें ते आपलीं पत्रें खंडाळयास मागवितात व तेथून तीं मनुष्य पाठवून आणवितात. पांडुरंगानेंहि अशीच व्यवस्था केली होती. त्या दिवशी पांडुरंगाचा मनुष्य पत्रें वगैरे केव्हां घेऊन येतो, असें इंदूला झालें होतें. कारण त्यांत कांहीं वर्तमानपत्रें वगैरे असतील व तीं वाचण्यांत बराच वेळ निघून जाईल, असें तिला वाटत होतें. इतक्यांत ठरलेल्या वेळीं तो मनुष्य टपाल घेऊन आला आणि त्यानें तें पांडुरंगाच्या टेबलावर ठेवलें. टपाल टेबलावर पडतांच इंदिरेनें घाईघाईनें एक वर्तमानपत्र घेतलें व तें ती वाचूं लागली. पांडुरंगानें प्रथम वर्तमानपत्रांस हात घातला नाहीं. कांहीं महत्त्वांच्या पत्रांची तो वाट पहात असल्यामुळें त्यानें प्रथम कार्डपाकिटासच हात घातला. तीं पत्रें वाचीत असतां तो मध्येंच म्हणाला, "ओहो! दादासाहेब विलायतेहून या बोटीनें येणार!" हे शब्द ऐकून इंदिरेच्या हृदयांत धस्स झालें व तिचा चेहरा पुन्हां खिन्न व उदास दिसूं लागला. इंदिरा आतां कांहींतरी म्हणेल, अशी पांडुरंगाची अटकळ होती; पण ती आतां चित्राप्रमाणें स्थिर बसून तिनें आपली नजर पांडुरंगाकडे ठेवली होती. पार्वतीबाई याच वेळीं कांहीं कामासाठीं पांडुरंगाच्या खोलीत आली होती, ती पांडुरंगाचे ते शब्द ऐकून म्हणाली, "कशावरून ते येणार?"

आईचा हा प्रश्न ऐकून पांडुरंग म्हणाला, "हें पहा, मुंबईहून दिनकराचें पत्रच आलें आहे. मी तें तुला वाचून दाखवितों. तो लिहितो कीं, 'येत्या शुक्रवारीं सकाळीं दादासाहेब मुंबईबंदरांत उतरणार आहेत. त्यांना उतरून घेण्यासाठीं नानासाहेब कांहीं मंडळीसह आगाऊच येथें आले आहेत. आपणहि त्यांना उतरून घेण्यासाठीं येथें यावें अशी माझी सूचना आहे. आपण अवश्य येथें या. म्हणजे पुढें काय

व्यवस्था करावयाची याचा विचार चार मित्रमंडळीसह करतां येईल.' आई, दिनकरची ही सल्ला अगदीं योग्य अशी आहे. तेव्हां मी आजच मुंबईस जातों. तुम्हीहि आपली सर्व तयारी करून पुण्यास जा. मी परभारेंच मुंबईहून पुण्यास येईन." दादासाहेब येणार आहेत, हें ऐकून पार्वतीबाईला मोठें समाधान झाल्यासारखें दिसलें. दादासाहेबांची मुलाखत कशी घ्यावी वगैरे संबंधानें पांडुरंगाला योग्य तो सल्ला देखील तिनें दिला. इंदू मात्र स्तब्ध बसली होती. काल रात्रीं पडलेलें स्वप्न आणि आज दादासाहेबांची येण्याची खबर, या दोन गोष्टींचा काय संबंध असावा, याविषयीं तिच्या मनांत विचार घोळत होते. स्वप्नावर विश्वास ठेवूं नये असें एका क्षणीं तिला वाटे, तर दुसऱ्याच क्षणीं दादासाहेब येण्याच्या बातमीमुळें स्वप्नांत कांहींतरी रहस्य असावें, असेंहि तिला वाटे. आपलें मन दुसरीकडे गुंतावें म्हणून इंदिरेनें त्या दिवशीं पुष्कळ प्रयत्न केला, तरी मधून मधून ते विचार तिच्या मनाला त्रास देतच होते. इकडे पांडुरंगाची मुंबईस जाण्याची तयारी मोठ्या त्वरेनें चालली होती. जेवण वगैरे उरकून घराच्या बाहेर पडतांना त्यानें आईबरोबर इंदूचाहि निरोप घेतला; परंतु इंदिरेनें आपल्या दादाला निरोप देतेवेळीं जे अनेक मनोविकार चेहऱ्यावर उमटविले होते, ते पाहून पांडुरंगाच्या हृदयांत चर्र झालें. कांहींएक न बोलतां त्यानें आशा-निराशेच्या मिश्रणाचा एक उसासा टाकला आणि तो स्टेशनच्या रस्त्यानें चालूं लागला. दादासाहेबांची गांठ घेणें मोठेंसें कठिण आहे, असे इतका वेळ त्याला वाटत नव्हतें; पण इंदिरेचा खिन्न व उदास चेहरा पाहिल्यावर दादासाहेबांची मुलाखत घेणें विशेष महत्त्वाचें आहे, असे त्याला वाटलें व मुंबईस येईपर्यंत तो त्याच गोष्टीचा विचार करीत होता. दिनकरला अगोदरच सूचना मिळालेली असल्यामुळें तो पांडुरंगास नेण्यासाठीं बोरीबंदरच्या स्टेशनवरच आला होता. पुष्कळ दिवसांनी दिनकरच. गांठ पडल्यामुळें पांडुरंगास फार आनंद झाला, दिनकरच्या घरी गेल्यावर तेथें आणखी कांहीं स्नेही आपली वाट पहात बसले आहेत, असें पांडुरंगास आढळून आलें, व त्या सर्वांना पाहून त्याला साहजिक आनंद झाला. त्या सर्वांच्या भेटीमुळें पांडुरंगाची काळजी दूर झाली, असें कांहीं नाहीं; पण सल्ला–मसलतीसाठीं चार चांगल्या स्नेह्यांचें साहाय्य आहे, हें त्याच्या लक्षांत आल्यामुळें त्याच्या चित्तांत एक प्रकारचें समधान उत्पन्न झालें. आरंभीं एकमेकांस कुशलप्रश्न वगैरे विचारणें झाल्यावर लवकरच मुद्यावर गोष्ट आली व दादासाहेबांची गांठ कशी घ्यावयाची याची वाटाघाट सुरू झाली. नानासाहेब आपल्या परिवारासह आगाऊच आलेले असल्यामुळें त्यांना आपला विचार कळतां कामा नये, नाहींतर ते राजश्री दादासाहेबांची

व आपली गांठच पडूं देणार नाहींत, हें सर्वांना माहीत असल्यामुळें दादासाहेबांची भेट कशी घ्यावयाची, याचा विचार करण्यास अर्थातच बराच वेळ लागला. सर्वांचें एकमत झाल्यावर पांडुरंगाच्या स्नेह्यांनीं पांडुरंगाचा व दिनकरचा निरोप घेतला आणि ते घरोघर निघून गेले.

## प्रकरण चवथें

# विलायतचें हवापाणी

मुकुंद ऊर्फ दादासाहेब आणि इंदिरा यांचा विवाहसंबंध घडूं नये म्हणून नानासाहेबांनीं जो एवढा दांडगा प्रयत्न चालविला होता, त्याबद्दल पुष्कळांना आश्चर्य वाटण्यासारखें आहे: परंतु नानासाहेबांच्या विलक्षण हेतूची कल्पना झाल्यावर मात्र हें आश्चर्य साहजिक कोणासहि वाटणार नाही. इंदिरेसारख्या सुशील व सद्गुणी मुलीबरोबर दादासाहेबांचा विवाह होऊ नये, असे म्हणण्यास नानासाहेबांजवळ सयुक्तिक असें कारण कोणतेंच नव्हतें; परंतु त्यांना तो विवाह पसंत नव्हता, एवढें मात्र खरें आणि या नापसंतीचें कारण त्यांच्या नीच मनोवृत्तीची आकांक्षा हें होय. मनुष्य म्हटला की, त्याला कांही ना कांहीं तरी महत्त्वाकांक्षा ही असावयाचीच कित्येकांची महत्त्वाकांक्षा अति उच्च कोटीतली असते. त्यांचा सर्व प्रयत्न केवळ परमेश्वरप्राप्तीसाठी चाललेला असतो. कित्येकांची महत्त्वाकांक्षा मध्यमप्रतीची असते म्हणजे निढळच्या घामानें पैसा मिळवून पुढें यावयाचें किंवा स्वतःच्या विद्वत्तेच्या बलावर जगांत कीर्तिमान् व्हावयाचें. तिसरी म्हणजे शेवटची महत्त्वाकांक्षा ही नीच महत्त्वाकांक्षा होय. वाटेल तीं नीच कृत्ये करून ऐश्वर्य भोगावयाचें व चैन करावयाची, ही जी मनःप्रवृत्ति, तिलाच नीच महत्त्वाकांक्षा असें म्हणतात. आमचे नानासाहेब विद्वान् होते, हुषार होते सुशिक्षित होते, बऱ्यावाईट मार्गानें त्यांनीं विजयगड संस्थानची दिवाणगिरीहि मिळविली होती; तेव्हां आहे ही स्थिति बरी आहे, असें मानावयाला त्यांना कांहीं अडचण नव्हती; पण नीच महत्त्वाकांक्षेस बळी पडल्यामुळें त्यांना त्या स्थितींत समाधान न वाटतां त्यापेक्षां निराळी स्थिति उत्पन्न करण्यासाठीं त्यांनीं भगीरथ प्रयत्न चालविला होता. या त्यांच्या प्रयत्नाची संगति लक्षांत येण्यासाठीं नानासाहेबांचें यथातथ्य शब्दचित्र येथें रेखाटण्याचा आमचा विचार आहे.

शुक्रवारचा दिवस उजाडण्यास मध्यें एक गुरवारचा दिवस जावयाचा होता व तो दिवस केव्हां एकदां जातो, असें नानासाहेबांना झालें होतें. पूर्वी विद्याभ्यासासाठीं दादासाहेब जेथें राहिले होते, त्याच बंगल्यांत नानासाहेब येऊन उतरले होते. ती पूर्वीची शाळेंत जाणारी सुदर मुलगी अद्यापि याच बंगल्यांत दिसत होती. यावरून या बंगल्यांत नानासाहेबांचें कांहीं तरी रहस्य असावें हें अगदी उघड होय. सायंकाळच्या सुमारास बाजारांतून हारतुऱ्यांची वगैरे खरेदी करून नानासाहेबांची स्वारी एका कोचावर हुश्श हुश्श करीत व पंख्यानें वारा घेत बसली असतां त्यांना कोचावर बसून थोडा वेळ होतो न होतो, तोंच आंतून एक पस्तीस चाळीस वर्षाची स्त्री आली व तिनें नानासाहेबांच्या हाती एक चहाचा पेला दिला. हंसत हंसत तो पेला समोरच्या टेबलावर ठेवून नानासाहेब म्हणाले, " मुंबईस राहून तुम्हांला ही भलत्याच वेळीं चहा घेण्याची संवय लागली वाटतें. पण आपण देखील माझ्याबरोबर चहा घेतला पाहिजे हो. " ती स्त्री लाजण्याची उसनी ऐट आणून म्हणाली, " छेः, मला नको. मीं मघांच घेतला. आपणास बाहेरून येण्यास वेळ झाला, म्हणून आतां चहा करून आणला. त्यांत भलतीच वेळ ती कसली ? आणि आतां संवयीनें कोणत्याहि भलत्या गोष्टीबद्दल असा विस्मय वाटण्याचें तुम्हांला कांही कारण उरलेलें नाही. "

ही स्त्री जरी पस्तीसपेक्षां अधिक वयाची होती, तरी तिच्या चेहऱ्यावर तारुण्याची छटा कायम असून स्वभावतःच तिच्या शरीराची ठेवणहि मोठी मोहक होती. तिला नटण्यामुरडण्याची हौस विशेष होती आणि तिच्या गोंडस शरीरयष्टीमुळें तें नटणेंमुरडणें तिला शोभतहि असे. तिचा भालप्रदेश सुदर व रमणीय होता; पण त्यावर कुंकम–तिलक नव्हता. यावेळीं ती पांढरें स्वच्छ पातळ नेसली होती; पण ती तें इतक्या खुबीनें नेसली होती कीं, नानासाहेबांस देखील त्याबद्दल कौतुक वाटलें. तिचे वरील शब्द ऐकून नानासाहेब किंचित् मोठ्यानें हंसून म्हणाले, " असल्या पांडित्याबद्दल आपली पहिल्यापासूनच प्रसिद्धि आहे; तें काय वाटेल तें असलें, तरी आपण माझ्याबरोबर थोडा तरी चहा घेतलाच पाहिजे. आपण घेत नसाल तर मलाहि चहा नको." ती स्त्री गालांतल्या गालांत हंसून म्हणाली, "एवढा धाक घातल्यावर आतां कांहीं नाहीं म्हणण्याची सोय नाहीं." ती स्त्री असें म्हणून नानासाहेबांच्याजवळ कोचावर बसली, आणि मोठ्यानें ' रामा रामा ' म्हणून हांका मारूं लागली. इतक्यांत त्या दिवाणखान्याच्या दाराशीं एक चवदा पंधरा

वर्षाची सुदर मुलगी आली व आईशेजारीं नानासाहेब दृष्टीस पडल्यामुळें चपापल्यासारखें करून ती म्हणाली, "रामा बाहेर गेला आहे. तूंच ना त्याला भाजी आणावयास पाठविलेंस." हें ऐकून कोचावर बसलेली स्त्री हसत हसत म्हणाली, "खरेंच, मला अगदीं आठवणच नाहीं. बरें शारदे, चहादाणींत चहा आहे, तीतून मला एक पेलाभर चहा आणून दे."

आलेल्या मुलीचें नांव शारदा होय. दादासाहेब मुबईस शिकत असतां जी एक सुंदर व नटवेबाज मुलगी प्रत्यहीं त्यांच्या दृष्टीस पडत होती, तीच ही मुलगी होय. ही मुलगी जात्याच सुदर असून तिला आतां पंधरावें वर्ष लागल्यामुळें ती अधिक मोहक दिसत होती. याच मुलीच्या सौंदर्यावर नानासाहेबांना आपली सर्व इमारत रचावयाची होती. त्या स्त्रीनें सांगितल्याप्रमाणें शारदेनें पेला भरला आणि तो टेबलावर ठेवून ती पुन्हां आंत निघून गेली. ती आंत जात असतां नानासाहेबांनीं आपला डोळ्यावरचा चष्मा काढून शारदेवर नजर टाकली व ती आंत गेल्यावर चष्मा चढवून म्हणाले, "उद्यां बंदरावर शारदेला बरोबरच घेऊन गेलें पाहिजे. माझी अशी खात्री आहे की, अशा स्थितींत तिला पाहिल्यावर दादासाहेब अगदीं मुग्ध होऊन जातील ! हें असलें रत्न नानासाहेबांच्या खिशांत आहे, एवढें त्यांच्या लक्षांत आलें, म्हणजे दादासाहेब नानासाहेबांच्या मुठींत आले, असे म्हणण्याला कांहीं हरकत नाहीं." या वेळी नानासाहेब त्या स्त्रीच्या अगदीं जवळ बसून व कांहीं चमत्कारिक दृष्टीनें तिच्याकडे पाहून हंसत हंसत म्हणाले, "शारदा एकदां संस्थानची मालकीण झाल्यावर मग संस्थानिकाच्या या सासुबाईनी संस्थानिकाला आपल्या दोन्ही हातांनीं वाटेल तसें लुटावें !"

ती स्त्री मोठ्यानें हंसत हंसत म्हणाली, "आणि तें लुटलेलें इकडच्या खिशांत आणून सांठवावें. नाहीं ?" त्या स्त्रीच्या या प्रश्नास नानासाहेबांनीं हंसण्याशिवाय दुसरें कांहीं उत्तर दिलें नाहीं. त्यांना 'इकडच्या' या शब्दाची खुमारी या वेळीं इतकी कांहीं जाणवली कीं, ते थोडा वेळ स्वतःस विसरून जाऊन भविष्यकाळच्या भावी सुखांतच लोळत होते. चहा वगैरे पिऊन झाल्यावर ती स्त्री म्हणाली, "नानासाहेब, आतां या चोरट्या स्थितीचा मला अगदीं मनापासून कंटाळा आला आहे. निरनिराळ्या सबबी सांगून इतके दिवस ढकलले; हें ठीकच झालें म्हणावयाचें; पण शारदेचें लग्न झाल्यावर मात्र मी कोणतीहि सबब ऐकणार नाहीं. या लोकनिंदेनें जीव कसा अगदीं कंटाळून गेला आहे."

आपल्या चेहऱ्यावर किंचित् गांभिर्याची छटा उमटवून नानासाहेब म्हणाले, " वत्सलाबाई, यासंबंधानें तुम्हांला जितकी काळजी वाटते, त्याच्यापेक्षां मला किती तरी अधिक वाटते. तुमच्याबरोबर पुनर्विवाह करण्यासंबंधानें मी जें तुम्हांला वचन दिलें आहे, तें कधीहि टाळणार नाहीं. आज उद्यां करतां करतां वीस वर्षे गेलीं हें खरें, पण इतके दिवस थांबल्याचें बक्षीस मात्र उत्कृष्ट मिळणार, हें अगदी उघड होय. यापूर्वीच विवाह करण्याची माझी तर तयारीच होती; पण ' तसें झाले असतां माझ्या शारदेचें कसे होईल ' या सबबीवर आपणच हा वेळ काढलेला आहे. कांहो वत्सलाबाई, शारदा या विवाहासंबंधानें मोठी उत्सुक असेल नाही ?"

या स्त्रीचें नांव वत्सलाबाई होय. ती शारदेची आई आहे, हें आतां वाचकांच्या लक्षांत आलें असेलच. वत्सलाबाईचें वय आतां सुमारें चाळीस वर्षांचें असून त्यांना परमेश्वराच्या अवकृपेनें अथवा कृपेनें वयाच्या विसाव्या वर्षीच वैधव्य प्राप्त झालें होतें. त्या शिकलेल्या म्हणजे सुशिक्षित असून पुणें शहरांत सुधारणेची नौबत गगन-निनादित होत असतां त्यांना वैधव्य प्राप्त झालें होतें. त्याच वेळीं पुनर्विवाह करून मनोधैर्याचें एक उत्कृष्ट उदाहरण समाजापुढें ठेवण्यासाठीं वत्सलाबाई अगदीं आतुर झाल्या होत्या; परंतु नानासाहेबांसारखा वस्ताद गृहस्थ त्यांना जोडीदार भेटल्यामुळें या पुनर्विवाहाचा वीस वर्षे नुसता वाङ्निश्चयच चालला होता. वैधव्यानंतर पांच वर्षांनीं वत्सलाबाईस शारदेची प्राप्ति झाली होती. नानासाहेबांच्या प्रेमाचें हें जिवंत बक्षीस वत्सलाबाईनीं मोठ्या खुबीनें सांभाळलें होतें. प्रथम हें कन्यारत्न डाकोर येथील अनाथबालबालिकाश्रमाच्या चालकांच्या हातीं पडलें. मुलगी कोणाची आहे वगैरेसंबंधानें आश्रमास कांहींच तपास लागला नाहीं; पण पुढें एक वर्षभर या आश्रमास नानासाहेबांकडून व वत्सलाबाईकडून दरमहा दहा पंधरा रुपयांची मदत मात्र होत होती. मधून मधून डाकोर येथें जाऊन वत्सलाबाई मुलांमुलींचा समाचारहि घेत असत; पण त्यांत विशेषतः या मुलीची त्या विशेष विचारपूस करीत असत. मुलगी एक वर्षाची झाल्यावर वत्सला-बाईनीं तिचें योग्य रीतीनें संरक्षण करण्याचें कबूल करून ती मुलगी आश्रमाच्या चालकाजवळून मागून घेतली आणि अशा रीतीनें पुनः मायलेकींची गांठ पडली. हें झालें खरें, पण पुण्याच्या लोकांना तो एक चेष्टेचा विषय मिळाला, हें मात्र वाईट झालें. पुण्याची भूमि सुधारणेला जितकी सुपीक, तितकीच ती कठिण अस-ल्यामुळें पुष्कळ सुधारणेचीं हिरवींगार कलमें तेथें फुलें आणि फळें येण्याच्या आधींच सुकतात. बिचाऱ्या वत्सलाबाईची स्थितीहि तशीच झाली. त्यांचें मन असाके

तितकें खंबीर नसल्यामुळें त्यांना लोकनिंदेचा भडिमार सहन होईनासा झाला. त्या वेळी नानासाहेबांनी पुनर्विवाह करावा म्हणून वत्सलाबाईनी फार खटपट केली; परंतु एकाद्या सोज्वल ब्राह्मण तरुणाबरोबर होणाऱ्या शारदेच्या विवाहाची सुंदर कल्पना जेव्हां त्यांनी वत्सलाबाईना समजावून दिली, तेव्हां अर्थातच मुलीचें लग्न होईपर्यंत वत्सलाबाईस स्वतःचा विवाह लांबणीवर टाकावा लागला. हा इतका काळ पुण्यास कठणे अशक्य असल्यामुळें वत्सलाबाई शारदेस घेऊन मुंबईस राहिल्या होत्या. वत्सलाबाईचें वय आतां चाळीस वर्षांचें झालें होतें; तेव्हां त्यांना विवाहाची कांही आवश्यकता उरली नव्हती; पण वीस वर्षे जो काळ निद्याचरणांत घालविला होता, त्याच्या प्रायश्चित्तासाठी पुनर्विवाह हाच एक उपाय होय, अशी त्यांची व त्यांच्याप्रमाणें नानासाहेबांचीहि समजूत झाली होती.

'या विवाहाला शारदा उत्सुक आहे की नाहीं?' असा प्रश्न जेव्हां नानासाहेबांनी वत्सलाबाईना विचारला, तेव्हां त्या प्रश्नाचें उत्तर वत्सलाबाईकडून मिळावें तितकें चटकन् मिळालें नाही. त्या म्हणाल्या, "हो हो. तिला या विवाहासंबधानें साहजिकच उत्सुकता वाटत आहे." नंतर वत्सलाबाई अगदीं हळू म्हणाल्या, "मुलगी मोठी हुशार दिसते. तिनें आपला जन्मवृत्तांत कोठून तरी मिळविला असावा असें दिसतें, आणि तेव्हांपासून तिच्या वृत्तींत बराच पालट पडला आहे. तिच्यासारख्या सुंदर मुलीला नटण्यामुरडण्याची कोण हौस असावयास पाहिजे; पण ! तिला अगदी साधेपणानें वागावयास पाहिजे. अलीकडे कांही मुलींच्या नादीं लागून ती भारत आणि रामायण वाचीत असते. आतां काही ती पूर्वीची शारदा राहिली नाही!"

वत्सलाबाईचें बोलणें ऐकून नानासाहेबांच्या चेहऱ्यावर एक चिंतेची छटा उमटली; पण ती निमिषार्धच टिकली. ते हंसत हंसत हळूच म्हणाले, "अहो, ऐन तारुण्यात असे चालावयाचेंच. तारुण्यांत दोन दिवस मौज मारावीशी वाटते, दोन दिवसांनीं तिचा कंटाळा येतो. पुनः दोन दिवसांनीं मौज मारण्याला मन प्रवृत्त होतें. एवढ्यावरुन शारदेची वृत्ति कायमचीच पालटली, असे मात्र तुम्ही समजू नका. उद्यां सकाळी मी तिला आपल्या बरोबर बंदरावर घेऊन जाणार आहें, त्या वेळीं तुम्ही तिला चांगलें नटवून सजवून द्या. दादासाहेब आतां बरेच दिवस विलायतेस राहून येणार असल्यामुळें त्यांना कोणताहि गचाळपणा दिसतां कामा नये. बाकी 'जातीच्या सुंदरांना कांहींहि शोभतें' अशाच पैकीं शारदा आहे; तेव्हां तिनें कसाहि

पोषाक केला, तरी दादासाहेबांच्या हृदयांत शारदेचा प्रवेश झाल्यावांचून राहणार नाही !"

आणखी बराच वेळ या दोघांचें यासंबंधानें बोलणें चाललें होतें त्यावरून निष्कर्ष इतकाच निघाला की, चैन हें जसे या दोघाचें ध्येय होतें, तसे तें शारदेचें नव्हतें. जोंपर्यंत ती अज्ञान होती तोंपर्यंत आई नटवील त्याप्रमाणें ती नटत असे हें खरें, पण ती जसजशी समजूतदार होऊं लागली, तसतशी साधेपणानें वागण्याकडेच तिच्या मनाची प्रवृत्ति वाढूं लागली. ती अप्रतिम सौंदर्यसंपन्न होती, याबद्दल प्रश्नच नाही; तेव्हां ती कोणत्याहि पोशाकांत साहजिक सुंदर दिसे आणि यामुळें ज्याना तीक्ष्ण दृष्टि नव्हती, त्यांना शारदा ही नटवेबाज असावी असे वाटे. लोकांचा हा समज दृढ होण्यास शारदेपेक्षां वत्सलाबाईच अधिक कारण झाल्या होत्या. आपल्या स्वतःच्या सौंदर्याची व विद्वत्तेची घमेंड त्यांना जितकी होती, तितकीच नवीन तऱ्हेनें नटण्यामुरडण्याची हौस त्याना विलक्षण असल्यामुळें आपल्याबरोबर शारदेलाहि त्या सजवीत असत. मुंबईसारख्या ठिकाणी सभा-सम्मेलनांची हम्मेशा गर्दी असल्यामुळें वत्सलाबाईस जेथें तेथें वारंवार मिरवावयास मिळे व तिच्या बरोबर बिचाऱ्या शारदेलाहि मिरवून घ्यावें लागे. सारांश, शारदेवर नटवेबाजपणाचा जो आरोप आला होता, तो केवळ वत्सलाबाईमुळें आला होता.

दादासाहेबांना आणण्यासाठी बंदरावर जाण्याची शारदेला मुळींच इच्छा नव्हती; पण नानासाहेबांनी विशेष आग्रह केल्यामुळें व आई रागावल्यामुळें शारदेला जाणें भाग झालें होतें. तिला बंदरावर जावयाचें असल्यामुळें वत्सलाबाईनी दुसऱ्या दिवशीं सगळ्यांच्या आधीं शारदेला उठविलें. शारदेला त्या दिवशी त्यांनी स्वतः आंघोळ घातली. शारदेच्या तोंडावर किंचितहि मलीनता दिसूं नये म्हणून साबणाचे किती तरी हात तिच्या तोंडावर त्यांनी फिरविले. त्यानंतर तिची इच्छा नसतांहि वांकडा भांग पाडून तिचे केंस वत्सलाबाईनीं गुंफले. झिरमिरीत उंची पातळ आज शारदेला नेसावें लागलें. चेहरा सुदर असूनहि तो एक दोन रंगाच्या सुवासिक 'पावडरींनी' रंगवून घ्यावा लागला. कुंकवाची बारीक–अगदीं बारीक–टिकली लावावी लागली. डाव्या हाताच्या मनगटावर एक लहानसें सोन्याचें घड्याळ बांधून घ्यावें लागलें. संवय नसतांहि उंच टांचेचा बूट तिला घालावा लागला. एका उंची छत्रीचा तिला आश्रय घ्यावा लागला आणि अशा पोशाकानें तिला घराच्या बाहेर पडावें लागलें. खालीं रस्त्यावर मोठ्या आतुरतेनें नानासाहेब शारदेची वाट पहात होते. 'उशीर होत आहे, लवकर आटपा' असे निरोप मधून मधून ते वत्सलाबाईंना

पाठवीत होते. इतक्यांत घराच्या पायऱ्या उतरतांना शारदेला जेव्हां त्यांनीं पाहिलें, तेव्हां रात्रंदिवस डोळ्यांसमोर दिसणाऱ्या शारदेला पाहून ते देखील विलक्षण थक्क झाले. वत्सलाबाईचा हात जर एकाद्या कुरूप स्त्रीवर पडला, तर तिला देखील त्या अप्सरेप्रमाणें सुंदर बनवतील अशी नानासाहेबांची खात्री झाली. एक घोड्याच्या दोन व दोन घोड्यांची एक अशा तीन खाजगी गाड्या नानासाहेबांनीं मागून आणून रस्त्यावर उभ्या केल्या होत्या. एका गाडीत नानासाहेबांच्या बरोबरची मंडळी हारतुरे घेऊन बसलेली असून दुसऱ्या गाडीत चार प्रतिष्ठित निमंत्रित गृहस्थ असून दोन घोड्यांची गाडी शारदेची वाट पहात होती. शारदा खालीं उतरतांच गाडीचा दरवाजा स्वतः नानासाहेबांनी उघडून शारदेला त्यांनी गाडीत बसविलें व आपण तिच्या समोर मोठ्या अदबीनें बसले. दाराच्या बाहेर पडून गाडीत बसण्यास पुरीं चार दोन मिनिटें देखील शारदेला लागली नसतील; पण तितक्या अवधींत त्या सौंदर्यखनीचें दर्शन घेण्यासाठी रस्त्यानें जाणाऱ्यायेणाऱ्यांपैकीं पांचपन्नास माणसांचा समुदाय सहज उभा राहिला होता. नानासाहेब गाडीत बसतांच या तिन्ही गाड्या वायुवेगानें अपोलो बंदरकडे चालूं लागल्या. वाटेनें दादासाहेबांशीं कसें वागावयाला पाहिजे, याची तालीम शारदेला नानासाहेब देत होते. शारदा नुसतें हूं हूं करीत होती. नानासाहेबांच्या कोणत्याहि म्हणण्यास तिनें नकार दर्शविला नाही, पण कोणत्याहि म्हणण्यास संमतीहि दर्शविली नाही, हें लक्षांत ठेवण्यासारखें आहे. लवकरच या तिन्ही गाड्या बंदरावर आल्या व आपल्या मंडळीसह खालीं उतरून नानासाहेब दादासाहेबाची वाट पाहूं लागले.

विलायतेहून आलेली बोट धक्क्यापासून पुष्कळ अंतरावर समुद्रांत उभी असून मोठ्या तोऱ्यानें मुंबापुरीकडे पहात होती. शेंकडों युरोपियन वगैरे आपापल्या इष्ट-मित्रांना नेण्यासाठी बंदरावर आलेले होते. खुद्द बोटीवर उत्साहाचें तर जणूं साम्राज्य पसरलें होतें. बोटीतून दिसणारा मुंबई शहराचा देखावा पाहून स्त्रियांचे व मुलांचे चेहरे आनंदानें फुलून गेले होते. परदेशांतून परतलेल्या हिंदी उतारूंचीं अंतःकरणें जन्मभूमीच्या दर्शनानें गहिंवरून गेलीं होतीं. कित्येक आपापल्या सामानाची व्यवस्था घाईघाईनें लावीत होते. अशा या उत्साहदायक प्रसंगीं नीटनेटका पोशाक करून व बोटीवरचा शेवटचा उपहार करून दादासाहेब बोटीच्या खाली उतरण्यास अगदीं उत्सुक झाले होते. या प्रचंड बोटीच्या भोंवतीं लहान लहान 'स्टीमलॉंच' एकाद्या किल्ल्याच्या भोंवतीं घोडेस्वार हिंडावेत त्याप्रमाणें हिंडत होत्या. कित्येक धक्क्यावर जात होते, कित्येक धक्क्यावरून

येत होते. सारांश, उत्साहपूर्ण गर्दी कशी असते, याचें जणूं काय समुद्रावर या वेळीं प्रतिबिंब पडलें होतें. आपणास कोणी बोटीवरतींच नेण्यासाठीं येतील, अशी दादासाहेबांना कल्पना देखील नव्हती. फार तर धक्क्यावर संस्थानांतल्या कांहीं बड्या मंडळीसह नानासाहेब नाटकी आदरसत्कार करण्यासाठीं उभे असतील, एवढीच त्यांची अटकळ होती. जिव्हाळ्याचे कोणी स्नेही सोबती भेटतील असें त्यांना मुळींच वाटत नव्हतें. अशा स्थितींत बोटींतल्या आपल्या शृंगारलेल्या खोलींत एका आरशासमोर उभे राहून दादासाहेब आपले केस वगैरे सांवरीत असतां, त्या खोलींत त्यांच्याबरोबर हायस्कुलापर्यंत शिक्षण संपादन केलेल्या बाळपणच्या पांच सहा स्नेह्यांनीं एकदम प्रवेश केला. सर्व प्रेमाला उपमा आहे, पण परमेश्वरभक्ति, मातृप्रेम आणि मित्रप्रेम याला उपमा नाही, असें एका कवीनें म्हटलें आहे, तें अगदीं यथार्थ होय. लहानपणापासून ज्यांच्या समवेत कित्येक वर्षें सुखानें विद्याभ्यासांत घालविलीं होतीं, अशा स्नेह्यांना एकदम समोर पाहून दादासाहेबांचें अंतःकरण गहिंवरून येऊन त्यांच्या डोळ्यांत पाणी तरारलें. या आलेल्या तरुण गृहस्थांत दिनकर व पांडुरंग हे प्रमुख होते, हें वाचकांच्या लक्षांत आलें असेलच. नानासाहेबांच्या तावडीत दादासाहेब सांपडण्यापूर्वीच त्यांची भेट घेणें अवश्य असल्यामुळें या सर्वांनी दादासाहेबांना बोटीवरच गांठण्याचें ठरविलें व यांत पांडुरंगाचे कांहीं स्नेही चांगले वजनदार असल्यामुळें त्यांनीं बोटीवर जाण्याची परवानगीहि मिळविली होती. दिनकर व दुसरे दोघे चांगलेच श्रीमंत असल्यामुळें त्यांनीं तेवढ्या वेळेपुरत्या तीन उत्कृष्ट मोटारगाड्या मिळवून नानासाहेबांच्या आधींच बंदर गांठलें होतें. भाड्याच्या ‘ स्टीमलॉंच ’ ची व्यवस्थाहि एका तरुणानें केली होती. हारतुरे वगैरे सर्व सामान पांडुरंगानें बरोबर घेतलें होतें. अशा तयारीनें ही मंडळी आली नसती, तरी देखील दादासाहेबांचें हृदय कळवळून आलें असतें. आज सतत दोन वर्षें या मित्रांचा सहवास तुटलेला असल्यामुळें दादासाहेबांचें अंतःकरण साहजिक रुक्ष झालें होतें. तेव्हां या सर्व स्नेह्यांना एकदम पाहून दादासाहेबांना काय वाटलें असेल, याची कल्पना करणेंहि अशक्य होय. सर्वांच्या वतीनें दिनकरानें जेव्हां दादासाहेबांना पुष्पहार घालून तुरे वगैरे दिले, तेव्हां दादासाहेबांनीं आपला सरदारी इतमाम बाजूला ठेवला आणि दिनकरला त्यांनीं कडकडून मिठी मारली. या वेळीं सर्वांचेच डोळे पाण्यानें भरून आले. दादासाहेबांच्या डोळ्यांतून तर पाण्याच्या धारा वहात होत्या. या वेळीं थोडा वेळ सर्व निःस्तब्ध होतें. चार दोन मिनिटें अशीं मित्र-

प्रेमाच्या अतिरेकांत गेल्यावर आपले डोळे पुशीत पुशीत दाटून आलेल्या कंठानें दादासाहेब पांडुरंगाचा हात धरून म्हणाले, " इंदू कुशल आहे ना?" या वेळीं पांडुरंगाचाहि कंठ दाटून आला होता. तो म्हणाला, " होय. ती कुशल आहे. आपली आठवण रहावी म्हणून तिनें आपणांस एक वस्तु दिली आहे." असें म्हणून उत्कृष्ट नकशी काम केलेली एक लहानशी चांदीची डबी दादासाहेबांच्या हातांत पांडुरंगानें दिली. इंदूची ती भेट दादासाहेबांनीं अत्यंत सादरपूर्वक स्वीकारली. डबींत काय आहे, हें पाहाण्याची या वेळी दादासाहेबांना इतकी उत्कंठा झाली होती कीं, ते भलत्याच बाजूनें डबी उघडूं लागले. तेव्हां साहाजिक सर्वांच्या चेहऱ्यावर स्मित दिसूं लागलें. डबी उघडून दादासाहेब पाहतात तों पूर्वीच्या इंदू-मुकुंदाच्या मोठ्या जोड फोटोची अगदी लहान प्रतिमा सोन्यांच्या चवकटींत बसविलेली दिसली. ही सोन्याची चवकट रुपयाएवढ्या आकाराची लहान होती, तरी तींतील दोन्ही फोटो स्पष्ट होते. इतकेंच नव्हे, तर त्याखालची अगदीं बारीक 'मुकुंद-इंदू' ही अक्षरें स्पष्ट दिसत होती. तें युगलचित्र पाहतांच मागील अनेक वर्षाचें स्मृतिचित्र दादासाहेबांच्या डोळ्यांपुढें उभें राहिलें व मृत्युशय्येला खिळलेल्या बापाची ती शेवटची आज्ञा त्यांच्या कानांत प्रतिध्वनि उत्पन्न करूं लागली. दादासाहेबांच्या खिशांत सोन्याचें घड्याळ असून त्याला सोन्याची सांखळी होती. त्या साखळीला तें सोन्याच्या चवकटींतलें युगल-चित्र त्यांनीं मोठ्या अभिमानानें लटकाविलें व ही असली सुंदर भेट दिल्याबद्दल त्यांनी पांडुरंगाचे फार आभार मानले. ते म्हणाले, " पांडुरंगराव, ही भेट जशी आपण मला आणून दिली, तशी आपणहि माझी भेट इंदूला पोहोंचविली पाहिजे." असें म्हणून आपल्या करंगळीतून सोन्याची आंगठी त्यांनीं काढली आणि ती पांडुरंगाजवळ दिली. या वेळीं दिनकर हंसत हंसत म्हणाला, "भेटी परत भेटी आणा-न्यायला हा बरा भक्कम हमाल मिळाला आहे!" दिनकराचे हे शब्द ऐकून सगळेच मोठ्यानें हंसले. इकडे या सर्वांनीं लवकर निघावें म्हणून त्यांची 'स्टीमलॉंच' मधून मधून शीळ घालीतच होती. शेवटी सगळी मंडळी एकदांची क्याबीनमधून बाहेर पडली, तरी निघतां निघतां ती प्रचंड बोट सगळी पाहून मग लॉंचमध्यें जाऊन बसली. लाचमध्यें अनेक हितगुजाच्या गोष्टी चालल्यामुळें ती धक्क्याला येऊन केव्हां लागली, हें समजलें देखील नाही. दादासाहेब व त्यांच्या बरोबरची मंडळी पायऱ्या चढून वर येतात, तोंच नानासाहेब सामोरे झाले व दादासाहेबांना त्यांनीं व त्यांच्या बरोबरच्या मंडळींनीं मुजरे केले. या वेळीं नानासाहेबांचा चेहरा मोठा पाहण्यासारखा झाला होता. आपला पुष्पहार

दादासाहेबांच्या गळ्यांत पडण्याच्या आधींच त्यांच्या गळ्यांत चार पुष्पहार पडलेले आहेत, हें पाहून राग, चिंता आणि अपमान या मनोविकारांचें मोठें चमत्कारिक मिश्रण त्यांच्या चेहऱ्यावर खुलत होतें. विशेषतः दादासाहेबांबरोबर पांडुरंग व दिनकर आहेत, हें पाहून तर नानासाहेबांच्या तळव्याची आग मस्तकास गेली होती; परंतु तो प्रसंग राग दर्शविण्याचा नसल्यामुळें त्यांनीं तो राग तसाच गिळला आणि चेहऱ्यावर कृत्रिम हास्याची छटा उमटवून आपला पुष्पहार त्यांनीं दादासाहेबांच्या गळ्यांत घातला. फुलांचा प्रचंड गुच्छ त्यांच्या हातीं देत देत नानासाहेब दोन घोड्यांच्या गाडीकडे हात करून म्हणाले, "गाडी तयार आहे. बिऱ्हाडीं चलावयाचें! नानासाहेबांनीं या वेळीं अशा खुबीनें हातवारे केले कीं, दादासाहेबांची नजर सहाजिक शारदेकडे जावी आणि त्याप्रमाणें दादासाहेबांनीं आपले डोळे शारदेकडे रोखलेहि; पण ती अरसिक पोर खालीं मान घालून एक पुस्तक वाचीत होती. तिचा चेहरा दादासाहेबांना स्पष्ट असा मुळींच दिसला नाही. तिच्या हातांतल्या पुस्तका-वरची 'श्रीमद्भगवत्गीता' हीं सोनेरी अक्षरें दादासाहेबांना स्पष्ट दिसलीं; पण ती गाडींत बसलेली तरुणी सुंदर की कुरूप तें मात्र त्यांना उमगलें नाहीं. दादासाहेबांना मोठ्या इतमामानें गाडीत बसण्याविषयीं नानासाहेबांनी सुचविलें खरें, पण ती सूचना दादासाहेबांनी मान्य केली नाही. ते अधिकारसूचक स्वरानें म्हणाले, " मी दिनकर-रावच्या बंगल्यावर उतरण्याचें ठरविलें आहे. तुम्ही माझें सामान बोटींतून चांगल्या रीतीनें उतरून घ्या आणि तें आजच्या आज विजयगडला रवाना करा." असें म्हणून दादासाहेब मोटारमध्यें जाऊन बसले व तिन्ही मोटारी मोठ्यानें शिंग फुंकीत नानासाहेबांसमोरून निघून गेल्या.

हा सर्व प्रकार पाहून आरंभीं नानासाहेब अगदीं थक्क झाले; पण नंतर रागानें त्यांच्या शरीरांत प्रवेश केला आणि तो राग वाढतां वाढता हिंसेची चिन्हें त्यांच्या चेहऱ्यावर दिसूं लागलीं. सूड दृष्टीनें त्या धांवणाऱ्या मोटारीवर एकवार त्यांनी आपली नजर टाकली आणि ओंठावर दांत रोंवून ते आपल्या मनाशी म्हणाले, " दादासाहेबांना विलायतचें हवापाणी लागलें, असें दिसतें. व्यक्तिस्वातंत्र्य, भाषण-स्वातंत्र्य, मतस्वातंत्र्य, यांची चटक या तरुणांना लागली, म्हणजे हे कसे उच्छृंखल होतात, याचा हा एक नमुना आहे. एकंदरीत विलायतच्या मोकळ्या हवेचा परिणाम दादासाहेबांवर उलटा झाला असें दिसतें. ठीक आहे! हा स्वतंत्र बाणा चिरडून टाकावयाला नानासाहेबासारख्यांस वेळ लागत नाहीं, हें दादासाहेबांच्या लवकरच लक्षांत येईल!" नानासाहेबांच्या मनांत याप्रमाणें आणखी किती तरी

विचार आले. क्षणभर ते धक्क्यावर अगदीं स्तब्ध उभे होते. नंतर आपल्या मनाचें कसें तरी समाधान करून ते गाडींत बसले आणि त्यांच्या तिन्ही गाड्या चालू झाल्या. आतां त्यांच्या मनांत शारदेविषयीं राग उत्पन्न झाला होता. तिनें जर त्याच क्षणीं दादासाहेबांवर नजर टाकली असती, तर निःसंशय याच गाडीत बसण्याची दादासाहेबांना इच्छा झाली असती; पण या अरसिक मुलीनें सगळी घाण केली, हा विचार नानासाहेबांना आतां असह्य झाला होता. कोणत्याही एका कारणानें डाव फसला, तरी तो डाव फसण्याचीं आणखी दहा-वीस काल्पनिक कारणें जशी साहजिक मनांत उत्पन्न होतात, त्याचप्रमाणें शारदेचेंहि एक कारण नानासाहेबांच्या मनांत उत्पन्न झालें होतें. वास्तविक शारदेचा यांत कांहींच अपराध नव्हता. तिला शक्य तितक्या खबरदारीनें वत्सलाबाईनी नटविलें होतें, तरी घराच्या बाहेर पडतां पडतां तिनें गीतेचें पुस्तक सहज उचलून घेतलें, व तो तिचा वेडगळपणा कोणाच्या लक्षांतहि आला नाहीं. तिचें हें पुस्तक पुढें अशी आपत्ति आणणार आहे, असें वत्सलाबाईना व नानासाहेबांना जर अगोदर समजलें असतें, तर शारदा गाडीत बसेपर्यंत त्यांनी काळजी घेतली असती; परंतु आपत्ति ही अशा प्रकारची सूचना देण्याचा शहाणपणा केव्हांहि करीत नसल्यामुळें नाना-साहेबांचा हा बाण निदान या वेळेपुरता तरी फुकट गेला. दादासाहेब आपल्या येथें उतरण्यास येणार म्हणून वत्सलाबाईची कोण धांदल उडाली होती; पण नाना-साहेब जेव्हां फक्त शारदेसहच घरांत आले, तेव्हां त्याना विलक्षण विस्मय वाटला. त्या एकदम म्हणाल्या, “आणि दादासाहेब ?” नानासाहेब एकदम रागानें म्हणाले, “आपल्या शारदाबाईना विचारा दादासाहेब कोठें आहेत ते! आम्ही तिला ऐश्वर्यसंपन्न करावयाला पाहतों, पण तिला भिकेचे डोहाळे आठवले आहेत. दादासाहेब जेव्हां धक्क्यावर चढून आले, तेव्हां जर गाडीतून उतरून ही दोन पावलें त्यांना सामोरी गेली असती, तर निश्चयानें ते इकडे आले असते!” असें म्हणून नानासाहेब आपला पोषाक उतरूं लागले. आपण कांहीं अपराध केला आहे, अशी शारदेला इतका वेळ कल्पनाच नव्हती; पण नानासाहेबांचें तें आविर्भावयुक्त भाषण ऐकून आपण कांहीं तरी चुकलों अशी तिची समजूत झाली. शारदेसा-रख्या तरुण मुलीनें दादासाहेबांसारख्या परक्या पुरुषास सामोरें जाणें यांत अनुचित आहे, असें नानासाहेबांना वाटलें नसावें; पण वत्सलाबाईना तसें वाटलें नाहीं. पुरुषांत फिरण्याची त्यांना जरी चांगली संवय झाली होती, तरी स्त्रियांच्या अंतःकरणाची त्यांना अद्यापि ओळख होती. शारदेची यांत कांहीं चूक नाहीं, अशी

त्यांची साहजिक समजूत झाली. तरी नानासाहेबांना बरें वाटावें म्हणून त्या शारदे-वर रागावून म्हणाल्या, " शारदे, तुला एवढें देखील समजूं नये ना ? " दोघांचाहि आपणावर राग झाला आहे, असें जरी शारदेच्या लक्षांत आलें, तरी ती पूर्वीप्रमाणें शांत होती. ती म्हणाली, " आई, कोठें कसें वागावयाचें हें मला तरी काय माहीत ! नानासाहेबांनीं गाडींत बसून रहा म्हणून सांगितलें; मी आपली त्याप्रमाणें गाडींत बसून राहिलें. " शारदा एवढें शांतपणें म्हणाली; पण दोघांच्या रागामुळें स्वतःची अनुकंपनीय स्थिति तिच्या लक्षांत येऊन तिचे डोळे अश्रूंनीं भरून आले. खरें बोलणें हेंच पुष्कळांच्या रागास कारण होतें. शारदेचे ते शब्द ऐकून स्वतःची चूक नानासाहेबांच्या लक्षांत आली, पण त्याबरोबरच त्यांना रागहि आला. ते त्रागा केल्या-सारखें करून म्हणाले, " मीं म्हटलें म्हणून काय झालें ! तुझ्याजवळ कांहीं समय-सूचकपणा होता कीं नाहीं ? तुझा तरी त्यांत काय दोष ? विलायतेस दोन वर्षें काढल्यामुळें दादासाहेबांना विलायतचें पाणी लागलें आहे ! " दादासाहेबांना विलायतचें पाणी लागलें होतें कीं नाहीं, तें ईश्वरास माहीत; पण स्वतःच्या खोलींत बसून शारदा डोळ्यांतून पाणी गाळीत होती, एवढें मात्र खरें. या वेळीं दादासाहेबांची नानासाहेबांनीं जी निंदा केली, ती शारदेला सहन झाली नाहीं. तिचें अंतःकरण कळवळून आलें आणि ती मनोमय म्हणाली, ' विलायतचें पाणी हा जर एक निंद्य आरोप असेल, तर तें पाणी या डोळ्यांतून निघून जावो.' दादासाहेबांसाठीं शारदेचें अंतःकरण इतकें कळवळावें हें मोठें आश्चर्य म्हणावयाचें !

प्रकरण पांचवें

## नानासाहेबांचा नवा डाव

दादासाहेबांनीं चार दिवस मुंबईस मुक्काम करून व मित्रवर्गाचा यथेच्छ पाहुणचार घेऊन नंतर त्यांनीं विजयगडास प्रयाण केलें. हा चार दिवसांचा मुक्काम मित्रांच्या आग्रहावरून वाढला होता, हें खरें; पण हा मुक्काम वाढविण्यांत दिनकर वगैरे मित्रांचा अर्थातच कांहीं उद्देश होता. साधल्यास पुण्यास एक दिवस दादासाहेबांचा मुक्काम करवून तेथें पांडुरंगाच्या घरीं त्यांना मेजवानी करावयाची व तेथें इंदिरेच्या विवाहासंबंधानेंहि वाटाघाट करावयाची असा दिनकर वगैरे मंडळीचा विचार होता. शिवाय विजयगड येथील संस्थानच्या कांहीं खऱ्या

हितचिंतकांना पत्रें वगैरे लिहून खास विजयगड येथें दादासाहेबांचा चांगलाच सत्कार होईल अशीहि दिनकरला तजवीज करावयाची होती. दादासाहेब म्हणजे कोणीच नव्हत ! सर्व संस्थानचे कर्तेधर्ते आपणच काय ते आहों, असा नानासाहेबांनीं या दोन तीन वर्षात टेंभा पाजळला होता, त्या सर्वावर विरजण घालण्यास हीच संधि योग्य असल्यामुळें तिचा पूर्ण फायदा घेण्याचें दिनकर व पांडुरंग वगैरेंनी ठरविलें होतें. रीतीप्रमाणें अजून जरी संस्थानचा कारभार दादासाहेबांच्या हाती सोंपविण्यांत आला नव्हता, तरी वयानें ते एकवीस वर्षांचे असल्यामुळें अधिकारसूत्रें हातीं घेण्यास ते सर्वथा पात्र झाले होते व त्याच दृष्टीनें आतां त्यांनीं वागण्यास आरंभ करावा, अशी दादासाहेबांना सर्वांनी सल्ला दिली होती. विजयगड येथें तुमच्या सत्काराची आम्ही कांही व्यवस्था करीत असून त्या प्रसंगी तुम्ही अशा अशा रीतीनें वागलें पाहिजे, असेंहि त्यांना त्यांच्या मित्रांनीं सांगितलें होतें. या अशा सत्कारासंबंधानें स्वतः दादासाहेबांस थोडें चमत्कारिक वाटणें साहजिक होतें; पण सर्व संस्थानास अशा रीतीनें ओळख पटविणेंहि अवश्य आहे, हें त्यांना कळून चुकलें होतें. मुबईच्या या चार दिवसांच्या मुक्कामांत इंदिरेच्या लग्नाच्या गोष्टी अर्थातच अनेक वेळां निघाल्या व त्या त्या वेळीं दादासाहेबांकडून त्या विवाहास पूर्ण संमति असल्याचें दिसून आलें. संस्थानांत शिरल्यापासून नानासाहेबांनीं दादासाहेबांच्या आईवर मंत्रप्रयोग केला होता, त्याचें निरसन अशा रीतीनें पूर्णपणें झाल्यावर दादासाहेबांनी त्यांचा निरोप घेतला व ते दिनकर व पांडुरंग यांसह पुण्यास गेले. पुण्यास ज्या कांही श्रीमंत घराण्याशीं विजयगडच्या संस्थानिकांचा नात्याचा संबंध होता, त्या सर्वांना मेजवानीसाठीं मुद्दाम पाचारण करून पांडुरंगानें दादासाहेबांचा उत्कृष्ट सत्कार केला. या निमंत्रित मंडळींत जे चार दोन गृहस्थ ओळखीचे व वडिलांप्रमाणें पूज्य होते, त्यांनीं दादासाहेबांना योग्य उपदेश करून इंदिरेबरोबर शक्य तितक्या लवकर विवाह करण्याबद्दलहि सुचविलें. या वृद्ध गृहस्थांच्या म्हणण्याचा परिणाम दादासाहेबांवर फारच चांगला असा झाला. कारण हे गृहस्थ दादासाहेबांचे वडील जे अण्णासाहेब, त्यांच्या विशेष परिचयाचे असल्यामुळें व नात्याच्या दृष्टीनें त्यांचा दादासाहेबांना आज्ञा करण्याचा अधिकार असल्यामुळें दादासाहेबांच्या मनावर या गृहस्थांच्या म्हणण्याचा अधिक परिणाम झाला. पुण्याचा कार्यक्रम संपल्यावर दादासाहेब विजयगडच्या मार्गाला लागले. अमुक गाडीनें आपण विजयगड येथें येत आहों, असें नानाहेबांस दादासाहेबांनीं अगोदरच कळविलेलें असल्यामुळें, इच्छा नव्हती, तरी त्यांना थोडीफार समारंभाची तयारी करावी लागली.

मुंबईसारख्या ठिकाणीं पाहण्यासारखीं अनेक ठिकाणें असल्यामुळें शारदा व दादासाहेब यांची आपणास अनेक ठिकाणीं गांठ पाडतां येईल व अशा रीतीनें त्या श्रीमान् तरुणास केवळ सौंदर्यास बळी पाडून आपल्या हातांतलें कळसूत्री बाहुलें करतां येईल, अशी नानासाहेबांस फार मोठी आशा होती; परंतु ही आशा फलद्रूप झाली नाही. विलायतेस जाण्यापूर्वी दादासाहेब मुबईस असतां त्यांची व शारदेची साहजिक वारंवार गांठ पडत असे व क्वचित् बोलणेंहि होत असे; परंतु दादासाहेब हे अगदीं सरळ प्रकृतीचे असल्यामुळें व आपला विवाह इंदिरेबरोबर व्हावयाचा आहे, हें त्यांच्या मनावर दडपण असल्यामुळें त्यांच्या मनांत शारदेविषयीं वाईट असा कोणताहि विचार उत्पन्न झाला नाहीं. पुढें दोन वर्षें विलायतेस गेल्यामुळें ते शारदेला पूर्ण विसरून गेले होते व मुंबईस परत आल्यावर त्यांना तिची आठवण देखील झाली नाहीं. नानासाहेबांची समजूत अशी नव्हती. शारदेच्या सौंदर्याचा दादासाहेबांवर विलक्षण परिणाम झालेला आहे व आतां तिची आणि त्यांची दृष्टादृष्ट होतांच दादासाहेबांच्या अंतःकरणांत शारदेची मूर्ति पूर्ण प्रतिबिंबित होईल अशी त्यांना विलक्षण आशा वाटत होती; परंतु त्या दोघांची भेट न झाल्यामुळें पुनः कोणत्या उपायानें त्या दोघांची गांठ घालतां येईल, या विचारांत सध्यां नानासाहेब सांपडले होते. संस्थानांत परत आल्यावर पुढें कोणत्या पद्धतीनें आपले डावपेंच चालवावयाचे, हें नानासाहेबांस कोणीं शिकवावयास नको होतें, ती सर्व तयारी त्यांच्या डोक्यांत भरपूर होती. दादासाहेबांना हातीं घेण्याचा प्रयत्न ज्या गृहस्थांनीं आरंभिला आहे, त्या गृहस्थांना ओळखण्यास नानासाहेबांना विशेष डोकें खाजवावें लागलें नाहीं. दादासाहेबांनीं आपल्या हातीं संस्थानचा पूर्ण अधिकार घ्यावा म्हणून ही सर्व खटपट आहे व या खटपटीस यश आल्यास अर्थातच आपणास संस्थानांतून अर्धचंद्र मिळणार, हें नानासाहेब जाणून असल्यामुळें याविरुद्ध जीं शस्त्रास्त्रें नानासाहेबांजवळ होतीं, तीं त्यांनीं पारजण्यास मुंबईहून परत येतांच आरंभ केला होता.

दादासाहेबांच्या मातुश्री रमाबाई, ज्यांना सर्व माईसाहेब असें म्हणत असत, त्या अत्यंत सुशील, सात्विक वृत्तीच्या व प्रेमळ अंतःकरणाच्या होत्या. त्यांच्या पोटांत दया होती व संस्थानांतल्या गोरगरिबांना त्या पुष्कळ मदत करीत असत. माईसाहेबांच्या या वर्तनामुळें त्यांच्याविषयीं सर्वत्र पूज्यता पसरली होती; परंतु त्या बऱ्याच भोळ्या आहेत, असाहि पुष्काळांचा समज होता. हा समज सर्वथैव खरा होता. विशेषतः माईसाहेब कितपत भोळ्या आहेत याची परीक्षा नानासाहेबांनीं अनेक वेळां

पाहिली होती. माईसाहेबांच्या या भोळ्या वृत्तीचा फायदा घेऊन पुढील व्यूहरचना करावयाची, असे आतां नानासाहेबांनीं ठरविलें होतें व त्या धोरणानें त्यांनीं वागण्यासहि आरंभ केला होता. माईसाहेबांना मुकुंद एवढें एकच अपत्य असल्यामुळें आणि त्याची आज दोन वर्षांत गांठ नसल्यामुळें त्यांचे डोळे दादासाहेबांच्या मार्गाकडे एकसारखे लागले होते. दादासाहेबांस आणण्यासाठीं नानासाहेब जेव्हां मुंबईस गेले, तेव्हां त्या चार-पांच दिवसांत माईसाहेबांच्या अंतःकरणांत काय होत होतें आणि काय नाहीं, याची कल्पना करणेंहि अशक्य होय. ज्या माउलीला एकच सद्गुणी पुत्र असेल आणि त्याची भेट पुष्कळ दिवसांनीं होण्याचा योग आला असेल, त्याच माउलीची लेखणी कदाचित् हें शब्दचित्र रेखाटील. दादासाहेबांची वाट अशा विलक्षण उत्कंठेनें माईसाहेब पहात असतां, नानासाहेब एकटेच आल्याचें जेव्हां त्यांना समजलें, तेव्हां त्यांचा प्राण खालींवर होऊं लागला आणि नानासाहेबांस त्यांनीं बोलावण्यावर बोलावणीं पाठविलीं. आतां येतों, मग येतों असें करून नानासाहेबांनीं त्या दिवशीं माईसाहेबांची गांठच घेतली नाहीं. दादासाहेब कां आले नाहींत, यासंबंधानें अनेक कल्पना माईसाहेबांच्या अंतःकरणांत उत्पन्न व्हाव्या म्हणून नानासाहेबांनीं माईसाहेबांची भेट घेण्याचें टाळलें होतें. नानाप्रकारच्या कल्पनांनीं माईसाहेबांचें अंतःकरण इतकें मऊ व्हावें कीं, आपला प्रत्येक शब्द मग तेथें सहज रुजला जावा, अशी नानासाहेबांची इच्छा होती. एवढ्यासाठीं एक दिवस लांबविल्यावर दुसऱ्या दिवशीं माईसाहेबांकडे नानासाहेब गेले. ज्या दिवाणखान्यांत माईसाहेब बसत असत त्या दिवाणखान्यांत अत्यंत विनयानें प्रवेश करून माईसाहेबांपासून थोड्या अंतरावर फार लीनतेनें नानासाहेब उभे राहिले होते. या वेळीं समोर रामपंचायतन ठेवून माईसाहेब माळेचा एकेक मणी ओढीत होत्या. नानासाहेबांना पहातांच त्या म्हणाल्या, “अहो, काल तुम्हांला दहा बोलावणी पाठविलीं, पण तुम्हांला कांहीं यायला फावलें नाहीं!”

वरील शब्द माईसाहेबांनीं किंचित् रागानेंच उच्चारले; परंतु असें होणार हें नानासाहेबांना अगोदरच माहीत असल्यामुळें त्यांना त्याबद्दल कांहींच वाटलें नाहीं. हात जोडून व लीनतेचा विशेष आविर्भाव आणून नानासाहेब म्हणाले, “चूक झाली माईसाहेब. येथें आल्याबरोबर मी आपल्या भेटीला येणार होतों, पण गेल्या सहा सात दिवसांचें काम कचेरींत तसेंच तुंबून पडल्यामुळें मला काल पाणी प्यायला देखील फुरसूद मिळाली नाहीं. त्या कामांतून मोकळा होतों न होतों, तोंच एक सरकारी लखोटा हातांत पडला. त्या लखोट्यांतला मजकूर वाचून माझी स्थिति

एकाद्या वेड्यासारखी झाली. तरी मी दादासाहेबांना वारंवार सांगत होतों कीं, या भलत्याच लोकांशीं स्नेहसंबंध तुम्ही ठेऊं नका; पण—"

नानासाहेब 'पण' म्हणून थांबल्यावर माईसाहेब साहजिक अधिक काळजींत पडल्या. त्या म्हणाल्या, "म्हणजे! दादानें काय असें केलें? तो मुंबईस कां राहिला? येथें कां ताबडतोब आला नाहीं?"

इतका वेळ नानासाहेब उभ्यानेंच बोलत होते; पण माईसाहेबांनीं मोलकरणीस हांक मारून त्यांस बसण्यासाठीं पाट दिल्यावर ते पाटावर बसून बोलूं लागले. ते म्हणाले, "मी त्यांना आणण्यासाठीं बंदरावर गेलों होतों, पण ते परभारें बोटींतूनच पांडुरंग, दिनकर वगैरे स्नेह्यांकडे जाऊन उतरले. यांत दादासाहेबांनीं कांहीं चूक केली, असें मला प्रथम वाटलें नाहीं; पण जेव्हां माझ्याकडे कांहीं माणसें यासंबंधानें चवकशी करण्यासाठीं आलीं, तेव्हां दादासाहेबांनीं ही मोठी चूक केली, असें माझ्या लक्षांत आलें." या वेळीं त्या दिवाणखान्यांत माईसाहेब आणि नानासाहेब यांव्यतिरिक्त कोणीहि नव्हतें, तरी एकादी गुह्य गोष्ट असावी, असा आविर्भाव आणून हलक्या स्वरानें नानासाहेब म्हणाले, "माईसाहेब, माझ्याकडे जे गृहस्थ चवकशी करण्यासाठीं आले होते, ते म्हणजे मोठे सरकारी हुद्देदार होते! पांडुरंग, दिनकर वगैरे तरुण विद्यार्थ्यां-बद्दल त्या गृहस्थांना विलक्षण तिरस्कार वाटतो आणि ही तरुण मंडळी फार भयंकर असावी, असाहि त्यांना फार संशय आहे! माईसाहेब, तुम्हीच आतां विचार करा कीं, जे लोक आपल्या सरकारला आवडत नाहींत, त्यांच्याकडे जर दादासाहेब असे वारंवार येऊं जाऊं लागले, तर सरकारची संस्थानावर किती अवकृपा होईल बरें? माईसाहेब, हल्लींचा काळ फार वाईट आला आहे. या वेळीं फार जपून वागलें पाहिजे. तुमच्या संस्थानची त्या भगवंतरावांनीं अगदीं घाण करून टाकली होती; पण या तीन वर्षांत मी पुन्हां पहिली घडी बसविली आहे. आतां दादासाहेबांनीं नीट विजयगडला यायचें आणि संस्थानच्या कारभाराची माहिती करून घ्यायची; पण ते आपले बोटीं-तून उतरले आणि त्या दिनकरकडे गेले. दिनकर, पांडुरंग ही कसली भयंकर मुलें आहेत याची तुम्हांला कल्पना नाहीं!"

सरळ प्रकृतीच्या व भोळ्या वृत्तीच्या माईसाहेबांवर नानासाहेबांच्या या बोल-ण्याचा साहजिक थोडाफार परिणाम झाला. त्या घाबरून जाऊन म्हणाल्या, "नानासाहेब, तुम्हांला जर हें सर्व माहीत होतें, तर तुम्हीं दादाची भेट घेऊन त्याला हें सांगितलें कां नाहीं? त्याला ही भानगड माहीत नसल्यामुळें तो त्यांच्या-

कडे उतरण्यास गेला असेल, पण तुम्हीं त्याला सांगितलें असतें, तर तो तुमच्याच बरोबर विजयगडला आला असता; आणि पांडुरंग नी दिनकर यांनीं काय असें घोडें मारलें आहे ?"

"माईसाहेब, नसत्ता उपद्व्याप करण्याची या तरुण मंडळींना मोठी वाईट खोड लागली आहे. तें राष्ट्रकार्य, तो मद्यपाननिषेध नी ती स्वदेशी चळवळ, यांना कशाला पाहिजे ? ते पूर्वीचे दिवाण भगवंतराव केवळ याच चळवळीमुळें सरकारास अप्रिय झाले होते. त्यांनीं आपल्या संस्थानांत सगळाच गोंधळ करून टाकला होता. अलीकडे या संस्थानावर सरकारची मोठी मेहरनजर आहे; पण आल्याबरोबर दादासाहेबांनीं एक नवेंच संकट उत्पन्न केलें आहे. दिनकर वगैरे मंडळीकडे दादासाहेब उतरावयास गेले, हें कलेक्टरसाहेबांना कसें समजलें कोण जाणे ! त्यांनीं लागलीच यासंबंधानें लखोटा लिहिला असून जबाब विचारला आहे. त्यांना आतां काय उत्तर द्यावें, या विचारांत मीं पडलों आहें."

नानासाहेबांच्या या म्हणण्याचा स्पष्ट अर्थ माईसाहेबांना समजला नाहीं; पण या बोलण्यानें त्या बऱ्याच घाबरल्या एवढें मात्र खरें. त्या म्हणाल्या, "म्हणजे ! स्नेहीसोबत्याकडे जाणें देखील सरकारला आवडत नाहीं का ? आणि सरकारला जर आवडत नाहीं, तर हा कशाला बरें त्यांच्याकडे गेला ? मग आतां तुम्हीं काय जबाब पाठविणार आहां ? लिहा, कीं तो अजून अज्ञान आहे. एकदां चूक झाली, त्याबद्दल क्षमा असावी. पुनः असें होणार नाही. असें कांहींतरी लीनतेनें लिहा. बाकी कसें लिहावयाचें हें कांहीं मी तुम्हांला सांगावयाला नकोच."

नानासाहेबांसारखीं नीच वृत्तींचीं माणसें आपला स्वार्थ साधण्यासाठीं सरकारच्या धोरणाचें हिडिस व काल्पनिक स्वरूप इतरांना कसें दाखवीत असतात, याचा हा एक मासला आहे. आपल्या पाठीशीं असली बलिष्ठ शक्ति आहे, अशा थापा मारून हे स्वार्थसाधु लोकांना कसे भिववीत असतात, हें नानासाहेबांच्या या कृतीनें कोणाच्याहि सहज लक्षांत येण्यासारखें आहे. असल्या फसवणुकीनें मिशीवर पीळ भरणारे पुरुष देखील फसतात; मग माईसाहेबांसारखी भोळी बाई फसली, यांत कांहीं मोठेंसें आश्चर्य नाहीं. आपल्या वाक्चातुर्याचा माईसाहेबांवर बराच परिणाम झाला आहे, हें पाहून नानासाहेब मनांत खुष झाले; पण वरपंगीं चिताग्रस्त चेहरा करून ते म्हणाले, "माईसाहेब, हें काय मला सांगावयाला पाहिजे ! संस्थान सुरक्षित रहावें म्हणून तर माझी एवढी खटपट चालली आहे. आतां दादासाहेब

येथें आले, म्हणजे तुम्ही त्यांना दोन उपदेशाच्या गोष्टी सांगून तो दिनकर नी तो पांडुरंग, यांचा संसर्ग संस्थानाला न लागेल अशा रीतीनें वागण्याविषयीं त्यांना सांगा. माईसाहेब, हल्लीं काळ मोठा वाईट आला आहे. अशा वेळीं संस्थान कसें सुरक्षित राहील, एवढी एकच गोष्ट लक्षांत ठेविली पाहिजे. मोठा अगदीं बालपणाचा स्नेही असला आणि तो जर सरकारला आवडत नसला, तर त्याची संगत या वेळीं बिलकुल उपयोगाची नाहीं. निदान त्या पांडुरंगाचें घर तर अगदीं वर्ज केलें पाहिजे. त्याच्या वाऱ्याला देखील दादासाहेबांनीं उभें राहूं नये. अहो, थोड्या दिवसांपूर्वी या स्वदेशी चळवळीसंबंधानें पुण्याला जी धरपकड झाली, तींत पांडुरंगाला देखील पकडलें होतें. पुढें त्याची सुटका कशी झाली, हें मात्र मला समजलें नाहीं. तेव्हांपासून पुष्कळ सरदारांचीं मुलें त्याच्या वाऱ्याला देखील उभी रहात नाहींत. अहो, राहतील कशीं ? राहिली कीं, उद्यां त्यांच्या सरदारकीवर पाणी पडेल ! तीच गोष्ट आपल्या संस्थानची. पांडुरंगाचा आणि दादासाहेबांचा स्नेहसंबंध वाढत आहे, असें जर सरकारला समजलें, तर संस्थान खालसा होण्याची देखील भीति आहे !"

नानासाहेबांनीं या वेळीं खोटें बोलण्याची अगदी कमाल केली. आपल्या स्वार्थसिद्धीसाठी अनेक खोट्या गोष्टींची त्यांनी एक मालिकाच गुंफली. सारासार विचारशक्ति कमी आणि वाड्याच्या बाहेर कधीं पाऊलहि टाकलेले नसल्यामुळें नानासाहेबांचा प्रत्येक शब्द माईसाहेबांना खरा वाटूं लागला. त्यांना वाटलें, आपला दादा खरोखरच अज्ञान आहे, आणि त्याच्या अशा चुकीमुळें तो जर संस्थानला मुकला, तर त्याची अत्यंत वाईट दशा होईल. काय वाटेल तें झालें, तरी आपल्या मुलाला संस्थान हें कायम राहिलेंच पाहिजे, असें माईसाहेबांना वाटणें अगदी स्वाभाविक होतें आणि त्याच दृष्टीनें त्या आतां भोंवतालची परिस्थिति पहात होत्या. पहातां पहातां ती इंदूची लक्ष्मीप्रमाणें सुंदर मूर्ति त्यांच्या डोळ्यांसमोर दिसूं लागली. त्या सुंदर मूर्तीच्या दर्शनानें निमिषार्ध माईसाहेबांचा चेहरा उल्हसित झाला; पण लागलींच त्यांच्या चेहऱ्यावर उद्विग्नता पसरली. त्या खिन्न स्वरानें म्हणाल्या, " नानासाहेब, नुसतें पांडुरंगाशीं बोललेलें जर साहेबांना खपत नाही, तर मग दादाचें इंदिरेबरोबर लग्न कसें होणार ? आणि त्याचें लग्न तर तिच्याच बरोबर झालें पाहिजे. दादाचे वडील असतांना त्यांनीं या लग्नाचें चार संभावित गृहस्थांसमक्ष ठरविलें आहे. मला देखील ती मुलगी फार आवडते. कशी लक्ष्मीसारखी दिसते; पण साहेबांनीं जर त्या मुलीबरोबर लग्न होऊं नये म्हणून ठरविलें, तर मोठा घोटाळाच व्हावयाचा. मुलीचें लग्नाचें वय होऊन गेलें आहे; पण त्यांनीं केवळ आमच्यासाठीं म्हणून इतके दिवस वाट पाहिली."

कृत्रिम काळजीनें नानासाहेबांचा चेहरा अगदीं काळवंडून गेला. ते चिंतातुर होऊन म्हणाले, "माईसाहेब, सगळ्यांत बिकट प्रश्न आहे, तो हाच आहे. मी कित्येक दिवस या प्रश्नाचा विचार करतों आहें; पण मनाचें समाधान असें होत नाहीं. साहेब या लग्नाला अगदीं विरुद्ध आहेत. त्यांना हें लग्न मुळींच पसंत नाही. अहो, इंदिरा म्हणजे भगवंतरावांची मुलगी. तेव्हां ती सासरीं येतांना बापाचे विचार साहजिक घेऊन येणार. आणि दादासाहेब जर त्या मुलीच्या तंत्रानें वागूं लागले, तर पुन्हां संस्थानांत गोंधळ माजल्यावांचून कांही राहणार नाहीं. म्हणून म्हणतों काय वाटेल तो प्रयत्न करून, तुम्ही हें लग्न होऊं देऊं नका. अहो, दादासाहेबांनीं आणि तुम्हीं म्हटलें की, त्या मुलीबरोबर लग्न करण्याची आमची इच्छा नाहीं, म्हणजे झालें. दादासाहेबांसारख्या सुशील, सुंदर, सुशिक्षित तरुणांना काय, वाटेल तितक्या मुली मिळतील आणि हें मी तुम्हांला खात्रीनें सांगतों की, इंदिरेपेक्षां शेंकडों पटीनें सुंदर मुली दादासाहेबांच्या घरीं चालत येतील. शिवाय या मुली सरदार संस्थानिकांच्या येतील हेंहि लक्षांत ठेवले पाहिजे. भगवंतरावांसारख्या नोकराची मुलगी दादासाहेबांनीं करणें हा तरी संस्थानचा कमीपणाच आहे. माईसाहेब, तुम्ही जर हें लग्न कर्तव्य नाही, म्हणून पांडुरंगास जबाब दिला, तर दुसऱ्या दिवसापासून संस्थानिक आपापल्या मुली घेऊन तुमच्या भेटीला येतील. अहो, यामुळें श्रीमंताची, कुलीन व सुंदर मुलगी मिळून वीस-पंचवीस हजारांचा हुंडा सहज मिळेल. हें लग्न मोडण्यानें किती तरी फायदे होण्यासारखे आहेत. इंदिरेपेक्षां सुंदर मुलगी मिळेल, मोठा हुंडा मिळेल, साहेब खुष राहतील आणि संस्थानचें कल्याण होईल. माईसाहेब, तुम्ही पोक्त विचार करून दादासाहेबाना जर दोन उपदेशाच्या गोष्टी सांगाल, तर ते कांहीं तुमच्या मर्जीविरुद्ध वागणार नाहींत."

असें म्हणून फार बारीक नजरेनें वृद्ध माईसाहेबांच्या चेहऱ्याकडे नानासाहेब पाहूं लागले. या वेळीं माईसाहेबांच्या चित्तांत साहजिक गोंधळ उडाला होता. दादाला जर थोरामोठ्यांची मुलगी पंचवीस हजार रुपये हुंडा देऊन आली, तर ती त्यांना नको होती, असें नाहीं; उलट त्या विचारानें त्यांना मोठी मौज वाटत होती; पण इंदिरेला जर नाहीं म्हणून सांगितलें, तर लोक काय म्हणतील, हा विचार त्यांना त्या मौजेंतून मागें ओढीत होता. या हुंड्याच्या मौजेपेक्षां त्यांना लोकनिंदेचीच फार भीति वाटूं लागली. माईसाहेबांच्या विचाराचा हा गोंधळ नानासाहेबांच्या लागलीच लक्षांत आला. माईसाहेबांवर मंत्रप्रयोग करण्यास त्यांनीं फिरून आरंभ केला. ते म्हणाले, "माईसाहेब, इदिरा आतां वयानें मोठी झाल्यामुळें तिच्या

बरोबर दादासाहेबांचें लग्न करणें अनेक दृष्टीनीं श्रेयस्कर नाहीं. अहो, हें का लग्नाचें वय आहे ? मी दोन महिन्यांपूर्वी पुण्यास गेलों होतों, तेव्हां ती एकाद्या मोठ्या बायकोप्रमाणें दिसत होती ! आणि अजूनहि तिचें शिकणेंसवरणें चाललेंच आहे ! एवढ्या मोठ्या मुली शाळेंत कशा जातात, तें ईश्वरास माहीत." नंतर नानासाहेब हळूच म्हणाले, "अहो, एवढी मोठी सून घरांत आल्यावर तिनें सासूचा मान ठेवला तर बरें. नाहींतर—" नानासाहेबांनीं आपलें भाषण अर्धेंच सोडलें आणि ते मोठ्या गंभीर मुद्रेनें माईसाहेबांकडे पाहूं लागले. नानासाहेबांची ही गोष्ट मात्र माईसाहेबांना बरीच पटली. एवढी मोठी सून जर आपल्या विरुद्ध वागूं लागली, तर तिला शिकवावयाचें तरी कसें ? लहान मुलगी असली, म्हणजे तिला सांगूनसवरून पुष्कळ गोष्टी शिकवितां येतात, हें नानासाहेबांचें तत्त्व माईसाहेबांना कबूल करावें लागलें. हे स्वार्थलोलुप सुधारक वेळ आली म्हणजे आपलीं मतें बदलण्यास देखील मागें पुढें पहात नाहींत, हें आतां नानासाहेबांनीं स्वतःच्याच उदाहरणानें स्पष्ट केलें, हें ठीक झालें. गरीब बिचाऱ्या माईसाहेबांना त्या वेळी त्यांनी अनेक खोट्यानाट्या गोष्टी सांगितल्या आणि शेवटीं त्यांचें मन त्यांनीं इंदिरेच्या लग्नापासून परावृत्त केलें. ज्या मुलीवरोबर मुकुंदचें लग्न झालें असतां, संस्थान खालसा होणार, सासूचा अपमान होणार, लोकांत निंदा होणार, मुलगा बायकोच्या मुठींत जाणार आणि साहेब नाखुष होणार, अशा मुलींबरोबर आपल्या मुलाचा विवाह करण्यास कोणती माता तयार होईल ? दोघांचें बराच वेळ बोलणें झाल्यावर शेवटीं माईसाहेबांनीं दादाचें लग्न इंदिरेबरोबर करावयाचें नाही म्हणून निश्चय केला व एकाद्या थोरामोठ्या सरदाराची सुंदर मुलगी लवकरच शोधून आणतों म्हणून नानासाहेबांनीं माईसाहेबांना आश्वासन दिलें.

भोळ्या माईसाहेबांवर मंत्रप्रयोग करून यशस्वी झाल्याबद्दल आनंद मानीत नानासाहेब वाड्याच्या बाहेर पडले; पण थोडा वेळ झाला नाहीं, तोंच त्यांचा हा आनंद बराच मावळला. रस्त्यावर सडासंमार्जनाची गर्दी उडालेली असून लोक आपापल्या घरापुढें ध्वजा आणि तोरणें लावीत आहेत, हें पाहून नानासाहेबांच्या चेहऱ्यावर सहाजिक मलीनता आली. लोकांत जी ही उत्साहाची लाट उसळली आहे, तिचें कारण त्यांच्या लक्षांत तेव्हांच आलें. दादासाहेबांच्या सत्कारासाठीं लोक एवढा उत्साह व्यक्त करतील अशी त्यांना कल्पना नव्हती. चार दोन माणसें फार तर स्टेशनावरून दादासाहेबांना आणण्यासाठीं जातील, इतकीच त्यांची अटकळ होती; परंतु लोकांचा तो विलक्षण उत्साह पाहून दादासाहेबांचा सत्कार चांगल्याच प्रकारें होणार, हें नानासाहेबांना स्पष्ट दिसूं लागलें. दादासाहेबांचा सत्कार होऊं नये

अशी कांहीं नानासाहेबांची इच्छा नव्हती; पण जो कांहीं सत्कार व्हावयाचा तो आपल्या तंत्रानें व्हावा, व त्यांत आपलेंच घोडें विशेष दामटावयास मिळावें अशी नानासाहेबांची इच्छा होती. या समारंभांत दादासाहेबांनीं अगदीं गप्प बसावें व मधून मधून नानासाहेबांच्या हाताला हात लावावा, अशा धोरणानें हा समारंभ पार पाडण्याची नानासाहेबांची इच्छा होती. पण एवढ्यावरूनच नानासाहेबांचा चेहरा मलीन व्हावा, असें कांहीं यांत नव्हतें. त्याचें कारण अगदींच निराळें होतें. लोकांच्या या उत्साहांत नानासाहेबांविषयीं उत्पन्न झालेल्या तिरस्काराची छटा चांगली स्पष्ट दिसत असल्यामुळें नानासाहेबांच्या चेहऱ्यावर स्वाभाविक मलीनता आली होती. इतके दिवस त्यांनीं साऱ्या विजयगडावर करडा अम्मल गाजवून जी अप्रीति संपादन केली होती, ती व्यक्त करण्यास या लोकांना संधि मिळाली, हें मनांत आल्यामुळें नानासाहेब साहजिकच उद्विग्न झाले होते. अद्यापि दादासाहेबांच्या हातीं अधिकारसूत्रें गेलीं नसल्यामुळें कांहींतरी विलक्षण उपायानें हा समारंभ बंद करावा असें त्यांना वाटे; पण लोकशक्तीची प्रचंड लाट उलटविण्याचा प्रयत्न केल्यास भलताच परिणाम होण्याचीहि त्यांना भीति वाटे. लोक आज आपणाकडे कुत्सित दृष्टीनें पहात आहेत, हें नानासाहेबांच्या तेव्हांच लक्षांत आलें. समाजाच्या या वादळासमोर छाती करण्यापेक्षां पाठ करणें अधिक हितावह आहे, असें शेवटी नानासाहेबांच्या ध्यानांत आलें, व ही समारंभाची तयारी आपल्याच हुकमतीनें चालली आहे, असें भासविण्याचा मग त्यांनीं प्रयत्न आरंभिला. कोणी प्रतिष्ठित गृहस्थ रस्त्यांत भेटल्यास त्याला ते स्टेशनावर येण्याचं आग्रहपूर्वक निमंत्रणहि देऊं लागले. वारा फिरेल त्याप्रमाणें पाठ फिरवावयाची, हा नानासाहेबांच्या आंगचा विशेष गुण या वेळीं लोकांच्या लक्षांत आला व कित्येकांनी त्यासंबंधानें नानासाहेबांचा त्यांच्या पश्चात उपहासहि केला. करोत बिचारे! नानासाहेब त्यासंबंधानें अगदीं निष्काळजी होते. केवळ स्वार्थसिद्धीसाठीं या मर्त्यलोकीं ज्यांनीं अवतार घेतलेला असतो, त्यांना उपहास हा सहन केलाच पाहिजे, हें नानासाहेबांना पक्कें ठाऊक होतें. दादासाहेबांच्या सत्काराची तयारी विशेष आहे, हें त्यांच्या लक्षांत येतांच त्यांनींहि आपली पगडी फिरविली आणि कृत्रिम प्रफुल्ल वदनानें त्यांनीं नोकरांना समारंभास हजर रहाण्याचे वगैरे हुकुम फर्माविले.

हा समारंभ म्हणजे दादासाहेबांना स्टेशनावरून मिरवीत मिरवीत त्यांच्या वाड्यांत आणून पोहोंचवावयाचें, त्यांना हारतुऱ्यांनीं मंडित करावयाचें आणि ते विलायतेहून सुखरूप परत आल्याबद्दल नाटकी आनंद दर्शवावयाचा एवढाच होय, अशी

नानासाहेबांची समजूत होती; परंतु त्यांना अनुभव अगदीं निराळाच आला. आपल्या कार्यसिद्धीसाठीं ते आपल्या बुद्धिसामर्थ्यानें एकेक पायरी वर चढत होते; पण त्यांचें दैव असें खडतर कीं, तें त्यांना मध्येंच एकादे वेळीं तीन चार पायऱ्या खाली ढकलीत होतें. या वेळींहि त्या दैवानें नानासाहेबांवरच मात केली. त्या दिवशीं स्टेशनावर गाडी येण्याच्या पूर्वीच नानासाहेब हजर झाले होते. गांवांतील फार तर पांचपन्नास माणसें गोळा झालीं असतील आणि थोडीबहुत पानसुपारीची व्यवस्था असेल, इतकीच नानासाहेबांची कल्पना होती; पण ते जसजसे स्टेशनच्या जवळ जाऊं लागले, तसतशी माणसांची अधिकाधिक गर्दी त्यांच्या दृष्टीस पडूं लागली. स्टेशनचें आवार माणसांनीं गच्च भरलेलें असून सर्व स्टेशन ध्वजापताकांनीं शृंगारलेलें त्यांच्या दृष्टीस पडलें. स्टेशनच्या धक्क्यावर बनाती वगैरे आंथरलेल्या असून केळीच्या खांबांच्या सुशोभित कमानी उभारल्या होत्या. आवारांतील मध्यभागची जागा सतरंज्या व गालीचे आंथरून राखून ठेवलेली असून त्याच बैठकीवर एका बाजूला उत्कृष्ट चार-दोन खुर्च्याहि ठेवल्या होत्या. दुसऱ्या बाजूला संस्थानांतले शिपाई व घोडेस्वार उभे असून त्यांच्याजवळ वाजंत्री उभे होते. मोठमोठ्या व्यापारी वगैरे लोकांच्या नोकरांच्या हातांत फुलांच्या माळा व गुच्छ दिसत होते. असा हा अपूर्व समारंभ पाहून नानासाहेबांना विस्मय वाटला की हेवा वाटला, हें त्यांचें त्यांनाच माहीत. नानासाहेब या वेळी दरबारी पोषाकानें आलेले असून लोकांनीं त्यांचा यथोचित सत्कारहि केला. रोजच्याप्रमाणें त्या दिवशींहि गाडी साडेचार वाजतांच स्टेशनावर येणार होती; पण लोकांना गाडी येण्यास उशीर होत आहे, असे वाटत होतें. कित्येक आपल्या खिशांतलें घड्याळ वारंवार काढून पहात होते. कित्येक स्टेशनमास्तरला विचारून विचारून भंडावून सोडीत होते. इतक्यांत दूर अंतरावर गाडी दिसली आणि त्या बरोबर 'आली आली' असा ध्वनि प्रत्येकाच्या तोंडांतून बाहेर पडला. सर्वांच्या चेहऱ्यावरील उत्सुकता वाढूं लागली; पण 'दादासाहेब आज न येऊन या समारंभाची घाण होवो' असे शब्द एका अंतःकरणावर उमटले. हें अंतःकरण नानासाहेबांशिवाय दुसऱ्या कोणाचें नसणार, हें वाचकांच्या लक्षांत आलें असेलच. गाडी स्टेशनच्या धक्क्याला लागण्याच्या आधींच हर्षलहरींनी आणि जयजयकारांनीं सर्व आकाश भरून गेलें. गाडी धक्क्याला लागून उभी राहतांच फर्स्ट क्लासच्या डब्यांतून दादासाहेब व त्यांना आणण्यासाठीं गेलेले विजयगडचे चार प्रतिष्ठित गृहस्थ खालीं उतरले. या वेळीं दादासाहेबांनीं संस्थानिकास शोभण्यासारखा दरबारी पोषाक केलेला असून तो त्यांना विशेष शोभत होता. ते चार-दोन पावलें पुढें येतात तोंच त्यांच्या गळ्यांत

विजयगडच्या नगरशेटनीं पुष्पहार घालून त्यांचा गौरव केला. त्यानंतर नानासाहेबांनीं आपला हार चढविला. एकामागून एक हार गळ्यांत पडूं लागले. हुजऱ्याच्या हातांत पुष्पहारांचें मोठें थोरलें ओझेंच झालें. ज्यांना हार घालण्याची संधि मिळण्यासारखी नव्हती, त्यांनीं दादासाहेबांवर एकसारखी पुष्पवृष्टि चालविली होती. विजयगडच्या लोकांचा हा अपूर्व उत्साह पाहून दादासाहेबांचें अंतःकरण गहिंवरून आलें. आपल्या सत्कारासाठीं अशा प्रकारचा टोलेजंग समारंभ होईल, अशी दादासाहेबांना देखील कल्पना नव्हती. या समारंभांत पुढें पुढें शिरण्याचा नानासाहेब प्रयत्न करीत होते, पण त्यांना आपले स्वतःचें प्रदर्शन करून घेण्यास वावच मिळेना. प्रसिद्ध गृहस्थांच्या हारांचा व नमस्कारांचा स्वीकार करीत करीत आवारांतल्या निर्दिष्ट स्थानावर दादासाहेब विराजमान झाले. त्याबरोबर शिपायांची परेड होऊन सुस्वर वाद्येहि वाजूं लागलीं; इतक्यांत सर्व सभास्थान अगदीं स्तब्ध झाले आणि एक साधारण वृद्ध व रुबाबदार गृहस्थ सभास्थानांत उभे राहिलेले दिसले. त्यांच्याजवळ नोकर पेशाचा एक गृहस्थ हातांत चांदीचें ताट घेऊन उभा असून त्या ताटांत सुंदर नकशी काम केलेलें चांदीचें नळकांडें दिसत होतें. तें नळकांडें उघडून त्या वृद्ध गृहस्थानें सुवर्णाक्षरांनीं झळकणारा एक कागद बाहेर काढला आणि तो गंभीर स्वरानें बोलूं लागला. त्या वृद्ध गृहस्थानें बोलण्यास आरंभ केला खरा, पण त्याचें अंतःकरण गहिंवरून आलेलें असून कंठहि दाटून आला होता. हा वृद्ध गृहस्थ म्हणजे आमच्या वाचकांच्या परिचयाचा झालेला जो दिनकर, त्याचा बाप होय. तो श्रीमान् व दिलदार असून त्याचें दादासाहेबांवर पुत्रवत् प्रेम होतें. आपले अश्रु पुसून तो गंभीर स्वरानें म्हणाला, "विजयगडचे संस्थानाधिपति श्रीमंत दादासाहेब विलायतेहून ईश्वरकृपेनें विजयगडास सुखरूप आल्याबद्दल आनंद प्रदर्शित करण्यासाठी आम्ही सर्व येथें जमलों आहों. त्यांच्यासंबंधानें आम्हां सर्वांच्या अंतःकरणांत प्रेम, आदर व अभिमान वसत असून आम्हांला अशी पक्की खात्री आहे कीं, अण्णासाहेबांच्या कारकीर्दीत आम्हांला जें सौख्य लाभलें, तेंच श्रीमंत दादासाहेबांकडूनहि लाभेल. पुष्कळ बोलावें असें वाटतें, पण आनंदातिशयामुळें मला बोलवत नाहीं. श्रीमंतांचा आम्हीं जो हा अल्पस्वल्प गौरव केला आहे, तो ते गोड मानून घेतील, असा आम्हांस विश्वास आहे. संस्थानांतल्या लोकांचें म्हणणें या मानपत्रांत नमूद केलेलें असून तें मी सर्वांच्या वतीनें श्रीमंतांना अर्पण करतों." असें म्हणून त्या वृद्ध गृहस्थानें तें ताट दादासाहेबांच्या पुढें ठेऊन मानपत्र दादासाहेबांच्या हातीं दिलें. दादासाहेब मानपत्रावर नजर टाकीत असतां पानसुपारी व अत्तर गुलाब देण्यास सुरवात झाली होती. सर्व

सभास्थान स्तब्ध झालें असून दादासाहेब आतां काय म्हणतात, इकडे सर्वांचे कान लागले होते. इतक्यांत डोक्याला लाल रंगाचें मुंडासें गुंडाळलेला व खांद्यावर काळी घोंगडी घेतलेला एक बुद्रुक मराठा काठीवर भार टाकून उभा राहिला. तो 'सरकारच्च्या पायापायीं, असे कांहीं शब्द मोठ्यानें म्हणाला; पण तोंच सर्व हुश्श हुश्श करून त्याला खाली बसवूं लागले. ही नानासाहेबांची कांहींतरी क्लृप्ति असावी, असाहि कित्येकांना संशय आला. सर्वांनींच जेव्हां त्याला हुश्श हुश्श केलें, तेव्हां त्याचा चेहरा उतरला आणि तो खाली बसूं लागला; पण दादासाहेबांनीं सर्वांना शांत राहण्यास सुचवून त्यांनीं त्या म्हाताऱ्या मराठ्यास आपणासमोर आणण्यास सांगितलें. बिचारा म्हातारा निरुत्साह झाला होता, पण श्रीमंतांचें बोलावणें येतांच मोठाल्या टांगा टाकीत अगदीं दादासाहेबांच्या समोर येऊन उभा राहिला. 'पाटील आपलें काय म्हणणें आहे,' असें दादासाहेबांनीं विचारतांच म्हातारा गहिंवरून म्हणाला, "सरकारच्या पायापाशी गरिबाचा अर्ज हाय. अण्णासाहेबांनीं बघा आम्हां शेतकऱ्यांना पोटच्या लेकरावानी ठेवलं होतं. ते म्हनत होते कीं, शेतकरी खुशी, तर देश सुखी. बी हाय का नाहीं, पाणी हाय का नाहीं, समदी चवकशी करीत होते. पिकाला पाणी नाहीं म्हटलं कीं दुसऱ्या दिशीं पाणी मिळत होतं, आणि आतां पिकं जळून चाललीं, तरी बी तिकडं कोणी पाहिना. आमच्या खेड्याला एक शाळा होती, ती बी मोडून टाकली. आन तें दारूचं दुकान नवतं तें मात्र आणून ठेवलं. सरकार, ही दारू लई वंगाळ बघा. माझा मोठा मुलगा दारूच्या पायीं दुनियेंतून उठून गेला. म्हणून म्हणतों की, सरकारनं आमची गरीबाची दाद अगोदर घ्यावी, अन पुन्हां अण्णासाहेबांवानी कारभार चालवावा!" वरील शब्द वेड्यावाकड्या भाषेंत, पण अंतःकरणापासून त्या शेतकऱ्यानें उच्चारल्यामुळें सर्व सभास्थान सद्गदित झालें. दादासाहेब तर हातरुमालानें डोळ्यांतलें पाणी पुसूं लागले. ते म्हणाले, "पाटील, ईश्वरकृपेनें सर्व तुमच्याच म्हणण्याप्रमाणें होईल." हें ऐकून म्हातारा मुजरा करीत करीत म्हणाला, "देवानं तुम्हांला मार्कंड्याचं आयुष्य द्यावं, अन बळीचं राज्य द्यावं!"

म्हातारा आपल्या जागेवर जाऊन बसल्यावर दादासाहेब उठून म्हणाले, "सद्गृहस्थहो, आपण जो हा माझा सन्मान केला, त्यामुळें मला माझ्या कर्तव्याचें विस्मरण पडलें होतें आणि मी खरोखरच कोणी मोठा मनुष्य आहें, असें वाटावयाला लागलें होतें; परंतु मघां आलेल्या पाटीलबोवांनीं मला माझ्या कर्तव्याची आठवण करून दिली व त्याबद्दल मी माझ्या शेतकरीबंधूचे आभार मानतों. मी जरी संस्थानचा मालक

आहें, तरी आपणां सर्वांचा नौकर आहें आणि आपणां सर्वांच्या कल्याणासाठीं माझें आयुष्य खर्च व्हावें अशी माझी इच्छा आहे. जेव्हां जेव्हां मी या माझ्या कर्तव्यापासून ढळत आहें, असें आपल्या दृष्टोत्पत्तीस येईल, तेव्हां तेव्हां माझ्या कर्तव्याची आठवण मला करून देण्यास आपण बिलकुल भीड बाळगूं नका. आपण दिलेलें मानपत्र तशाच अर्थाचें आहे, आणि याबद्दल मी आपला ऋणी आहें. मानपत्रांत ज्या अडचणी आपण दर्शविल्या आहेत, त्या दूर करण्याचा मी शक्य तो प्रयत्न करीन आणि आपणहि त्या बाबतीत मला साहाय्य कराल, असा भरंवसा आहे. शेतकीच्या आणि प्राथमिक शाळा पुनः पूर्वीप्रमाणें लवकरच सुरू करण्यांत येतील. संस्थानांतले शेतीचे व इतर धंदे ऊर्जितावस्थेस येऊन शेतकरी व कारागीर यांची स्थिति सुधारण्यासाठीं संस्थान कोणत्याहि प्रकारची हयगय करणार नाही. मजूर वगैरे गरीबांच्या पोटाला पोटभर अन्न आणि अंगाला अगभर वस्त्र मिळावें, म्हणून शक्य त्या तजविजी करण्यांत येतील. संस्थानाला पुनः पूर्वीचे दिवस प्राप्त व्हावेत, या तुमच्या इच्छेप्रमाणेंच माझीहि इच्छा आहे आणि ईश्वरकृपेनें ते दिवस लवकरच येतील, असा मला भरंवसा वाटतो.” दादासाहेबांचें हें भाषण झाल्यावर सभा विसर्जन होण्याचा रंग दिसूं लागला; पण तितक्यांत विजयगडचे एक प्रतिष्ठित वृद्ध गृहस्थ उभे राहिले, आणि खणखणीत आवाजांत म्हणाले, “श्रीमंतांनी आम्हां गरीब प्रजाजनांचा हा सत्कार गोड करून घेतला, याबद्दल मी सर्वांच्या तर्फें त्यांचे उपकार मानतों. याहीपेक्षां एक जंगी महोत्सव करण्याची आम्हां सर्वांची फार इच्छा आहे आणि ती आनंददायक वेळ श्रीमंतांनी लवकरच आणावी अशी त्यांना आमची विनंति आहे. ही वेळ म्हणजे इंदिराबाईसाहेबांसमवेत श्रीमंतांचा नगरप्रवेश ही होय. त्या सोन्याच्या दिवसाची सर्व संस्थान उत्कंठेनें वाट पहात आहे, असें मी श्रीमंतांना नम्रपणें कळवितों” नंतर तो लोकांना उद्देशून म्हणाला, “गृहस्थहो, आतां मिरवणुकीबरोबर सर्वांनीं शांतपणें चालावें आणि श्रीमंतांना त्यांच्या वाड्यांत पोहोंचवून मग आपापल्या घरीं जावें.”

या वेळीं सभास्थानांत एकच गर्दी उडाली, जयकारांनीं आकाश दुमदुमलें आणि सर्वांचे चेहरे प्रफुल्ल दिसूं लागले. मिरवणुकीत सर्वांच्या पुढें संस्थानचा ब्यांड असून त्यामागें शिपाई आणि शिपायांच्या मागें स्वार होते. त्या मागें सनईचा मधुर ताफा असून त्या मागें दादासाहेबांचे संरक्षक स्वार होते. त्यामागें खास संस्थानच्याच दोन घोड्यांच्या गाडींत दादासाहेब विराजमान झालेले असून या मागें लोकांचा प्रचंड समुदाय चालला होता. रस्त्यावर ठिकठिकाणीं कमानी उभारलेल्या असून ध्वजातोरणांनीं

प्रत्येक घर शृंगारलेलें दिसत होतें. अशा मोठ्या थाटानें ही मिरवणूक वाड्याजवळ येऊन दादासाहेब आपल्या घरी सुखरूप येऊन पोहोंचले. जवळ जवळ तीन वर्षांनीं दादासाहेबांचा हा गृहप्रवेश होत असल्यामुळें माईसाहेबांना केव्हां पुत्रमुख पाहीन असें झालें होतें. दादासाहेबांची स्थितीहि अशीच झाली. आईच्या चरणांवर केव्हां लोटांगण घालीन असें त्यांना झालें होतें. वाड्यांतल्या थेट दिवाणखान्यापर्यंत पोहोंचविण्यास जी दहा-वीस प्रतिष्ठित मंडळी आली होती, ती त्यांचा निरोप घेऊन परततांच दादासाहेब आईच्या दिवाणखान्यांत गेले. माईसाहेब हातांत लिंबलोण घेऊन अत्यंत उत्कंठेनें दादासाहेबांची वाट पहात होत्या. दादासाहेबांनीं आंत पाऊल टाकतांच माईसाहेबांच्या डोळ्यांतून अश्रुधारा वाहूं लागल्या. त्यांनी कसें तरी लिंबलोण उतरून टाकलें आणि दादासाहेबांना पोटाशी धरून रडण्याचे हुंदके त्या टाकूं लागल्या. माईसाहेब आणि दादासाहेब या दोघांच्या त्या वेळच्या अंतःकरण-स्थितीचें वर्णन करणें अशक्य होय.

नानासाहेबांच्या अंतःकरणांत मात्र विलक्षण कालवाकालव सुरू झाली होती. त्या रात्री त्यांना चांगली झोंप देखील लागली नाहीं. क्षणोक्षणीं त्या भव्य समारंभाचें चित्र त्यांच्या डोळयांसमोर उभे रहात होतें. विशेषतः पाटीलबोवांचे उद्गार त्यांच्या अंतःकरणाला झोंबले असून त्यावरील दादासाहेबांचें उत्तर तर त्यांना विशेष त्रास देत होतें. दादासाहेबांचा स्वभाव भोळा व सरळ असून त्यांना आपल्या मुठींत धरण्यास विशेष खटपट करावी लागणार नाहीं, अशी नानासाहेबांची त्या दिवसापर्यंत समजूत होती; परंतु दादासाहेबांनी सभेत जें लहानसेंच पण अस्खलित असें भाषण केलें, त्यावरून आपला कार्यभाग बिकट आहे, असें नानासाहेबांना कळून चुकलें. कार्यभाग बिकट आहे हें त्यांना कळून चुकलें खरें, पण तो सोडण्याचें मात्र त्यांच्या मनांत येईना. •उलट त्यांच्या अंतःकरणांत अधिक नीच विचार उत्पन्न होऊन ते आपल्या कार्याची निरनिराळ्या पद्धतीनें मांडणी करूं लागले. असें केलें असतां कसें होईल, तसें केलें असतां कसें होईल, हेच विचार त्यांच्या चित्तांत रात्रभर घोळत होते. वर वर पहाणारास असें वाटण्याचा संभव आहे कीं, नानासाहेबांच्या जीवाची ही सारी तळमळ केवळ शारदेसाठीं होती; परंतु नानासाहेबांच्या त्या अधोगामी अंतःकरणांत जर कोणीं बुडी मारली, तर त्यास वेगळाच प्रकार आढळून आला असता. प्रथम ही गोष्ट लक्षांत ठेवली पाहिजे कीं, प्रत्येकाचा स्वभाव मोठा विलक्षण असतो. कांहींएक कारण नसतां लोकांचें कल्याण साधणारीं जशीं कांहीं माणसें असतात, त्याप्रमाणें कारणावांचून लोकांचें नुकसान करणारींहि कांही माणसें असतात. नानासाहेबांचा

स्वभाव या दुसऱ्या वर्गाचा होता. त्यांत आणखी या स्वार्थसिद्धीच्या महत्त्वाकांक्षेची जोड त्यांना झाल्यामुळें त्यांची वृत्ति साहजिकच अधोगामी झाली होती. मध्यंतरीं महाराष्ट्रांत असा एक विलक्षण काळ आला होता कीं, ज्यांची बुद्धि अशी अधोगामी झाली असेल, त्याला आपलें डोकें सहज वर काढतां येत असे. नानासाहेबांचा अभ्युदयहि अशाच वेळीं आणि अशाच कारणामुळें झाला होता. नानासाहेबांचें सर्व चारित्र्य एवढ्या एका गोष्टींत सांठविलें होतें, हें लक्षांत ठेवलें म्हणजे त्यांना ओळखण्यास दुसऱ्या कोणत्याहि चष्म्याचा उपयोग करावयास नको; या आपल्या विशिष्ट स्वभावामुळें आजवर अनेक लहानसहान कार्यांत नानासाहेब यशस्वी झाल्यामुळें हा मोठा कार्यभागहि आपण सहज साधूं असा त्यांस भरंवसा होता. इंदिरा-मुकुंदाचा संयोग न होऊं देतां शारदा-मुकुंदाचा संयोग करावयाचा, ही गोष्ट जरी वरपांगी विशेष महत्त्वाची वाटत नव्हती, तरी जन्माचें दारिद्र्य घालविण्याचा हाच एक मार्ग त्यांना मोकळा होता, हें मात्र विसरून चालावयाचें नाहीं. दिवाणगिरीसारख्या महत्त्वाच्या जागेवरून संस्थानचीं सूत्रें चाळीत असतां, चार-पांच लाख रुपयांची मालकी संपादतां न येण्यासारखी लाजीरवाणी गोष्ट जगांत दुसरी कोणतीहि नाहीं; हाच नानासाहेबांचा हृद्रोग होय! हा हृद्रोग घालविण्यासाठीं वाटेल तितकीं कटु औषधें घेण्याची त्यांची तयारी होती!

## प्रकरण सहावें

# सावज कोण आणि शिकारी कोण?

विजयगडास दादासाहेबांच्या सन्मानार्थ झालेला समारंभ, मानपत्रांतलीं गाऱ्हाणीं आणि त्यांस दादासाहेबांनीं दिलेलें उत्तर वगैरे प्रकरणावरून या सर्व घडामोडीच्या मुळाशीं कोणीतरी दुसऱ्या व्यक्ति आहेत, हें नानासाहेबांच्या तेव्हांच लक्षांत आलें. दादासाहेबांच्या प्रकृतींत जो हा विलक्षण पालट दिसून आला, तो कोणत्या मांत्रिकामुळें झाला असावा, हें शोधण्यास नानासाहेबांना विशेष डोकें खाजवावें लागलें नाहीं. पांडुरंग, दिनकर वगैरे तरुणांनीं गेल्या चार-पांच दिवसांत दादासाहेबांना यथास्थित संथा दिली आणि त्याचा हा सगळा परिणाम होय, अशी नानासाहेबांची पक्की समजूत झाली होती. ही उपपत्ति त्यांना जोंपर्यंत लावतां आली नाहीं तोंपर्यंत ते विलायतच्या हवापाण्यावरच चरफडत होते; परंतु नंतर त्यांच्या द्वेषदृष्टीची दुर्बीन पांडुरंग,

दिनकर वगैरेंकडे वळली व ते आतां या तरुणांना पाण्यांत पाहूं लागले. वास्तविक विलायतच्या हवापाण्याचाच परिणाम दादासाहेबांवर अधिक झाला होता. तिकडच्या स्वातंत्र्याच्या वातावरणानें दादासाहेबांची प्रकृति बिघडूं नये म्हणून नानासाहेबांनीं आपल्या विलायतच्या कांहीं मित्रांना दादासाहेबांवर सक्त नजर ठेवण्यास पत्रानें विनंति केली होती; पण पांडुरंग, दिनकर वगैरे गृहस्थांच्या विलायतेंतील मित्रांचा तोफखाना विशेष लांब पल्ल्याचा असल्यामुळें दादासाहेब साहजिक त्यांच्या कक्षेंत गेले आणि त्यामुळें दादासाहेबांचा वेळ चैनींत खर्च होण्याऐवजीं अभ्यासांतच खर्च होऊं लागला. दादासाहेबांच्या गळ्यांत सुरादेवीनें माळ घालावी म्हणून विजयगडास राहूनहि नानासाहेबांनीं पुष्कळ खटपट केली; पण दादासाहेब अगोदरच निराळ्या मित्रसंघांत सांपडल्यामुळें सुरादेवीनें त्यांच्याकडे वांकड्या डोळ्यानें देखील पाहिलें नाहीं. पुष्कळ श्रीमंतांचीं मुलें विलायतेस शिकण्यासाठीं जातात आणि कशींबशीं पास होऊन परत येतात; परंतु दादासाहेबांनी आपलें शील यत्किंचितहि बिघडूं न देतां चोख अभ्यास करून बी. ए. ची पदवी मिळविली होती. नाटक-तमाशांऐवजीं ते चांगल्या चांगल्या सभा-व्याख्यानांस हटकून जात असत व कांहीं विद्वानांचीं व्याख्यानें ऐकून त्यांना निरनिराळ्या राष्ट्रांचे इतिहास वाचण्याचा नाद लागला होता. इतिहासाचें अध्ययन त्यांनी आस्थापूर्वक केल्यामुळें मातृभूमीविषयीं त्यांच्या अंतःकरणांत वेलक्षण कळकळ उत्पन्न झाली होती व निदान आपण आपल्या संस्थानची तरी स्थिति सुधारूं अशी त्यानी उमेद बाळगली होती. तेव्हां दादासाहेबांना विलायतचें पाणी लागलें नसून त्यांच्यावर पांडुरंगानें मंत्रप्रयोग केला आहे, अशी जी नानासाहेबांची समजूत झाली होती, ती किती खोटी आहे, हें वाचकांच्या लक्षांत आलें असेलच. दादासाहेबांची मनोभूमि अगोदरच तयार झालेली असल्यामुळें पांडुरंग, दिनकर वगैरे तरुणांनीं दादासाहेबांना संस्थानच्या परिस्थितीची मात्र कल्पना करून देली होती. याशिवाय दादासाहेबांना कांहीं शिकविण्याची गरज पडली नाहीं. पांडुरंगाच्या मनांत इंदिरेच्या लग्नाचा विषय सारखा घोळत होता व त्यासंबंधानें मात्र यानें दादासाहेबांना जें काय सांगण्यासारखें होतें, तें सांगितलें होतें. यांत विशेष लक्षांत ठेवण्यासारखी गोष्ट ही कीं, चार-पांच दिवस आपल्या मित्रमंडळींत दादासाहेब असतांहि त्यांना नानासाहेबांची निंदा किंवा त्यांचें एखादें रहस्य दादासाहेबांना ऐकूं आलें नाहीं. यावरून ही तरुण मंडळी किती उदात्त प्रकृतीची होती, हें सहज कळण्यासारखें आहे. त्यांनाहि आपला कार्यभाग साधावयाचा होता हें खरें, पण तो साधण्यासाठीं नानासाहेबांचें नुकसान करावें, अशी मात्र त्यांची इच्छा नव्हती.

आमचे नानासाहेब मात्र अगदीं उलट्या दिशेनें चालले होते. दुसऱ्याचें नुकसान झालें तर खुशाल होवो, पण आपला स्वार्थ साधो, अशा धोरणानें नानासाहेबांनीं आपला मार्ग आंखला होता. ज्यांची वृत्ति राक्षसी असते, आणि जे विवेकभ्रष्ट झालेले असतात, ते आपल्या कार्यसिद्धीसाठीं अमुक एक वाईट गोष्ट करणार नाहींत, अशी कोणीहि हमी घेऊं नये. आपला हेतु सहज साध्य होईल, अशी जोंपर्यंत नानासाहेबांची समजूत होती, तोंपर्यंत त्यांची बुद्धि इतकी अधोगामी झाली नव्हती; परंतु आपल्या मार्गांत पांडुरंग, दिनकर आणि आणखी कांहीं गृहस्थ आडवे आलेले आहेत अशी जेव्हां त्यांची समजूत झाली, तेव्हां त्यांची सूडबुद्धि जागृत झाली आणि वाटेल त्या मार्गानें ते सर्वांवरूनच वरवंटा फिरविण्याच्या उद्योगास लागले. मनुष्य एकदां आपल्या नीच वृत्तीला बळी पडला, म्हणजे त्याची कोण ही अधोगति होते ! स्वतः नानासाहेबांच्या अंतःकरणांत देखील या अधोगतीची किंचित् जाणीव उत्पन्न होई; पण तिच्याकडे दुर्लक्ष करण्यास जें मनोधैर्य लागतें, तें नानासाहेबांच्या आंगीं भरपूर होतें. आपलें उद्दिष्ट साधण्यासाठीं त्यांनीं आतां दादासाहेबांशीं निराळ्याच पद्धतीनें वागण्यास सुरुवात केली. अगदीं गोड–खडीसाखरेपेक्षां गोड–असे ते सर्वांशीं बोलूं लागले व लोण्यापेक्षांहि मऊपणानें ते सर्वांशीं वागूं लागले. वर सांगितलेला समारंभ आटोपल्यावर त्याच दिवशीं किंवा फार तर दुसऱ्या दिवशीं नानासाहेबांची व दादासाहेबांची गांठ पडावयास पाहिजे होती; परंतु कचेरीच्या कामाची सबब पुढें करून पांच दिवस नानासाहेबांना दादासाहेबांच्या भेटीवांचूनच काढतां आले. मधून मधून त्यांना कांही कामासाठीं बोलावणी येत होतीं; परंतु त्यांतलीं पुष्कळ कामें त्यांनी चिठ्ठीचपाटीवर व तोंडी निरोपावर भागवून दादासाहेबांची भेट घेण्याचें टाळलें. माईसाहेबांच्या अंगांत जें एक पिशाच्च शिरविण्याचा नानासाहेबांनीं प्रयत्न केला होता, तें पिशाच्च माईसाहेबांच्या अंगांत संचारल्यावर दादासाहेबांच्या मनावर त्याचा काय परिणाम होतो, हें पाहण्यासाठीं नानासाहेब वास्तविक थांबले होते.

समारंभाचा दिवस शांतपणें पार पडला. दुसरा दिवसहि आनंदानें गेला; पण तिसऱ्या दिवशीं माईसाहेबांचा आणि दादासाहेबांचा जो संवाद झाला, तेव्हांपासून मात्र दादासाहेबांना कांहींसें चमत्कारिक वाटूं लागलें. या दिवशीं दुपारचीं जेवणें होऊन माईसाहेब आपल्या दिवाणखान्यांत गेल्यावर त्यांनीं दादासाहेबांना आपल्याजवळ बसविलें व त्यांच्याशीं त्या दोन हितगुजाच्या गोष्टी बोलूं लागल्या. इकडच्या तिकडच्या गोष्टीसंबंधानें बोलतां बोलतां त्या म्हणाल्या, "दादा, दिवस फार वाईट

आले आहेत. तुझ्यासारख्या मनुष्यानें तर फारच जपून वागलें पाहिजे. वाडवडिलांनीं धारातीर्थीं देह टाकले, तेव्हां हें संस्थान मिळालें. म्हणून म्हणत्यें बाकीच्या सगळ्या गोष्टींकडे दुर्लक्ष करून आपलें संस्थान सुरक्षित ठेवलें पाहिजे. अलीकडच्या तुम्हां तरुण मंडळींना, धोरण कमी, दूरदृष्टि कमी. नाहीं नाहीं त्या भानगडींत पडावयाचें आणि आपल्याच हातानें आपल्या पायावर दगड पाडून घ्यावयाचे ! हींच उदाहरणें अलीकडे फार दिसूं लागलीं आहेत. आपल्या संस्थानावर सरकारचा पहिल्यापासूनच रोष आहे. म्हणून तूं अगदीं जपून वागावयाला पाहिजे."

आईचा हा उपदेश साधारण उदासीनतेनेंच दादासाहेब ऐकत होते. त्यांत कांहीं विशेष आहे, असें त्यांना वाटलें नाहीं. संस्थानावर एके वेळीं सरकारचा रोष होता, हें त्यांनाहि माहीत होतें. आईला कांहींतरी उत्तर द्यावयास पाहिजे म्हणून दादासाहेब म्हणाले, "आई, हें का मला सांगावयाला पाहिजे ? आपलें संस्थान सुरक्षित ठेवावें, साधल्यास तें हल्लीपेक्षां अधिक भरभराटीस आणावें म्हणून मी प्रयत्न करणारच. परमेश्वराची कृपा असेल, तर आपल्या संस्थानाला चांगले दिवस लवकरच येतील." आपल्या म्हणण्याचा दादानें दुसराच अर्थ केला, असें पाहून माईसाहेब म्हणाल्या, "दादा, ती भरभराट नी ते चांगले दिवस, यालाच मी तुम्हां तरुणांचे वेडेचार म्हणत्यें. अरे, चाललाय तसा चालूं द्यावा गाडा. त्यांत निष्कारण ढवळाढवळ कशाला करावी ? मागें ते भगवंतराव असेच भरभराटीच्या मागें लागले आणि मग संस्थानावर नाहीं नाहीं तीं संकटें आलीं !" आईचे हे शब्द ऐकून दादासाहेबांना विलक्षण आश्चर्य वाटलें. ते म्हणाले, "आई, भगवंतरावांनीं तर संस्थानाचें फार कल्याण केलें. अजून लोकांना त्यांची आठवण होते. परवां स्टेशनावर मला आणण्यासाठीं हजारों लोक आले होते, त्यांनीं मला हीच विनंति केली की, संस्थानचा कारभार भगवंतरावांप्रमाणें चालवावा." हें ऐकून माईसाहेब म्हणाल्या, "दादा, तुला व्यवहारज्ञान मुळींच नाहीं. अरे, या विजयगडांत आपलें वाईट चिंतणारे थोडे का लोक आहेत ? त्यांचा सगळा हा उद्योग. त्यांनीं तुला हरभऱ्याच्या झाडावर चढविण्याचा प्रयत्न केला आहे; पण फसूं नकोस हो. तूं भगवंतरावांप्रमाणें कांहीं गोष्टी कराव्यास आणि संस्थानावर कांहींतरी संकट यावें, हीच त्यांची इच्छा ! या चळवळ्या लोकांना कसली तरी बरीवाईट चळवळ असावी असें वाटतें आणि त्यासाठीं ते काय वाटेल तें करतात ! कारण त्यांना माहीत असतें कीं नफानुकसानीला जबाबदार दुसराच आहे. अशा लोकांच्या सल्ल्यानें बिलकूल चालतां कामा नये हो." इतका वेळ आईचें बोलणें दादासाहेब उदासीनतेनेंच ऐकत

होते; पण माईसाहेबांचीं शेवटचीं कांहीं वाक्यें ऐकल्यावर दादासाहेबांना विलक्षण आश्चर्य वाटलें. अशा प्रकारचा उपदेश आईकडून होईल, अशी त्यांना कल्पनाच नव्हती. आपली आई सरळ प्रकृतीची व भोळ्या वृत्तीची आहे, हें दादासाहेबांना माहीत होतें; पण वरील उपदेश भोळ्या वृत्तीचा दर्शक असा नसल्यामुळें आईच्या उपदेशाचें दादासाहेबांना साहजिक कोडें पडलें. हें कोडें उकलीत असतां दादासाहेब म्हणाले, "आई, तूं म्हणतेस तें खरें; पण हें म्हणणें जे तमासगीर आहेत त्यांच्यासंबंधानें शोभेल. ज्यांना खरोखर संस्थानचें कल्याण व्हावें अशी इच्छा आहे, ते मला वाईट सल्ला देणार नाहींत आणि जे वाईट सल्ला देणारे आहेत, त्यांची व माझी मुळींच ओळख नाहीं, हें तुला माहीत आहेच. वास्तविक भगवंतरावांनीं संस्थानचें किती तरी कल्याण केलें आहे. भगवंतराव गेले, तरी त्यांच्याविषयीं पूर्वीइतकाच अजून सर्वांना आदर वाटत आहे. पण तूं म्हणतेस कीं, भगवंतरावांनीं संस्थानांत सगळा घोंटाळा केला! ही अशी चुकीची समजूत तुझी कां झाली कोण जाणे. निदान भगवंतरावांसंबंधानें तरी तूं असें म्हणूं नये. त्यांच्यासारखा कर्तव्यदक्ष दिवाण लाभला होता, म्हणून तर संस्थानचें पूर्वीचें कर्ज फिटून संस्थानचा खजीना भरपूर भरला. आई, भगवंतरावांची निंदा मजजवळ केली तेवढी पुरे. दुसऱ्या कोणाजवळ असें बोलूं नकोस हो. ते तुला नावें ठेवतील!"

माईसाहेबांच्या मनावर नानासाहेबांच्या बोलण्याचेंच दडपण अधिक पडलेलें असल्यामुळें त्यांना दादाचें बोलणें विशेष रुचलें नाहीं. एक तर दादासाहेब तरुण; तेव्हां ते अननुभवी आहेत, ही माईसाहेबांची ठाम समजूत झाली होती. शिवाय ते दोन वर्षें विलायतेस राहून आल्यामुळें महाराष्ट्रांतल्या प्रक्षुब्ध वातावरणाची त्यांना माहिती नसावी, असेंहि माईसाहेबांना वाटत होतें. नानासाहेबांनीं दुसरी एक अजब युक्ति अमलांत आणली होती. माईसाहेबांच्या भोंवतीं ज्या कांहीं मोलकरणी होत्या, त्यांपैकीं कांहींनीं गटारगप्पा पसरविण्यासाठीं यावेळीं जिवंत वर्तमानपत्रांचा अवतार घेतला होता. संधि मिळाली कीं हीं वर्तमानपत्रें माईसाहेबांच्या कानाशीं लागत आणि प्रत्यक्ष असत्यास जें सांगवणार नाहीं, तितकें खोटें तीं माईसाहेबांना सांगत. 'पुण्याच्या एका मुलानें स्वदेशी टोपी घातली म्हणून त्याला पकडलें,' 'एक खानावळीण बाई देशी साखर वापरूं लागली म्हणून तिची खानावळ बंद झाली,' वगैरे अनेक गप्पा या मोलकरणी माईसाहेबांना खुशाल सांगत असत आणि ती प्रत्येक गप्पा ऐकून बिचाऱ्या माईसाहेब घाबरून जात असत. अवघ्या चार-आठ दिवसांच्या या प्रकारानें माईसाहेबांच्या मनावर विलक्षण परिणाम झाला होता.

आपला दादा भयंकर लोकांच्या तावडींत सांपडला आहे, आणि त्याला त्या लोकांपासून दूर ठेवला पाहिजे, अशी या भोळ्या म्हातारीची पक्की भावना झाली होती. दादासाहेबांचें भाषण ऐकून माईसाहेब म्हणाल्या, " दादा, बाहेर सगळ्या देशांत काय चाललें आहे, तें तूं ऐकतोस ना ? एवढीं तूं वर्तमानपत्रें वाचतोस त्यावरून तुला कांहींच का बोध घेतां येत नाहीं ? तूं म्हणतोस तें कदाचित् खरेंहि असेल; पण काळ बदलला आहे, तेव्हां तूंहि बदललेल्या परिस्थितीप्रमाणें वागावयाला पाहिजे. तुझ्यावर केवढी मोठी जबाबदारी आहे, याचा तूंच विचार कर. तुझें वर्तन गैरशिस्त आहे, असें जर दिसलें, तर सबंध संस्थानावर पाणी पडण्याचा प्रसंग येईल ना ! गेल्या दोन वर्षांत किती तरी लोकांचीं इनामें आणि जहागिरी जप्त झाल्याचें सांगतात. त्यावरून तूं कांहींच का शिकावयाचें नाहीं ? त्या दिनकराची आणि पांडुरंगाची संगति अगदीं उपयोगाची नाहीं ! माझा देखील त्यांच्यावर लोभ आहे, सगळें कांहीं आहे; पण या वेळीं त्यांच्यापासून अगदीं अलिप्त राहिलें पाहिजे. ते सद्वर्तनी आहेत, सुशील आहेत, हें सगळें मला माहीत आहे; पण त्यांच्यावर सरकारचा रोष असल्यामुळें त्यांच्याशीं स्नेहसंबंध ठेवल्यास तूं अगदीं सर्वस्वाला मुकशील ! "

आईचें बोलणें दादासाहेब मुकाट्यानें ऐकत होते. हेच विचार त्यांच्याजवळ जर दुसऱ्या कोणी व्यक्त केले असते, तर त्याला वेड लागलें आहे कीं काय असा दादासाहेबांना संशय आला असता; पण प्रत्यक्ष जन्मदात्या आईनें हे विचार प्रगट केल्यामुळें आपल्या भोंवतालची परिस्थिति खरोखरच इतकी नाजुक झाली आहे कीं काय ? असा दादासाहेबांना संशय येऊं लागला. हा संशय अर्थातच भीत्युत्पादक असल्यामुळें भीतीच्या मंद लहरीहि त्यांच्या अंतःकरणांत उत्पन्न झाल्या होत्या. केव्हां केव्हां त्यांना असेंहि वाटे कीं, हा सारा उद्योग नानासाहेबांचा असावा; पण त्यांचा जरी हा उद्योग असला, तरी त्यांत थोडासा सत्यांश नसेल कशावरून, असाहि संशय दादासाहेबांना आला. त्यासंबंधानें विचार करीत असतां ते थोडेंसें स्मित करून म्हणाले, " आई, तूं सांगतेस तें माझ्या हिताचेंच सांगतेस, यांत कांहीं शंका नाहीं; पण तुझ्या म्हणण्याप्रमाणें वागावयाचें म्हणजे पुढें किती घोंटाळा होणार आहे, हें तुझ्या लक्षांत आहे ना ? पांडुरंगाचा स्नेहसंबंध तोडावयाचा म्हणजे इंदिरेबरोबर लग्नहि करावयाचें नाहीं, असेंच तूं ओघानें म्हणणार ! "

गोष्ट दादाकडूनच मुद्यावर आली, हें बरें झालें, असें माईसाहेबांना वाटलें. त्या म्हणाल्या, " होय. हें अगदीं उघड होय. तूं दुसऱ्या मुलीबरोबर विवाह केल्यावांचून

संस्थानचा कारभार तुझ्या हातीं यावयाचा नाहीं, असें मुळीं ठरलेंच आहे." आईचे हे शब्द ऐकतांच दादासाहेबांच्या चेहऱ्यावर एकदम खिन्नता पसरली. ते म्हणाले, "आई, मीं जर इंदूबरोबर लग्न केलें नाहीं, तर तिची पुढें काय अवस्था होईल बरें?" हा प्रश्न ऐकून माईसाहेब हळूच म्हणाल्या, "अरे, तिची कशाला काळजी करतोस. आपला मार्ग आपणच शोधावयाला ती पुष्कळ खंबीर आहे. अरे, ती कां आतां वयानें लहान आहे? एवढ्या मोठ्या मुलीबरोबर तुझें लग्न करण्याची माझी मुळींच इच्छा नाहीं. तुला ती बायको शोभली तरी पाहिजेना? सुंदर, सुशील, आज्ञाधारक आणि श्रीमंताच्या मुलीबरोबर तुझें लग्न करण्याचें मीं ठरविलें आहे. चांगल्या चांगल्या मुली तुला दहा वीस हजार रुपयांचा हुंडा देऊन देखील येतील. एका सरदाराच्या सुंदर मुलीला पाहण्यासाठीं म्हणून मी लवकरच वाड्यांत आणणार आहें."

इंदूबरोबर लग्न न होतां, तें दुसऱ्या मुलीबरोबर झालें, तरच आपल्या हाती संस्थानचीं अधिकारसूत्रें पडणार आहेत, हें जेव्हां दादासाहेबांना आईकडून समजलें, तेव्हां यांत कांहींतरी विलक्षण रहस्य आहे, असें दादासाहेबांना साहजिक वाटलें. ते विषण्णतेनें म्हणाले, "आई, बाबांनीं आपली प्राणज्योत मावळण्यापूर्वीं मला तीन तीन वेळां बजावून इंदूबरोबरच लग्न करण्यास सांगितलें आहे. ती बाबांची आज्ञा मी उल्लंघन करूं असेंच ना तूं म्हणतेस?" दादासाहेबांच्या या प्रश्नाचें उत्तर माईसाहेबांकडून लवकर मिळालें नाहीं. कारण या प्रश्नाचें उत्तर अगदीं सोपें नव्हतें. दादासाहेबांची स्थिति आतां अगदीं चमत्कारिक झाली होती. कोठें तरी जाऊन घटकाभर स्वस्थ बसावें असें त्यांना वाटूं लागलें व आईची परवानगी न घेतांच ते स्वतःच्या दिवाणखान्यांत निघून गेले.

दादासाहेब आपल्या दिवाणखान्यांत येऊन बसल्यावर त्यांच्या चित्तांत विचारलहरींचें जें तुमुल रणकंदन सुरू झालें, त्याची दादासाहेबांशिवाय इतरांना कल्पनाहि करतां यावयाची नाहीं. आईचें म्हणणें खोटें म्हणावें, तर महाराष्ट्रांत अनेक चमत्कारिक घडामोडी चालू आहेत, हें वर्तमानपत्रांवरून त्यांना दिसून आलें होतें. बरें, खरें म्हणावें, तर लग्नासारख्या खाजगी भानगडींत सरकारनें लक्ष घालणें असंभवनीय दिसतें, अशीहि त्यांची समजूत होती. असे उलटसुलट अनेक विचार दादासाहेबांच्या मनांत येत होते. आतां इतक्या दिवसांनीं इंदू-बरोबर लग्न करण्यास आपण तयार नाहीं, असें सांगणें म्हणजे तिच्याशीं अधम-

पणा करणें होय. तिच्या आयुष्याची अशा रीतीनें माती केल्यास लोक आपली कल्पनेच्या बाहेर छी:थू करतील, आपल्या या वर्तनामुळें तिला आपलें सर्व आयुष्य कौमार्यावस्थेंत कंठावें लागेल, वगैरे विचार जेव्हां दादासाहेबांच्या अंतःकरणांत उत्पन्न झाले, तेव्हां त्यांचें सर्व शरीर थरारलें आणि स्वतःबद्दल त्यांच्या मनांत तिरस्कार उत्पन्न झाला! केव्हां त्यांना असें वाटे कीं, काय वाटेल तें झालें, तरी संस्थान सुरक्षित ठेवलें पाहिजे. आणि केव्हां असें वाटे कीं संस्थानास मुकलों तरी हरकत नाहीं; पण विवाह हा इंदूबरोबरच झाला पाहिजे. विशेषतः दादासाहेबांसमोर बापानें मृत्युसमयीं केलेली आज्ञा उभी राही आणि तीमुळें त्यांचा जीव कळवळून येई. अशा प्रकारचे अनेक विचार चित्तांत घोळत असतां स्वप्नांतून जागें व्हावें त्याप्रमाणें ती विचारशृंखला तटातट तोडून दादासाहेब म्हणाले, "आईच्या बोलण्यांतलें खरें रहस्य समजून घेतल्यावांचून कशाला निष्कारण काळजी करूं? तिच्या भोळ्या स्वभावाचा फायदा घेऊन नानासाहेबांनीं तिला कांहींतरी सांगितलें असावें किंवा कदाचित् थोड्या गुणगुण्यावरून आई उगीच घाबरून गेली असावी. कसेंहि असो, इतकें मात्र खरें कीं, माझा मार्ग निष्कंटक नाहीं आणि म्हणून मला आतां फार सावधगिरीनें वागलें पाहिजे. मला या बाबतींत नानासाहेबांचाच विशेष संशय येत आहे, तेव्हां प्रथम त्यांचेंच अंतःकरण शोधलें पाहिजे. कांहीं झालें तरी विवाह इंदिरेबरोबरच झाला पाहिजे आणि संस्थानहि सुरक्षित राहिलें पाहिजे. या वेळीं अगदीं वेड पांघरून नानासाहेबांच्या पोटांत शिरण्याचा प्रयत्न केला पाहिजे."

वस्तुतः दादासाहेब अगदीं सरळमार्गी होते. नसत्या भानगडींत लक्ष घालून वेळेचा अपव्यय करावयाचा, हें त्यांच्या स्वभावाला अगदीं आवडत नव्हतें. दादासाहेबांच्या स्वभावांतील या विशिष्ट गुणामुळेंच त्यांच्या मित्रांना त्यांच्यासंबंधानें काळजी वाटत होती. नानासाहेबांनीं आपली ओळख संस्थानास अगोदरच करून दिलेली असल्यामुळें त्या धूर्त दिवाणाचा मंत्रप्रयोग दादासाहेबांवर होऊ नये, असें सर्वांस वाटत होतें. दादासाहेबांचे हितचिंतक त्यांच्याविषयीं अशी काळजी वहात असतां स्वतः दादासाहेबहि अगदीं निष्काळजी नव्हते; इतकेंच नव्हे तर ते खडबडून जागे झाले होते व स्वतःचा मार्ग चोखाळण्यास त्यांनीं आरंभहि केला होता. केव्हां केव्हां असे कांहीं चमत्कारिक प्रसंग घडून येतात कीं, त्यामुळें मनुष्याच्या वृत्तींत बदल होऊन स्वभाव पालटला जातो. दादासाहेबांच्या बाबतींतहि असेंच घडून आलें. माझ्यासारखा साखर पेरणारा असल्यावर सरळ व भोळसर दादासाहेबांना आपल्या मुठींत धरण्यास कितीसा वेळ लागणार आहे, असा नानासाहेबांना मोठा

भरंवसा होता; परंतु त्यांना दादासाहेबांनीं सपशेल फसविलें. माईसाहेबांचा व दादासाहेबांचा वादविवाद झाला व त्यांत दादासाहेब निरुत्तर होऊन निघून गेले, ही बातमी नानासाहेबांना त्यांच्या गुप्त हेरांकडून मिळतांच नानासाहेबांना मोठें समाधान झालें. आतां पुढें कशा रीतीनें फांसा टाकला पाहिजे याचा विचार करीत नानासाहेब कचेरींत बसलेले असतां, सायंकाळच्या सुमारास खास दादासाहेबांची स्वारी त्यांच्यापुढें येऊन उभी राहिली. दादासाहेबांना पाहतांच नानासाहेबांनीं कृत्रिम लीनतेची मोठी गडबड उडवून दिली. मोठ्या आदरसत्कारानें त्यांनीं दादासाहेबांना खुर्ची बसावयास देऊन ते विनयानें त्यांच्याजवळ उभे राहिले. दादासाहेबांच्या वाड्याजवळच एका मोकळ्या जागेंत पांच सहा लहान लहान सुंदर इमारती बांधून तेथें विजयगड संस्थानच्या सर्व कचेऱ्या ठेवल्या होत्या. यांपैकीं एका इमारतींत दिवाणसाहेबांची कचेरी होती. दादासाहेब खुर्चीवर बसल्यावर पूर्वींच्या गांवठी नाटकांतले राजे जसे 'प्रधानजी, राज्याचा बंदोबस्त कोणत्या प्रकारें ठेवला आहे ?' म्हणून विचारीत असत, त्याच पद्धतीवर पण सौम्य स्वरानें त्यांनीं नानासाहेबांना तो प्रश्न केला. हळू आणि गोड स्वरानें नानासाहेब म्हणाले, " संस्थानची व्यवस्था अगदीं चोख ठेवली आहे. आपण जमाखर्चाचीं वगैरे पुस्तकें पाहाण्याची थोडी तसदी घ्याल, तर आपणाला सर्व समजून येईल. " दादासाहेब यावर हंसत हंसत म्हणाले, " पुस्तकें पाहिलीं, तरी त्यांत मला काय समजणार आहे ! अहो, तें जर मला समजतें, तर संस्थानचा कारभार मींच चालविला असता. संस्थानचा कारभार ठीक चालला आहे, म्हणून तुम्हीं सांगितलें, म्हणजे त्यांत आम्हीं समाधान मानावयाचें. ' नानासाहेबांनीं संस्थानचें उत्तम रीतीनें संरक्षण केलें. ' असें मी येथें आल्यापासून जो तो मला सांगतो. याबद्दल मी तुमचा फार आभारी आहें. " दादासाहेबांनीं हे शब्द इतक्या खुबीनें उच्चारले कीं, त्यांत कृत्रिमपणा असावा, असा नानासाहेबांना संशय देखील आला नाहीं. त्यांना वाटलें, ही स्वारी माईसाहेबांपेक्षांहि भोळी आहे आणि असल्या या भुसभुशीत सुपीक जमिनींत वाटेल तें बीं खुशाल पेरतां येईल. नानासाहेब हंसत हंसत नम्रपणें म्हणाले, " यांत मीं काय विशेष केलें आहे. माझ्याऐवजीं दुसरा कोणी असता, तर त्यानेंहि संस्थानचा कारभार अशाच रीतीनें चालविला असता. तेव्हां माझे कांहीं एवढे आभार मानावयाला नको. " असें म्हणून नानासाहेब थोडा वेळ स्तब्ध राहिले. नंतर अधिक मिठ्या स्वरानें म्हणाले, " परवांच्या समारंभांत आपलें भाषण तर फार छान झालें. सगळे आपली तारीफ करतात. "

दादासाहेब मोठ्यानें हंसून म्हणाले, "तुम्ही देखील त्या भाषणानें फसलां म्हणावयाचे! नानासाहेब, हें सगळें नाटक, दुसरें काय? असल्या अनेक समारंभांच्या हकीकती वर्तमानपत्रांत वाचल्यामुळें अशा मानपत्राला ठराविक उत्तर देण्याला मला कांहींच त्रास पडला नाहीं. अहो, लोकांनीं लांबलचक मागण्या मागाव्यात आणि आपण खुशाल 'हो' म्हणून म्हणावें. नुसतें शाब्दिक दान देण्याला कृपणपणा कशाला करा. त्या मानपत्रांत जर तशीच कांहीं भानगड असती, तर मी तुम्हांला विचारल्यावांचून त्याचें उत्तर दिलें नसतें. नाजुक भानगडीत आम्हांला काय समजावयाचें आहे!" दादासाहेबांचे हे शब्द ऐकून नानासाहेबांच्या अंतःकरणास गुदगुल्या झाल्या. त्यांची अशी खात्री झाली कीं, हे तरुण संस्थानिक म्हणजे सांबापुढचे आहेत. जो जसें सांगेल, तशी मान डोलवावयाची एवढेंच यांना माहीत. चार दिवस दिनकर–पांडुरंगाच्या सहवासांत काढले व त्यांच्या मताप्रमाणें वागले; पण घरीं येतांच मूळ पदावर आले. अशा संस्थानिकास कळसूत्री बाहुलें करण्यास किती वेळ लागणार! असे मांडे खात नानासाहेब लांगूलचालन करीत म्हणाले, "छे! छे! आपण हा निष्कारण आपणाकडे कमीपणा घेतां. माझी तर अशी खात्री झालेली आहे कीं, आपण फार बुद्धिवान् आहां. अनुभव नसल्यामुळें आपणांस कांहीं कांहीं गोष्टी कळणार नाहींत, हें खरें, पण चांगली माहिती झाल्यावर आपण संस्थानचा कारभार उत्कृष्टपणें चालवाल अशी माझी खात्री आहे. माझी देखील अशीच इच्छा आहे, कीं संस्थानची सूत्रें आपण हातीं घ्यावीं आणि मला मोकळें करावें." हे शब्द नानासाहेबांनीं कोणत्या अर्थानें उच्चारले, हें दादासाहेबांच्या तेव्हांच लक्षांत आलें. ते म्हणाले, "नानासाहेब, आपण आतां संस्थानला सोडण्याची मात्र गोष्ट काढूं नका. मी अगदीं प्रांजलपणें तुमच्याजवळ कबूल करतों कीं, लोकांची समजूत कांहीं जरी असली, तरी संस्थानाच्या कारभारांत मला कांहीं देखील समजावयाचें नाहीं. बरें, मी जरी सगळ्या गोष्टी समजावून घेतल्या, तरी कोणी तरी दिवाण हा पाहिजेच. तुम्हांला आतां संस्थानची सर्व कांहीं माहिती झालेली आहे. तुमचा कारभार लोकांनाहि पसंत आहे; तेव्हां तुम्हांला मी आतां मुळींच सोडणार नाहीं. कलेक्टरसाहेबांनीं जर तुम्हांला दुसऱ्या एकाद्या संस्थानांत पाठविण्याचें ठरविलें, तर मी साहेबांपुढें आडवा पडेन!" दादासाहेबांचे हे शब्द ऐकून नानासाहेबांच्या अंतःकरणांत अहंकाराची भावना स्वाभाविकपणें उत्पन्न झाली. नानासाहेब आपणास मोठे धूर्त समजत होते; परंतु फाजील धूर्तपणामुळेंच ते आतां दादासाहेबांसारख्या साधारण मनुष्याकडून फसले जात होते. ते म्हणाले, "आपला तसा आग्रह अस-

ल्यास मी कांहीं आपणास सोडणार नाहीं; पण मी तर असें ऐकतों कीं, भगवंतरावांची कारकीर्द लोकांना फार आवडली होती आणि तसा एकादा कारस्थानी दिवाण पहावा म्हणून लोकांची तुम्हांला विनंतीहि आहे. तेव्हां मला—" नानासाहेबांचे हे शब्द ऐकून दादासाहेबांनीं आपला चेहरा किंचित् घाबरल्यासारखा केला. नानासाहेबांना मध्येंच थांबवून ते हलक्या स्वरानें म्हणाले, " येथें जवळपास कोणी नाहीं ना ?

कचेरीच्या कोनाकोपऱ्यांत नजर टाकून नानासाहेब विस्मयानें म्हणाले, " नाही, कोणी नाहीं. कारकून वगैरे केव्हांच कचेरींतून गेले आहेत. बाहेर पाहऱ्यावर फक्त दोन शिपायी आहेत. " हें ऐकून दादासाहेब पुनः कावरीबावरी नजर सर्वत्र टाकून हळूच म्हणाले, "नानासाहेब, भगवंतरावांसंबंधानें बोलावयाचें झाल्यास फार हळू बोलत जा हो. मीं पहिल्यापासूनच फार भित्र्या स्वभावाचा आहें, हें तुम्हांला माहीत आहेच. अहो, ती भगवंतरावांची कारकीर्द सरकारास आवडली नाहीं. आतां पुनः तसले दिवाण संस्थानाला लाभले, तर संस्थानचें आयुष्य संपले म्हणून समजा. मी तुम्हांला सोडावयाला कबूल नाही, तो याचसाठी. मी असे ऐकले आहे कीं, सरकारची तुमच्यावर अगदीं मेहरनजर आहे. भगवंतराव ज्या मताचे होते, त्या मतांची महाराष्ट्रांत आतां कशी रेवडी उडत आहे, हें आपण तर पहात आहांच !" जे नानासाहेब दादासाहेबांना आपल्या मुठीत धरून कळसूत्री बाहुलें तयार करणार होते, त्याच कळसूत्री बाहुल्यानें नानासाहेबांवर आतां मंत्रप्रयोग चालू केला आणि मौज ही कीं, अत्यंत धूर्त असे नानासाहेब दादासाहेबांच्या बोलण्यावर विश्वास टाकूं लागले. याचें कारण नानासाहेबांची तादात्म्यता हें होय. त्यांनीं आपलें ध्येय आपल्या डोळ्याच्या इतक्या जवळ धरलें होतें कीं, त्यांना त्यामुळें त्यांच्याविरुद्ध चालणारीं कारस्थानें मुळीच दिसत नव्हतीं. दादासाहेबांच्या भोळ्या स्वभावाला ही जी फाजील उकळी फुटली होती, तो केवळ याचमुळें त्यांना उमगून आली नाहीं. उलट त्यामुळें नानासाहेबांची मति भ्रष्ट झाली. दादासाहेबांविषयीं उसन्या कळकळीची मात्रा अधिक चढवून ते म्हणाले, "आपण म्हणतां तें खरें पण–पण नको. मला तुमच्या खाजगी भानगडींत बोलण्याचा काय अधिकार आहे ?" असें म्हणून नानासाहेब थांबल्यावर थोडा वेळ दादासाहेबहि थांबले. नंतर किंचित् रोषयुक्त स्वरानें ते म्हणाले, "नानासाहेब, संस्थानच्या हितानहिताची जबाबदारी जशी तुमच्यावर आहे, त्याचप्रमाणें माझ्या स्वतःच्या हितानहिताची जबाबदारीहि तुमच्यावर आहे. मग माझ्या खाजगी भानगडींत तुम्हांला बोलण्याचा अधिकार नाहीं, असें तुम्हांला कसें बरें म्हणतां येईल ?

मी तुमच्या सल्ल्यानें वागावयाला तयार नसेन, तर ती गोष्ट निराळी; पण सल्ला-मसलतीला विश्वासाचे असे तुम्हीच एक असल्यामुळें, जरी मला वाईट वाटण्यासारखें कांहीं असलें, तरी तें सांगावयाला तुम्हीं मुळींच संकोच बाळगूं नका. मी समजलों, तुमच्या मनांतून काय बोलावयाचें आहे तें! माझ्या विवाहासंबंधानें मला खरोखर योग्य सल्ल्याची फार जरूर आहे." असे म्हणून दादासाहेब थोडा वेळ स्तब्ध बसले. आपलें दैव फार बलवत्तर आहे, असें आतां नानासाहेबांना वाटूं लागलें. आपला चेहरा काळजीच्या चिखलानें जितका मलीन करतां येईल. तितका मलीन करून नानासाहेबहि स्तब्ध बसले होते. या ठकाठकांच्या लढाईत नानासाहेब एकेक पायरी खालीं घसरत असून आपण एकेक पायरी वर चढत आहों, हें जरी दादासाहेबांना समजून आलें, तरी त्यांनीहि आपल्या चेहऱ्यावर चिंतेचें पटल पसरविलें व लांबलचक उसासा सोडून ते म्हणाले, "नानासाहेब, माझ्या लग्नाची ही भानगड मोठी बिकट झालेली आहे. इंदिरेबरोबर माझा विवाह झाला असतां मजवर साहेबांचा रोष होण्याचा संभव आहे, ही गोष्ट मी विलायतेस असतांनाच मला एका स्नेह्यानें कळविली होती. मी मुंबईस आल्यावर प्रथम दिनकर व पांडुरंग यांची भेट घेतली, ती याचसाठीं. आमचा पुष्कळ वादविवाद झाला, पण तंट्याचा निकाल कांहीं समाधानकारक रीतीनें लागला नाहीं. शक्य तितकी घाई करून व वाटेल त्या थापा मारून त्याच वेळीं मला चतुर्भुज करण्याचा त्यांचा विचार होता; पण परमेश्वराची मोठी कृपा म्हणून मला तशी दुर्बुद्धि झाली नाहीं. आईसाहेबांना देखील हाच प्रश्न पडला आहे. त्यांनीं मला यासंबंधानें पुष्कळ विचारलें; पण मी तरी काय सांगणार? त्यांचे मन पहावें म्हणून मी त्यांना म्हणालों, 'मी तर इंदिरेबरोबरच लग्न करणार' तेव्हां खरोखर त्यांचें अंतःकरण एकदम थरारलें. त्या म्हणाल्या, 'संस्थान गमवावयाचें असेल, तर तिच्याबरोबर लग्न कर.' नानासाहेब, तुम्हीच विचार करा कीं, वाडवडिलांनीं एवढ्या कष्टानें मिळविलेलें संस्थान गमवावयाला कोण तयार होईल? मी या लग्नासंबंधानें एवढा काळजींत पडलों नसतों, पण 'तुम्हांला कोर्टात खेचून इंदूबरोबर लग्न करण्यास भाग पाडूं' असें पांडुरंगानें बजावल्यामुळें मला मोठी काळजी वाटते."

भावी ऐश्वर्याचें सुंदर मंदिर नानासाहेबांच्या अंतःकरणांत एकदम उभें राहिलें. जणूं काय आपल्या कार्यसिद्धीचें सूत्रच या वेळीं हातीं पडत आहे, असें नानासाहेबांना वाटून त्यांच्या चेहऱ्यावर प्रफुल्लतेच्या किंचित् रेषा चमकल्या. ते किंचित् स्मित करून रोषयुक्त स्वरानें म्हणाले, "दादासाहेब, त्यांनीं हा नुसता तुम्हांला

धाक घातला! वाग्दान झाल्यामुळें फिर्याद करतां येईल, असा त्यांना भरंवसा वाटत असेल, तर तो त्यांचा भ्रम होय. वाग्दान ज्यांनीं दिलें घेतलें, ते दोघेहि गृहस्थ आज हयात नाहींत आणि वाग्दानाच्या वेळीं तुम्ही अज्ञान होतां, या गोष्टी ते विसरतात, असें दिसतें. दादासाहेब, आतां तुम्ही अशी कल्पना करा कीं, कदाचित् पांडुरंगानें तुमच्यावर फिर्याद केली, तर त्यांत काय होणार आहे? तुम्हांला हें मी खात्रीनें सांगतों कीं, पांडुरंगाची बाजू जरी न्याय्य असली, तरी त्याला न्याय मिळण्याची मुळींच आशा नको. अहो, शिक्कामोर्तब झालेली ही मंडळी कोर्टांत गेली, म्हणजे प्रत्यक्ष सत्याला देखील त्यांच्याविरुद्ध जाण्याची इच्छा होते." असे म्हणून नानासाहेब किंचित् मोठ्यानें हंसले. या हंसण्याचा लय होत आहे, तोंच नानासाहेब म्हणाले, "दादासाहेब, पांडुरंगाचे हातपाय बांधून टाकावयाची सोळा आणे युक्ति ही कीं, तुम्ही शक्य तितकी घाई करून लग्न करून टाका! म्हणजे सर्व भानगडी आपोआप मिटतील. तुमचें लग्न झाल्यावर मग कांहीं पांडुरंग फिर्यादीच्या भानगडींत पडत नाहीं, हें तुम्ही पक्कें लक्षांत ठेवा." नानासाहेब पुन्हां थोडा वेळ स्तब्ध राहिले. दादासाहेबहि स्तब्ध राहिले होते. या वेळीं दोघेहि आपापलें सावज आपापल्या जाळ्यांत कितपत आलें याचा विचार करीत होते. दादासाहेबांनीं जाणूनबुजून वेड पांघरलें होतें आणि नानासाहेब धूर्तपणाच्या अतिरेकानें खरेखुरे वेडे बनत चालले होते. जगाचा अनुभव नसतांहि एकानें केवळ नीतिधैर्याच्या जोरावर मार्ग आक्रमण्यास आरंभ केला होता, आणि दुसऱ्यानें आजपर्यंतच्या ठकबाजीच्या अनुभवानें मोठा डल्ला मारावयाचें ठरविलें होतें. आपल्या म्हणण्यावर नानासाहेबांनीं पूर्ण विश्वास टाकला, असें दादासाहेबांना वाटत होतें, तर दादासाहेबांवर आपली पूर्ण छाप बसली, असें नानासाहेबांना वाटत होतें. दादासाहेब स्तब्ध बसले आहेत असें पाहून नानासाहेब म्हणाले, "दादासाहेब, आतां यासंबंधानें काळजी करण्याचें बिलकुल कारण नाहीं. ती सर्व जबाबदारी माझ्यावर आहे. इंदिरेपेक्षां सुंदर आणि श्रीमंतांच्या मुली तुम्हांला वाटेल तितक्या मिळतील. शिवाय बराचसा हुंडा मिळण्याचाहि संभव आहे."

दादासाहेब कचरत म्हणाले, "नानासाहेब, वडिलांची आज्ञा उल्लंघन करावी लागत आहे, याबद्दल मला फार वाईट वाटतें; पण त्याला कांहीं इलाज नाहीं. तुमचा सल्ला खरोखरच उत्तम आहे; पण विलायतेस थोडेसे दिवस काढल्यामुळें असें वाटतें कीं, ज्या मुलीबरोबर विवाह करावयाचा, तिला प्रत्यक्ष पाहून मग विवाह करावा. मुलगी नुसती सुंदर आणि कुलीन असून भागणार नाहीं, तर ती स्वभावानें

गोड असून सद्गुणी असली पाहिजे. मग अशी मुलगी गरिबाची असली, तरी मी तिच्याबरोबर लग्न करीन. अहो, ईश्वरानें आम्हांला पैशाला काय कमी केलें आहे! हुंड्याच्या आशेनें एकादें जड लोढणें गळ्यांत बांधून घेण्यास मी मुळींच तयार नाहीं. मातुश्री वृद्ध असून त्या कोठें बाहेर जात नाहींत, या सबबीवर त्यांना दाखविण्यासाठीं मुलीला वाड्यांत आणून चार दिवस सहज ठेवतां येईल. आमच्या आईसाहेबांच्या देखरेखीखालीं चार आठ दिवस मुलगी राहिली, म्हणजे मला तेवढ्यावरून तिच्या स्वभावाची सहज परीक्षा करतां येईल." दादासाहेबांचे हे शब्द नानासाहेबांना अमृताप्रमाणें गोड लागले. त्यांच्या अंतःकरणांतल्या आनंदाला जणूं उकळ्या फुटूं लागल्या. त्यांना एवढा आनंद कां झाला होता, हें वाचकांनीं जाणलें असेलच. जो कार्यभाग साधण्याचा त्यांनीं निश्चय केला होता, जो अत्यंत बिकट आहे, असें त्यांना वाटत होतें आणि ज्यासाठीं त्यांनीं भगीरथ प्रयत्न आरंभिला होता, तो कार्यभाग इतक्या सुलभतेनें साधला जात आहे, हें पाहून नानासाहेबांना कां आनंद होणार नाहीं बरें? तो आनंद चेहऱ्यावर दिसूं नये म्हणून त्यांनीं पुष्कळ प्रयत्न केला; पण त्या आनंदाची बरीचशी छटा दादासाहेबांच्या दृष्टोत्पत्तीस आली. या वेळीं वास्तविक नानासाहेब फारच जपून वागले व त्यांनीं प्रत्येक शब्द फार काळजीपूर्वक उच्चारला; पण दादासाहेब मुद्दाम वेड पांघरून त्यांच्याकडे आल्यामुळें त्यांना नानासाहेबांच्या अंतःकरणांत बरीच खोल बुडी मारतां आली व त्यांच्या अधोगामी वृत्तीची दादासाहेबांना चांगली कल्पनाहि आली. दादासाहेबांचें बोलणें संपल्यावर नानासाहेबांनीं कपाळाला किंचित् आंठ्या घालून मान वर उचलली व जणूं काय त्यांचे डोळे स्थिर राहून ते त्रिखंड शोधीत आहेत, असें त्यांनीं दर्शविलें. नंतर ते म्हणाले, "हो! आहे! अशीच एक मुलगी आहे. मुलगी मोडकळीस आलेल्या सरदाराची आहे; पण फारच सुंदर आणि सालस आहे. त्याच मुलीसंबंधानें प्रथम मी खटपट करतों." नानासाहेबांच्या या म्हणण्यास दादासाहेबांनीं मान हलवून संमति दर्शविली आणि ते त्यांचा निरोप घेऊन बाहेर मोकळ्या हवेंत फिरण्यासाठीं म्हणून गेले. नानासाहेबहि कचेरीच्या बाहेर पडले आणि पुढील कार्याची भव्य इमारत कशी बांधावयाची याचा विचार करीत आपल्या घराकडे वळले. या डावपेंचाच्या लढाईंत नानासाहेबांची पाठ जमिनीला लागून भोळे दादासाहेब विजयी झालेले पाहून पुष्कळांना आश्चर्य वाटेल; पण दादासाहेब भोळे जरी असले, तरी त्यांना दुसऱ्याची लबाडी समजत नव्हती, असें कांहीं नाहीं. लबाडीनें न वागणाऱ्या पुष्कळ सरळ प्रकृतीच्या गृहस्थांना जसा भोळेपणाचा

आरोप सहन करावा लागतो, त्याचप्रमाणें दादासाहेबांवरहि भोळेपणाचा आरोप आला होता. बाकी त्यांच्या मनोभूमीवर जो जसा असेल, त्याचें तसेंच चित्र वठत असे व त्यावरून त्यांना मनुष्याची परीक्षा सहज करतां येत असे. शिवाय नानासाहेबांनीं आपली खरी ओळख संस्थानास करून दिलेली असल्यामुळें आपलें जहाज कोणत्या दिशेनें हांकलें पाहिजे हें ठरविण्यास दादासाहेबांना अर्थातच विशेष त्रास पडला नाहीं.

## प्रकरण सातवें

# सौंदर्यलोभ !

आकाश मेघांनीं व्याप्त झालें होतें. कृष्णवर्णाचे मेघ आकाशांत इतस्ततः धांवत होते. वादळानें दिशा धुंद झाल्या होत्या. क्वचित् वीज चमकून कडकडाटहि होत होता; परंतु पाऊस मात्र पडत नव्हता. सायंकाळची चार वाजण्याची वेळ झालेली असून पश्चिमेस वळलेला सूर्य मधून मधून ढगाच्या आडून आपले कोमल किरण विजयगडच्या संस्थानिकाच्या वाड्यावर पाडीत होता. वाड्याच्या सभोवतीं असलेल्या नानाप्रकारच्या वृक्षावरून ते किरण जेव्हां वाड्यांत प्रवेश करीत, तेव्हां मोठी मौज दिसे. हा देखावा मोठा मौजेचा होता, यांत कांहीं शका नाहीं; पण त्या मौजेंत जेव्हां मध्येंच एकादा प्रचंड कडकडाट होई, तेव्हां अंतःकरणांत लहानशी भीतीची लकेरहि उत्पन्न होत असे. अशा या रम्य वेळीं वाड्याच्या पश्चिम बाजूला असलेल्या एका दिवाणखान्याच्या प्रशस्त खिडकीजवळ खुर्ची घेऊन एक पंधरा सोळा वर्षांची सुंदर मुलगी तो भीषण व रम्य देखावा पहात होती. वास्तविक त्या खिडकीजवळ ती पुस्तक वाचीत बसली होती; परंतु तिचें चित्त पुस्तकापेक्षां या देखाव्यानें अधिक आकृष्ट केल्यामुळें तिनें पुस्तक खालीं ठेवलें आणि ती तो देखावा पाहूं लागली. प्रत्येक क्षणीं आपली आकृति पालटणारे ढग, ढगांच्या मागें सूर्य असल्यामुळें ढगांचे पालटणारे रंग, मध्येंच लवणारी वीज आणि भीत्युत्पादक तो प्रचंड कडकडाट, हा देखावा तिला विशेष मनोहर वाटला. इतक्यांत ते इतस्ततः संचार करणारे ढग एकमेकांत मिसळून त्यांचें आकाशांत छत तयार झालें आणि त्यांतून प्रथम टपाटपा मोठाले थेंब खालीं पडून नंतर धो धो पाऊस पडूं लागला. ही मुलगी ज्या खिडकीजवळ उभी होती, त्या खिडकीपुढें सज्जा असून पावसाचे तुषार या सज्जांत शिरून क्वचित् त्या

मुलीच्या अंगापर्यंत देखील जात होते. असे कांहीं तुषार वाऱ्याच्या लहरीनें अंगावर आले म्हणजे तिला मोठी गम्मत वाटे. उन्हाळ्याचे दिवस संपत आलेले असून पाऊस केव्हां पडतो, असें सर्वांनाच झालें होतें. अशा वेळीं त्या गार तुषारामुळें त्या मुलीला साहजिक पुष्कळ बरें वाटलें. कांहीं तुषार तिच्या गोऱ्या व गुलाबी गालांवर उडून ते जणूं काय कमळावर पडल्याप्रमाणें दिसत होते. त्या पावसाच्या गर्दींत या सुंदर मुलीकडे नजर गेली म्हणजे जणूं काय पाऊस त्या तरुणीचा सत्कार करीत आहे, असें वाटे. ही मुलगी वयानें पंध्रा सोळा वर्षांची असल्यामुळें तिला तरुणी म्हणण्यास कांहीं हरकत नाहीं. ती शरीरानें जरी सुदृढ नव्हती, तरी उंच बांध्याची असल्यामुळें साहजिक थोडी अधिक वयाची दिसत होती. तिचा वर्ण पूर्ण गोरा असा असून त्यांत किंचित् तांबुस झांक होती. हा तांबुसपणा गाल व हनवटी यांवर विशेष स्पष्ट दिसत होता. तिचे अवयव अगदीं रेंखीव असे असून हजार पांचशें स्त्रियांत निवडली जावी इतकी ती सुंदर होती. या वेळीं ती पोपटी रंगाचें जरीकांठी पातळ नेसली होती आणि तें तिला विशेष खुलवीत होतें. त्या तरुणीच्या चेहऱ्यावर सौजन्याची झांक पुष्कळ दिसत होती; पण कपाळावरील कुंकवाच्या बारीक टिकलीनें व वांकड्या भांगानें तें सौजन्य बरेंच लोपलें जात असे. बराच वेळ तो पावसाचा देखावा पाहिल्यावर तिनें आपलें पुस्तक हातांत घेतलें आणि ती आंतल्या दिवाणखान्यांत गेली.

वाड्यांतल्या सर्व दिवाणखान्यांत हा दिवाणखाना विशेष सुशोभित असून तो पुष्कळ मोठाहि होता. दिवाणखान्याच्या तक्तपोशीला बरोबर बसेल एवढा प्रचंड तुर्की गालिचा तेथें आंथरलेला असून ठिकठिकाणीं मखमलीनें मढविलेले कोच व खुर्च्या ठेवलेल्या होत्या. नानाप्रकारच्या हंड्या व झुंबरें छताला टांगलेलीं असून भिंतीलाहि गव्याचीं वगैरे शिंगें व इतर शोभेच्या वस्तु व्यवस्थेनें लावलेल्या होत्या. मधून मधून भिंतीला लागून अर्ध्या सुशोभित स्तंभावर दगडाच्या वगैरे मूर्ति ठेवलेल्या होत्या. कोठें कोठें प्रेक्षणीय स्थळांचीं व पुरुषांचीं छायाचित्रें व तैलचित्रें पद्धतशीरपणें लावलेलीं होतीं. साधारण स्थितींतल्या त्या तरुणीस तो महाल अर्थातच अपूर्व वाटला व प्रत्येक वस्तु ती मोठ्या चौकस दृष्टीनें पाहूं लागली. एका प्रचंड तैलचित्रासमोर उभी राहून ती त्या चित्राचें निरीक्षण करीत असतां एका प्रौढ स्त्रीनें त्या दिवाणखान्यांत प्रवेश केला. या स्त्रीला पाहिल्याबरोबर तिच्या पोशाकावरून ती शागीर्दपेषांतील असावी अशी तेव्हांच कल्पना होईल. या स्त्रीला येतांना पाहून ती तरुणी किंचित् खिन्न स्वरानें म्हणाली, " गोदूताई, मला एकटीला सोडून

तुम्ही कोणीकडे गेलां होतां ? मला एकटीला बाई अगदीं करमेनासें झालें. पाऊस पडला म्हणून मनाची थोडी करमणूक तरी झाली."

आलेल्या स्त्रीचें नांव गोदू. ती म्हणाली, "खालीं कांहीं कामासाठीं गेल्यें, तों माईसाहेबांनीं हांक मारली आणि मग तुमच्यासंबंधानें त्यांनीं मला कित्ती कित्ती तरी प्रश्न केले. त्या सर्वांचीं उत्तरें देतां देतां इतका वेळ झाला. आणखी देखील त्यांनीं कांहीं वेळ मला बसवून घेतलें असतें, पण तितक्यांत त्यांना तुमच्या चहाची आठवण झाली आणि त्यांनीं मला चहा घेऊन जाण्यास सांगितलें. चला, पलीकडच्या खोलींत रामा आचाऱ्यानें चहा आणून ठेवला आहे. आज चहाला वेळ झाला, नाहीं ?"

"छेः कांहीं विशेष नाहीं." असें म्हणून ती तरुण मुलगी गोदूच्या मागें मागें दुसऱ्या खोलींत गेली. तेथें एका सुंदर सफेत दगडी टेबलावर लांबट चांदीचें तबक ठेवलेलें असून चांदीच्या तीन वाट्यांमधून फराळाचें ठेवलेलें होतें. चहासाठीं चांदीचाच पेला असून पेल्याखालची बशीहि चांदीची होती. टेबलाच्या जवळ हातांत चहादाणी व रुमाल वगैरे घेऊन रामा आचारी मोठ्या विनयानें उभा होता. ती तरुण मुलगी एका खुर्चीवर बसून तिनें चाखत माखत थोडें थोडें फराळाचें खाल्लें व नंतर तिनें चहाच्या पेल्याला हात घातला. त्या मुलीचा हात पेल्याकडे वळतांच रामानें ऊन ऊन चहा पेल्यांत ओतून मोठ्या अदबीनें साखर वगैरे पाहिजे कीं काय, तें विचारूं लागला. मुलीनें 'कांहीं नको' म्हणून चहा पिऊन टाकला व हात वगैरे रामानें पुढें केलेल्या रुमालाला पुसून ती गोदूताईसह पुन्हां पूर्वीच्या दिवाणखान्यांत आली. दिवाणखान्यांत आल्यावर ती म्हणाली, "गोदूताई, या दिवाणखान्यांत एवढाल्या मोठाल्या तसबिरी नी फोटो कोणाचे आहेत, हें तुम्हीं मला सांगाल ?" गोदूताई म्हणाली, "हो सांगेन; पण तुम्ही मला नुसतें गोदू म्हणून म्हणत जा. अहो, मी झाडलोट करणारी मोलकरीण. मला गोदूताई म्हटलें कीं कसेंसेंच वाटतें !" ती तरुण मुलगी म्हणाली, "अहो, तुमचें तें नातें माईसाहेबांपाशीं. माझ्याशी नाही. देवानें गोड शब्द दिला असून मी कशाला तुम्हांला [redacted] म्हणूं ? तें असो. मला अगोदर हें सांगा कीं, ही एवढी मोठी तेलांतल्या रंगाची तसबीर कोणाची ?" या वेळीं त्या दोघीहि एका मोठ्या तसबिरीसमोर उभ्या होत्या. गोदू म्हणाली, "हे दादासाहेबांचे वडील अण्णासाहेब. संस्थानच्या सर्व लोकांना हे बापाप्रमाणें पूज्य वाटत होते."

ती तरुण मुलगी म्हणाली, "पुरुष मोठा रुबाबदार होता, असें दिसतें. बरें त्यांच्या शेजारीं ही कोणाची तसबीर?" गोदू थोडें स्मित करून म्हणाली, "यांना तुम्ही ओळखत नाहीं कां? अहो, या तुमच्या सासूबाई! त्या सौभाग्यवती असतांना हें चित्र तयार केलें आहे. आतां त्या विधवा व वृद्ध असल्यामुळें ही तसबीर तुम्हांला ओळखूं आली नसेल." असें म्हणून गोदू स्तब्ध राहिली. ती तरुण मुलगीहि स्तब्ध राहून तें चित्र पहात होती. गोदूनें 'या तुमच्या सासूबाई' असें म्हटलें खरें, पण त्याचा परिणाम त्या तरुण मुलीवर कांहीच झाला नाही. कदाचित् अंतःकरणावर कांहीं झाला असेल, पण तो चेहऱ्यावर मुळींच उमटला नाहीं. नंतर गोदूनें एका मोठ्या फोटोकडे बोट केलें व ती हंसत हंसत खोंचदार स्वरानें म्हणाली, "हा फोटो पाहिलात का? ओळखलेत का कोण आहेत ते?" गोदूनें तो प्रश्न करण्याबरोबर त्या तरुणीची दृष्टि त्या फोटोकडे वळली. उत्कृष्ट सोनेरी चवकटीत तो प्रचड फोटो बसविलेला असून त्यांत दोन व्यक्ती होत्या. फुलझाडांनीं गजबजलेल्या बागेंत एका शिलातलावर बसून एक तरुण मुलगी समोर पडलेल्या फुलांची माळ गुंफीत आहे व त्या तरुण मुलीच्या मागें एक सुंदर तरुण पुरुष उभा असून त्यानें आपली प्रेमळ नजर ती तरुणी व माळ यांवर ठेवलेली आहे, अशा देखाव्याचें हें छायाचित्र होतें. चितारी मोठा कल्पक होता यांत शंका नाहीं. पाहिजे तर त्याला आपण रसिक म्हणूं: पण फोटोंतल्या व्यक्ती त्याच्या इतक्या रसिक नव्हत्या. लज्जेनें त्या तरुणीची दृष्टि बरीच अवनत झाली होती. तरुणहि जरा लाजल्यासारखाच झाला होता. यावरून हा फोटो घेतेवेळी कोणी वडील माणूस जवळच उभा होता, असें अनुमान सहज निघे. गोदू आणि ती तरुण मुलगी त्या फोटोकडे पहात असतां त्यांतल्या पुरुषाकडे बोट करून गोदू पुन्हां म्हणाली, "ओळखलेत का हे कोण ते?" ती तरुणी किंचित लाजल्यासारखें करून म्हणाली, "कोण ते?" हा प्रश्न ऐकून गोदू मोठ्यानें हंसली. ती म्हणाली, "जशी कांहीं खरीच ओळख पटली नाहीं, नाहीं? अहो, ज्यांच्या आपण आतां लवकरच राणीसरकार होणार आहां, तेच–तेच हो हे!"

गोदूच्या या शब्दांनी त्या मुलीचा चेहरा थोडा उत्साहित दिसूं लागला. स्त्रियांच्या स्वभावाप्रमाणें ती गालांतल्या गालांत हंसून बरीच लाजली मुरडलीहि; पण थोड्याच वेळानें तिच्या चेहऱ्यावरील तो आविर्भाव नाहींसा होऊन तेथें खिन्नता पसरली. ही तरुण मुलगी कोण असावी हें वाचकांनीं ओळखलें असेलच. ज्या मुलीबरोबर दादासाहेबांचा विवाह झाला पाहिजे, अशी नानासाहेबांची महत्त्वाकांक्षा होती, तीच ही मुलगी होय. माईसाहेबांनीं या मुलीला लवकर वाड्यांत आणण्याचा आग्रह केल्यामुळें

आणि दादासाहेबांनीहि आपली संमति दर्शविल्यामुळें मोडकळीस आलेल्या या सरदाराच्या मुलीचा म्हणजे शारदेचा वाड्यांत प्रवेश झाला होता. उत्कृष्ट सौंदर्य आणि गोड व शालीन स्वभाव यांमुळें दोन दिवसांच्या अवधींतच माईसाहेबांचें मन शारदेनें पूर्ण आकर्षण केलें होतें. इंदिरेपेक्षां ही मुलगी पुष्कळ चांगली आहे, अशी त्यांची खात्री झाली होती. अशी सुंदर व सद्गुणी सून आपल्या घरी चालत आली आहे, यावरून आपण फार भाग्यवान् आहों, असे विचार माईसाहेबांच्या मनांत येऊं लागले होते. या मुलीला वाड्यांत आणण्यासंबंधानें दादासाहेबांनीं संमति दिली होती, हें खरें, पण या मुलीकडे लक्ष देण्याइतकें त्यांचें मन अद्यापि स्वस्थ झालें नव्हतें. नानासाहेब आणि दादासाहेब या दोघांचेंहि अजून बुद्धियुद्ध चाललेंच होतें. या बुद्धिबळाच्या डावांत कशी मात करावयाची, या काळजीनें दादासाहेबाचें अंतःकरण व्याप्त झालें होतें, तर या डावांत आपणच मात करणार, या अभिमानानें नानासाहेबांचें अंतःकरण दूरदृष्टिशून्य झालें होतें. मनुष्याला थोडाफार स्वार्थ असणें स्वाभाविक आहे, इतकीच हा वेळपर्यंत नानासाहेबांसंबंधानें दादासाहेबांची समजूत होती; पण ते जसजसे अधिक खोल पाण्यांत शिरूं लागले, तसतशी त्यांना नानासाहेबांच्या अंतःकरणाची अधिक ओळख होऊं लागली. नानासाहेबांची बरीच माहिती जेव्हां दादासाहेबांना झाली, तेव्हां झणझणीत अंजन डोळ्यांना बसून दृष्टि शुद्ध व्हावी, त्याप्रमाणें नानासाहेबांच्या एकंदर कारस्थानाचें चित्र दादासाहेबांना स्पष्ट दिसूं लागलें. विशेषतः कित्येक निरपराधी गृहस्थांच्या आयुष्याची माती केल्यामुळें हे शिरोमणी उदयास आले आहेत, हें जेव्हां दादासाहेबांना समजलें, तेव्हां त्यांना अर्थातच अत्यंत सावधगिरीनें प्रत्येक पाऊल टाकावें लागलें. संस्थानचा अधिकार आणि संस्थानिकाचें लग्न या दोन गोष्टींची कांही विलक्षण सांखळी जोडण्याची नानासाहेबांची तयारी आहे, हें जेव्हां दादासाहेबांना समजलें, तेव्हां तर त्यांना नानासाहेबांचा फार राग आला; पण परिस्थिति अशी चमत्कारिक की, तो व्यक्त करण्याची देखील दादासाहेबांना सोय उरली नव्हती. या विषारी सर्पाला खिजवतां कामा नये. नाहींतर तो दंश करावयाला कमी करणार नाहीं, ही दादासाहेबांची पूर्ण खात्री झाली होती. या सर्पाचे विषारी दांत पाडून मग त्याला पेटाऱ्यांत ठेवला पाहिजे. त्या अगोदर त्याला दुखविणें योग्य नसल्यामुळें दादासाहेबांनीं बेमालूम वेड पांघरलें होतें व त्याचमुळें शारदेचा वाड्यांत अनायासें प्रवेश झाला होता. नानासाहेबांनीं या यक्षिणीच्या कांडीनें सर्व संस्थान पालथें करण्याचा कृतसंकल्प केला होता; परंतु स्वतः ही

यक्षिणीची कांडी नानासाहेबांइतक्या उलट्या काळजाची नसल्यामुळें ही मोहरे-मात नानासाहेबांना साधली नाहीं. या विषारी सर्पाला आंजारून गोंजारून हातांत आणण्याचा दादासाहेबांचा प्रयत्न मात्र यशस्वी होत चालला होता. शारदेचा वाड्यात प्रवेश करविला, तेव्हा आपलें आतां अध काम झालें, असें नानासाहेबांना वाटलें व अर्थातच त्यामुळें त्यांच्या भोंवतालीं त्यांच्या प्रतिस्पर्ध्यांनीं जें जाळें विणण्यास आरंभ केला होता, त्याकडे त्यांचें दुर्लक्ष झालें. स्वतः शारदेच्या चित्तवृत्तीचा मात्र मोठा गोंधळ उडाला होता. पहिल्यापासून तिच्या मनांत दादासाहेबांविषयी प्रेम उत्पन्न झालें होतें; परंतु कोणत्या कारणामुळें असेल तें असो, त्या सुपुरुषाची प्राप्ति आपणांस होणार नाहीं, असें तिला वाटत होतें. अशा स्थितींत तिचा जेव्हां वाड्यांत प्रवेश झाला, तेव्हां तिलाहि आश्चर्य वाटलें; तरी पण तिची ती भावना मात्र नाहीशी झाली नव्हती. आईची खटपट, नानासाहेबांचा दीर्घोद्योग आणि स्वतः माईसाहेब अनुकूल; तेव्हां वास्तविक शारदेच्या मनांतून ती भावना दूर व्हावयास पाहिजे होती; परंतु त्या भावनेनें तिच्या मनाला सोडलें नाहीं. गोदूनें तिची थट्टा केल्यावर ती थोडीशी लाजली, मुरडली, हें खरें, पण त्या चित्राकडे तिची दृष्टि मात्र तशीच होती. दादासाहेबांच्या सुंदर चेहऱ्याचें निरीक्षण झाल्यावर शारदेची दृष्टि शिलातलावर बसलेल्या तरुणीकडे वळली. तिच्या त्या शांत, गंभीर व प्रभावशाली चेहऱ्याकडे शारदा किती तरी वेळ पहात होती. नंतर हळूच गोदूला म्हणाली, "कांहो गोदूबाई, दगडाच्या बैठकीवर माळ गुंफित बसलेल्या या बाई कोण?"

शारदेचा हा प्रश्न अगदीं सोपा होता; पण त्याचें उत्तर तितकें सोपें नव्हतें. शारदेच्या त्या प्रश्नाला काय उत्तर द्यावें, याचा गोदूला खरोखरच विचार पडला. बराच वेळ झाला तरी गोदूकडून उत्तर मिळत नाही, असें पाहून शारदेनें पुनः तो प्रश्न केला. तेव्हां गोदूचा नाइलाज झाला. ती म्हणाली, "त्यांचें नांव इंदिराबाई. त्यांच्याच बरोबर दादासाहेबांचा विवाह व्हावयाचा होता; पण—"

"पण काय? कोणत्या कारणामुळें विवाह व्हावयाचें राहिलें? यांचा चेहरा किती घवघवीत, शांत आणि गंभीर दिसतो! मोठ्या स्वरूपवान् असून भाग्यवान् दिसतात. मग हा विवाह कां राहिला?"

बिचारी गोदू या प्रश्नाचें काय उत्तर देणार? तिला तें एक मोठें संकटच वाटलें. आणि त्या संकटांतून सुटण्यास मुग्धतेशिवाय तिला दुसरा उपायहि सांपडेना. पण

शेवटीं गोदूचा निरुपाय झाला. सरळ प्रकृतीच्या शारदेनें गोदूचा हात धरून एका कोंचावर तिला अगदीं आपल्या शेजारीं बसविलें व ती हकीकत सांगण्याविषयीं तिनें गोदूला फार गळ घातली. शारदेचा तो निरभिमानी प्रेमळ स्वभाव व ती हकीकत सांगण्याविषयीं शारदेनें केलेला आग्रह, यांमुळें गोदूचा नाइलाज झाला आणि शारदेला ती सर्व हकीकत मोकळ्या मनानें तिनें सांगितली. इंदिरेविषयीं गोदूच्या मनांत फार आदर होता व त्याचमुळें ती हकीकत सांगण्यास मागे पुढें पहात होती परंतु; ती हकीकत ऐकत असतां मधून मधून जेव्हां इंदूविषयीं शारदा सहानुभूति दर्शवूं लागली, तेव्हां सांगण्याच्या भरांत गोदूला धोरण राहिलें नाहीं व तिच्या तोंडांतून चार-दोन वाक्यें नानासाहेबांसंबंधानें तिरस्कारदर्शक अशीं बाहेर पडलीं. शारदेचें आणि गोदूचें जेव्हां त्या प्रसंगीं मेतकूट जमलें, तेव्हां गोदू सर्व हकीकत सांगूं लागली आणि शारदाहि तिला मधून मधून सूचक असे प्रश्न विचारीत होती. दोघीचा तो संवाद सूर्यास्त होऊन दिवे लागले, तरी चालला होता. इंदूसंबंधानें सांगण्यासारखी जेव्हां कोणतीच गोष्ट राहिली नाही, तेव्हां त्या दोघीचा तो संवाद संपला व नंतर तेथून त्या दोघी दुसऱ्या दिवाणखान्यांत गेल्या.

रात्रीचें जेवण वगैरे झाल्यावर शारदेला निजण्यासाठीं जी खोली दिली होती त्या खोलीत जाऊन शारदा तिच्या पलंगावर निजली; पण तिला चांगली झोंप लागेना. गोदू तिला वारा घालीत जवळच उभी होती. तिला अजूनहि मधून मधून इंदिरेविषयीं कांही प्रश्न शारदा विचारीत होती. गोदूहि त्या प्रश्नांची मोकळ्या मनानें उत्तरें देत होती. चार दोन मिनिटें देखील गोदूनें वारा घातला नसेल, तोंच तिच्या हातांतून पंखा घेऊन शारदा म्हणाली, “ गोदूबाई, माझी सेवा करून मला उगीच लाजवूं नका. तुम्हांला असा त्रास देणें माझ्या मनाला अगदीं आवडत नाहीं. तुम्ही तुमच्या गादीवर पडा आणि स्वस्थ निजा.” शारदेचें हें सौजन्य पाहून गोदूला मोठें नवल वाटलें. फुकटची श्रीमंती भोगण्यासाठी ज्या कांहीं पाहुण्या वाड्यांत येत असत, त्यांच्यांत आणि शारदेंत हा जो फरक दिसून आला, त्याबद्दल गोदूला आश्चर्य वाटणें साहजिक होतें. कांही वेळानें दोघीनाहि झोंप लागली; परंतु शारदेला जशी लागावी तशी झोंप लागली नाहीं. तिच्या मनांत इंदिरेविषयी अनेक विचार येत होते व ते विचार चित्तांत घोळत असतां मधून मधून क्वचित् तिचा डोळा लागत होता. त्या झोंपेत शारदेला एक चमत्कारिक स्वप्न पडलें. एक मोठी नदी वहात असून घाटावर इंदिरा धूत आहे, असें प्रथम शारदेच्या दृष्टीस पडलें. नदीचें पाणी धो धो वहात असून घाटहि मोठा होता; परंतु त्या विस्तृत घाटावर इंदिरे-

शिवाय दुसरें कोणीहि नव्हतें. शारदा हळुहळू इंदिरेकडे गेली आणि तिला नीट निरखून पाहूं लागली. इंदिरेनें आपले लांब सडक केंस पाठीवर मोकळे सोडलेले असून, एकाद्या गोसावणीसारखें ती एक भगव्या रंगाचें पातळ नेसली होती. इतका वेळ इंदिरा अगदी शांत दिसत होती; पण समोर शारदेला पाहून इंदिरेचा चेहरा गोरामोरा झाला व ती भीतिविव्हल स्वरानें म्हणाली, ' बाई, तुमच्या पायां पडतें. मला आतां अधिक त्रास देऊं नका. मीं तुमचें काडीचेंहि नुकसान केलें नसतां कां मला छळतां ? माझ्या या सुखावर तरी आतां घाला घालूं नका.' इंदिरेचे हे शब्द ऐकून शारदेला फार वाईट वाटलें. इंदूची क्षमा मागावी म्हणून ती आणखी पुढें गेली; पण तिला जवळ येतांना पाहून इदू भयानें ओरडूं लागली. ती म्हणाली, ' माते गंगे, आतां माझें रक्षण करण्यास तुझ्यावांचून कोणी समर्थ नाहीं.' असें इंदू म्हणाली आणि तिनें धाडकन् पाण्यांत उडी घेतली. तो प्रकार पाहून शारदा फारच घाबरली. इंदूला पाण्यांतून काढावें म्हणून ती पाण्यांत उतरली; पण तिला पुढें जाण्याचें धैर्य होईना. इतक्यांत शारदा जेथे उभी होती तेथचें पाणी वाढूं लागलें. मोठाल्या लाटा तिच्या अंगावर आदळूं लागल्या आणि त्या भयानें ती मोठ्यानें ओरडूं लागली. त्या ओरडण्यानें गोदावरी जागी झाली. ' शारदाबाई, शारदाबाई ' म्हणून हातानें हलवून तिनें शारदेला जागें केलें. शारदा जागी झाल्यावर गोदू म्हणाली, " शारदाबाई, झोपेंत ओरडलांत का ? कांहीं वेडेंवांकडें स्वप्न पडलें कीं काय ? " शारदेनें बराच वेळपर्यंत या प्रश्नाचें उत्तर दिलें नाही. तिचा चेहरा भीतिविव्हल झालेला होता आणि अनेक चमत्कारिक विचार तिच्या चित्तांत घोळत होते. गोदूला खरें सांगावें कीं खोटें सांगावें याचा विचार करून शारदा म्हणाली, " गोदूबाई, मला कांहीं तरी चमत्कारिक स्वप्न पडलें आणि त्यांत मी ओरडलें असें वाटतें; पण स्वप्नांत काय असें मी भयंकर पाहिलें, तें मात्र मला आठवत नाही. " या वेळीं गोदूच्या डोळ्यांवर भरपूर झोंप आलेली असल्यामुळें तिनें शारदेच्या या उत्तरावर समाधान मानलें व तिला कांहींतरी सांगून त्या दोघीहि पुनः निजल्या. त्या रात्रीं शारदेला कांहीं चांगली झोंप लागली नाहीं. तिला पुनः स्वप्न पडलें नाहीं, हें खरें; पण तिच्या डोळ्यांसमोर इंदिरेची ती संन्यासिनी वेशांतली गंभीर मूर्ति वारंवार दिसत होती व त्याचसंबंधाचे विचारहि तिच्या अंतःकरणांत घोळत होते.

दुसऱ्या दिवशीं दुपारचें जेवण वगैरे झाल्यावर सगळ्यांत मोठ्या असलेल्या दिवाणखान्यांत शारदा पुनः गेली व तेथील चित्रें वगैरे वस्तूंचें निरीक्षण करूं लागली. चित्रें पहातां पहातां शारदा त्या कालच्या फोटोजवळ आली व किती वेळ

तरी तो फोटो ती पहात होती. फोटो उंच असल्यामुळें तो आपणास चांगला दिसत नाहीं, असे शारदेला वाटलें व म्हणून एका खुर्चीवर चढून तो तिनें हातांत काढून घेतला. एका कोंचावर बसून तिनें तो फोटो आपल्या मांडीवर ठेवला व निश्चल दृष्टीनें त्याकडे ती पाहूं लागली. तिचे डोळे दादासाहेबांकडे गुंतलेले नसून इंदिरेकडे गुंतलेले होते. क्षणभर इंदिरेच्या चेहऱ्याचें निरीक्षण केल्यावर तिचे डोळे पाण्यानें भरून आले व कांहीं अश्रु गालांवरून खालीहि पडले. इंदिरेच्या दर्शनानें शारदेच्या डोळ्यांतून अश्रू पडत आहेत, हें पाहून गोदूनें शारदेला किती तरी प्रश्न विचारले असते, पण ती या वेळीं तेथें नव्हती, हें शारदेचें मोठें भाग्य होय. इंदिरेच्या त्या रम्य मूर्तीकडे पहात असतां शारदा आपल्या मनाशींच बोलूं लागली. ती म्हणाली, "इंदिराबाई, मला क्षमा करा. मी तुमच्या सौख्याच्या आड केव्हांहि येणार नाहीं !"

आणखी किती वेळ तरी तो फोटो पहात शारदा बसली असती; परंतु तितक्यांत पलीकडच्या दिवाणखान्यांत कोणी तरी बोलत आहेत, असें तिला वाटल्यामुळें तिनें घाईघाईनें तो फोटो जेथून घेतला होता, तेथें टांगून ठेवला व त्या समोरच असलेल्या कोंचावर बसून एक पुस्तक वाचू लागली. हातांतल्या पुस्तकाच्या दहा पांच ओळी तिनें वाचल्या असतील नसतील, तोंच त्या दिवाणखान्यांत दादासाहेबांनीं प्रवेश केला. आजहि आकाश ढगांनीं व्याप्त झालेलें असून चांगलेंच उकडत होतें. आकाश अभ्राच्छादित असल्यामुळें दिवाणखान्यांत बेताचाच प्रकाश पडलेला होता. दादासाहेबांनीं दिवाणखान्यांत जेव्हां प्रवेश केला, तेव्हां त्यांचा चेहरा उद्विग्न झालेला असून त्यावर चिंतेची छटा अधिक उमटलेली होती. आणि त्यांचा आणि नानासाहेबांचा बराच वेळ वादविवाद झाला होता आणि नानासाहेबांना निरोप देऊन त्यांनी नुकताच या दिवाणखान्यांत प्रवेश केला होता. दादासाहेबांनी आपल्या कार्यसिद्धीसाठीं वेड पांघरलें होतें खरें, पण या सोंगाची बतावणी अखेरपर्यंत कशी साधेल याची त्यांना साहजिक काळजी वाटत होती. प्रतारणेवांचून त्यांना दुसरा कांहीं उपाय नव्हता; पण ही प्रतारणा नानासाहेबांसारख्याशीं करावयाची असल्यामुळें आपण कोठें चुकतों की काय अशी दादासाहेबांना क्षणोक्षणीं भीति वाटत होती. नानासाहेबांच्या प्रत्येक म्हणण्यास संमति दर्शविल्यामुळें प्रत्यक्ष शारदेचा देखील वाड्यांत प्रवेश झाला होता व त्यामुळें आतां हा पेंच कसा सोडवावा या काळजींत दादासाहेब सापडले होते. तिकडे दिनकर वगैरे मंडळीचेंहि या एकंदर प्रकरणावर लक्ष होतेंच. शारदा मुंबई सोडून विजयगडास गेली, हें जेव्हां

त्याला समजलें, तेव्हां त्यानेंहि पुण्याचा मुक्काम हलवून गुप्तपणें विजयगडला प्रवेश केला होता. तो विजयगडला आल्यावर दादासाहेबांच्या व त्याच्या गुप्त बैठकी होऊन पुढील कार्याची योजनाहि तयार होत होती. अशा रीतीनें दिनकराची सल्लामसलत मिळूं लागल्यामुळें दादासाहेबांना अर्थात् थोडा धीर वाटत होता. शारदेला वाड्यांत येऊन चार पांच दिवस झाले होते, तरी अद्यापि तिचें आणि दादासाहेबांचें भाषण असे झालें नव्हतें आणि आजहि शारदेशीं बोलावें म्हणून दादासाहेबांनीं कांहीं या दिवाणखान्यांत प्रवेश केला नव्हता. इतकेंच नव्हे, तर त्या दिवाणखान्यांत शारदा असेल, अशी त्यांना कल्पनाहि नव्हती. शारदेसंबंधानें काय तें लवकर सांगा, असा नानासाहेबांनीं तगादा केल्यामुळें आज त्यांचें मन उद्विग्न झालें होतें व मनास बरें वाटावें म्हणून त्यांनी या दिवाणखान्यांत प्रवेश केला होता. दिवाणखान्याच्या आंत पाऊल ठेवल्याबरोबर त्यांना प्रथम आपल्या आईबापांचें दर्शन झालें. समोरच्याच भिंतीला तीं दोन प्रचंड तैलचित्रें टांगलेलीं होतीं. त्या दोन्ही चित्रांसमोर क्षणभर उभें राहून दादासाहेब एकतान वृत्तीनें आईबापांचें दर्शन घेत होते. त्या दोन्ही चित्रांत आत्मा असून जणूं काय दोघेंहि आपणाकडे स्नेहमय दृष्टीनें पहात आहेत, असें दादासाहेबांना वाटलें. तीं दोन्ही चित्रें पहात असतां हा वेळपर्यंतचें सबंध आयुष्य त्यांच्यापुढें चित्रपटाप्रमाणें उभें राहिलें व आयुष्यांतला प्रत्येक विशेष प्रसंग त्यांना स्पष्ट दिसूं लागला. विशेषतः इंदिरेच्या वाग्दानप्रसंगीं जमलेले आप्तस्वकीय, तो प्रचंड समारंभ, इंदिरा व दादासाहेब यांना एकत्र बसवून ब्राह्मणांनी केलेला वेदघोष, इंदिरेनें लज्जेनें खालीं घातलेली मान, वगैरे सर्व कांहीं दादासाहेबांना स्पष्ट दिसूं लागलें. हा प्रसंग डोळ्यांसमोरून जातो न जातो तोंच बापाची मृत्युशय्या दादासाहेबांना दिसूं लागली. दुखण्यानें अशक्त झालेली बापाची ती शरीरयष्टि, आप्तस्वकीय व वैद्य वगैरेंचे काळवंडलेले चेहरे, अंतकाळची आलेली ती वेळ आणि त्या वेळी मृत्यूच्या यातना बाजूला सारून बापानें इंदिरेबरोबर लग्न करण्याविषयी केलेली आज्ञा, हें जणूं काय आपण प्रत्यक्ष पहात आहों, असें दादासाहेबांना वाटलें. त्या आठवणीनें दादासाहेबांचे डोळे अश्रूंनी भरून आले, नंतर त्यांनीं आपले डोळे पुसले आणि ते पुढें जाऊं लागले. शारदा या वेळी मोठ्या अडचणींत सांपडली होती. त्या दिवाणखान्यांतून दुसरीकडे जावें, असें तिला वाटत होतें, पण जाण्याचा मार्ग अगदी दादासाहेबांच्या अंगावरून असल्यामुळें तिचा नाइलाज होऊन ती एका कोचाजवळ मोठ्या विनयानें उभी होती. दादासाहेब अंमळ पुढें सरकतात, तोंच त्यांची नजर शारदेवर गेली. याच वेळीं शारदेनें

चोरट्या नजरेनें दादासाहेबांकडे पाहिलें आणि लागलीच ती लाजून खालीं पाहूं लागली. शारदेची ती तरुणावस्था, तिचें तें सौदर्य आणि तिचें तें लाजणें, हीं पाहून दादासाहेब थोडा वेळ स्तंभित झाले. शारदेसंबधानें हा वेळपर्यंत त्यांची कल्पना अगदींच निराळी होती. ती म्हणजे एक सौदर्यखनी आहे, एवढीच त्यांची समजूत होती; पण आतां त्यांनीं जेव्हां शारदेला अगदीं जवळ असतांना पाहिलें, तेव्हां त्यांचा तो भ्रम दूर झाला आणि सौदर्याबरोबर शालिनताहि भरपूर आहे, असें त्यांना दिसून आलें. हा वेळपर्यंत शारदेसंबंधानें बरावाईट असा कोणताच विचार दादासाहेबांच्या मनांत आला नव्हता; परंतु आतां शारदेला पाहून त्यांची स्थिति चमत्कारिक झाली. तिच्याविषयी तिरस्कार दर्शविण्याचें किंवा उदासीन रहाण्याचें तर दूरच राहिलें, पण उलट तिला प्रेमभरानें कांहीतरी विचारावें असें दादासाहेबांना वाटूं लागलें. आत्मसंयमन करण्याचा त्या वेळीं त्यांनीं पुष्कळ प्रयत्न केला, पण तो त्यांना साधला नाही. आपण जणू काय मन्त्रशक्तीनें शारदेजवळ जात आहों, असे त्यांना वाटू लागलें. कोण हा सौदर्यमोह ! एक वेळ दादासाहेबांना असे वाटे की, येथून चटकन् चालतें व्हावें; पण शारदेशी दोन शब्द बोलण्याचा मोह त्यांना सुटेना. ते त्या उद्देशानें आणखी दोन पावलें पुढें सरकले. इकडे शारदेची स्थिति मात्र अगदीं अनुकंपनीय झाली. कसें तरी करून येथून निघून जावें असें तिला वाटलें आणि ती मध्यें असलेल्या टेबलाला वळसा घालून जाऊंहि लागली; पण दादासाहेब त्याच बाजूनें पुढें झाले आणि हंसत हंसत म्हणाले, "हें काय ! मी आल्याबरोबर आपण उठलां कां ? आपण खुशाल बसा. येथें आल्यापासून आपणास कांहीं अडचण वाटत नाहीना ? तसें कांहीं असेल, तर आपण माई-साहेबांना कळवा, म्हणजे त्या सर्व व्यवस्था लावतील." शारदा कांहींच बोलली नाही. ती पूर्वीप्रमाणेंच निमूटपणें उभी होती. इतका वेळ शारदेचें मन निर्विकार होतें; पण दादासाहेबांचा तो गोड स्वर ऐकून तिच्या अंतःकरणांतहि थोडी गडबड उडाली. दादासाहेब आतां अगदी कोचाच्या जवळ गेले व म्हणाले, "शारदाबाई, बसा आपण. उभें राहण्याचें कांही कारण नाहीं." शारदेच्या मनांत असेंच उभे राहावें आणि संधि मिळतांच येथून चालतें व्हावें, असें होतें; पण तित-क्यांत तिला काय वाटालें कोण जाणे, ती हळूच विनयानें कोचाच्या कोपऱ्यावर बसली. दादासाहेब आणखी थोडे जवळ आले. शारदेच्या हातांत एक पुस्तक आहे असें पाहून ते म्हणाले, "कोणत्या पुस्तकाचें वाचन चाललें होतें ?" अद्यापिहि शारदेनें मुग्धताच स्वीकारली होती. दादासाहेबांची स्थिति मात्र हळूहळू चमत्का-

रिक होत चालली होती. अंतःकरणांतली विचारशक्ति नष्ट होऊन, तेथें हळूहळू विकाराचें प्राबल्य वाढूं लागलें होतें. ते शारदेच्या जवळच कोचावर बसले आणि हंसत हंसत म्हणाले, "आमच्याशीं अबोला धरलेला आहे वाटतें!" शारदा कांहींच बोलली नाहीं. दादासाहेब त्याच कोचावर आणि अगदीं जवळ बसल्यामुळें शारदेचा जीव लाजेनें खालींवर होऊं लागला. तेथें कोणी नव्हतें, तरी तिचें मन तिला खाऊं लागलें. दादासाहेब कोचावर बसतांच ती कोचावरून उठली आणि तेथून दुसरीकडे जाण्यासाठीं तिनें पाऊल उचललें. आतां मात्र दादासाहेबांचा सौंदर्यमोह अनावर झाला. ते आपली परिस्थिति पूर्ण विसरले आणि शारदेचा कोमल हात त्यांनी आपल्या हातांत दाबून धरला. हा प्रसंग शारदेला अत्यंत अनुचित वाटून ती आपला हात सोडवीत होती; पण दादासाहेबांनी तो घट्ट धरल्यामुळें सुटेना. या प्रेमरोषानें शारदेचा चेहरा लाल झाला होता. दादासाहेबांचें शरीरहि रोमांचित झालें होतें. इतक्यांत त्या दिवाणखान्यांत गोदूनें प्रवेश केला. दरवाज्याच्या आंत पाय टाकतांच ती म्हणाली, "शारदाबाई, लवकर चला. चहा आणून ठेवला आहे. निवून जाईल." हे शब्द बोलतां बोलतांच तिची दृष्टि कोचाकडे गेली आणि दादासाहेबांच्या हातांत शारदेचा हात आहे, असे तिच्या दृष्टीस पडलें. तो प्रकार पाहून ती मोलकरीण विलक्षण चपापली व त्याच पावली मागें परतली. गोदूला पाहातांच एखाद्या तस्कराप्रमाणें दादासाहेबांचा चेहरा खरकन् उतरला व शारदेचा हात सोडून देऊन ते आपल्या खाजगी दिवाणखान्यांत निघून गेले.

आपण कांहीतरी मोठा विलक्षण अपराध केला, असें वाटून दादासाहेबांची स्थिति मोठी चमत्कारिक झाली होती. दिवाणखान्यांत जातांच त्यांनीं आंतून दार बंद करून घेतलें आणि ते पलंगावर जाऊन पडले. झालें हें बरें झालें, कीं वाईट झालें, याचा त्यांना कांही वेळ ठावच लागला नाहीं. विकारानें गढूळ झालेलें अंतःकरण थोड्या वेळानें निवळून जेव्हां तें स्वच्छ झालें, तेव्हां झालें हें वाईट झालें असें त्यांना वाटलें व याबद्दल आतां कोणता दड भोगला पाहिजे याचा ते विचार करूं लागले. इंदिरेपेक्षां शारदा निःसंशय अधिक सुंदर आहे, अशी त्यांची आज खात्री झाली व त्यामुळें त्यांच्या मनाचें आंदोलन होऊं लागलें. केव्हां केव्हां त्यांच्या मनांत असे चमत्कारिक विचार उत्पन्न होत की, घरीं चालत आलेल्या शारदेबरोबर विवाह करून त्या सौंदर्यलतिकेच्या सहवासानेंच आयुष्य घालवावें; पण तितक्यांत त्यांच्या समोर इंदिरेची ती शांत, गंभीर व लक्ष्मीप्रमाणें मनोहर मूर्ति उभी राहून त्यांचा तो विचार पालटे. शारदा आणि इंदिरा या दोघींना एकाच वेळीं आपल्या

दृष्टीपुढें ठेवून त्या दोघींचें निरीक्षण दादासाहेब जेव्हां करूं लागले, तेव्हां दोघीहि सुंदरच आहेत, असे त्यांना वाटलें; परंतु एकीच्या सौंदर्यात उन्मादकता तर एकीच्या सौंदर्यात निर्लोभता आहे, असें त्यांना दिसून आलें. तेव्हां जी सौंदर्यखनि विषवल्लीप्रमाणें अंतःकरण मलीन करणार, त्या सौंदर्यलतिकेचा सहवास खचित भयावह होय, असें दादासाहेबांना वाटलें. नानासाहेबांविषयीं त्यांचें मन अगोदरच विटल्यामुळें शारदेसारखी लावण्यलतिका शोधून आणण्यांतहि त्यांचा असाच कांहीतरी हेतु असावा, असा दादासाहेबांना संशय आला. मनुष्याचें मन एकदां संशयग्रस्त झालें म्हणजे त्याला अनेक संशय येतात व त्याप्रमाणें मग दादासाहेबांना शारदेविषयीहि अनेक संशय आले. शेवटीं दादासाहेबांनी असे ठरविलें की, शारदेकडे पुनः पहावयाचें देखील नाहीं. शारदा सुंदर आहे ! असेल; पण माझ्या इंदिरेच्या सौंदर्याप्रमाणें त्यांत शांतभाव नाहीं ! शारदा सद्गुणी आहे ! असेल; पण माझ्या इंदिरेप्रमाणें तिच्या सद्गुणांत पावित्र्य नाहीं ! शारदा विद्यासंपन्न आहे ! असेल; पण माझ्या इंदिरेप्रमाणें तिच्या शिक्षणांत सखोलता नाही ! असे एक दोन नाही, तर शेंकडों विचार दादासाहेबांच्या चित्तांत एकामागून एक गर्दी करूं लागले व त्यांनीं आपल्या हृदयमंदिरांत इंदिरेचीच शांत व गंभीर मूर्ति प्रस्थापित केली. व्यामोह नाहीसा होऊन दादासाहेबांची चित्तवृत्ति इतकी जेव्हां निवळली, तेव्हां ते आपल्या मनाशीच म्हणाले, "अरेरे ! तर मग त्या निर्बोध शारदेच्या हाताला मी कशाला स्पर्श केला ? खरोखर मोठी वाईट गोष्ट झाली. ती अनुत्सुक असतांहि मी अगदीं मूर्खाप्रमाणें वागलों. कसेंहि असो, त्या तरुणीची क्षमा मागितली पाहिजे." ह्या क्षमेचा विचार जेव्हां दादासाहेबांच्या मनांत आला, तेव्हां त्यांच्या अंतःकरणांत साहजिक थोडें समाधान उत्पन्न झालें. त्या विचारतरंगांत असतां दादासाहेबांचा डोळा लागला; पण ह्या झोंपेंत स्वप्नसृष्टि निर्माण होऊन त्यांना पुनः इंदिरा, शारदा व नानासाहेब यांचें दर्शन होऊं लागलें.

हिरव्यागार डोंगराळ प्रदेशांत एक लहानशी नदी वहात असून त्या नदीच्या कांठीं आपण व इंदिरा अशी उभयतां एका पर्णकुटिकेत तापसी वेषानें रहात आहों, असें स्वप्नांत दादासाहेबांना दिसूं लागलें. दोघांचीहि कालक्रमणा तेथें फार सुखानें चालली असतां एके दिवशीं अकस्मात शारदा तेथें आली. नदीच्या कांठीं एका दगडावर दोघें बसून तेथील अपूर्व सृष्टिसौंदर्य पहात असतां व त्यासंबंधानेंच दोघांचें हितगुज चाललें असतां समोर शारदेला पाहून दादासाहेबांना विलक्षण भीति वाटली. शारदेचा चेहरा क्रुद्ध झालेला असून ती कांहीं बडबडतच येत होती. दादासाहेबांच्या अगदीं जवळ आल्यावर ती रागानें म्हणाली, 'मला सोडून तुम्ही कोठेंहि

गेलां, तरी मी त्रिखंडांतून तुम्हांला शोधून काढीन. सांगा, मला तुमच्या पर्णकुटिकेंत आश्रय देतां कीं नाही?' दादासाहेब भीत भीत म्हणाले, 'शारदे, क्षमा कर, जोंपर्यंत हा आश्रमधर्म पाळावयाचा आहे, तोंपर्यंत माझ्या पर्णकुटिकेंत तुला आश्रय मिळावयाचा नाहीं.' दादासाहेबांचे हे शब्द ऐकून शारदेचा कोप अनावर झाला. ती म्हणाली, 'ठीक आहे. नका देऊं. ही नदी कांहीं तुमच्याइतकी निर्दय नाही! तुम्ही आश्रय दिला नाही, तर ती देईल!' असें म्हणून शारदेनें धाडकन् नदीत उडी फेंकली. त्याबरोबर झोंपेंत ओरडून दादासाहेब जागे झाले. ते चटकन् आंथरुणावर उठून बसले आणि त्यांनी सर्वत्र एकवार नजर टाकली. जणुं काय नदी, पर्णकुटिका आणि शारदा ही जवळपास कोठें दिसत नाहीत ना, अशी ते आपली खात्री करून घेत होते. या स्वप्नाचा दादासाहेबांच्या मनावर बराच परिणाम झाला होता व त्यांचा चेहराहि खिन्न झाला होता. स्वप्नाबद्दलची मीमांसा कशीहि असली, तरी इतकी गोष्ट खरी की, पुष्कळ धैर्याचे पुतळे देखील एखाद्या विलक्षण स्वप्नानें थोडा वेळ तरी विषण्ण होतात. दादासाहेबांच्या अंतःकरणांतहि यावेळीं असाच गोंधळ उडाला होता. इतका वेळ त्यांची अशी समजूत होती की, शारदेचा जसा अनायासे घरांत प्रवेश झाला, त्याप्रमाणें ती निमूटपणें घरांतून निघून जाईल; परंतु या स्वप्नामुळें हें उंटाचें पिल्लुं घरांतून निघणें कठिण आहे, असे त्यांना वाटलें. या प्रश्नाचा विचार करीत ते आथरुणावर पडले असतां पुन्हां त्यांना झोंप लागली; पण तेव्हांहि स्वप्नानें त्यांना सोडलें नाही. आतां त्यांना स्वतःच्या लग्नाचा मोठा समारंभ दिसूं लागला. इंदिरेचें व आपलें लग्न मोठ्या थाटानें झालें असून तो उत्सव चार दिवस धूमधडाक्यानें सर्व विजयगडभर चाललेला त्यांना दिसला. मिरवणुकी वगैरे समारंभ आटोपल्यावर शेवटच्या दिवशीं संस्थानांतल्या गोरगरिबाना दोन दिवसांचा भरपूर कच्चा शिधा व आंगभर नवी वस्त्रे देण्यास सुरवात झाली. ही व्यवस्था स्वतः इंदिरा व आपण लावीत आहों, असे त्यांना दिसलें. लक्षावधि दरिद्री येऊन गेल्यावर जिचें शरीर रोडलें आहे, आंगावर फाटकें वस्त्र आहे, केंस मलीन झालेले असून ते पाठीवर अव्यवस्थित पडले आहेत, आणि जिच्या हातांत भिक्षापात्र आहे, अशी एक भिकारीण दादासाहेबांपुढें येऊन उभी राहिली. तिचा तो रोडका व भेसूर चेहरा पाहतांच दादासाहेब भयानें विव्हल झाले. ते म्हणाले, 'शारदे, अगदीं वेळेवर आलीस. तुला काय पाहिजे तें माग. मी तें तुला आतांच देण्याची व्यवस्था करतों.' हें ऐकून शारदेनें एकवार रागानें दादासाहेबांवर नजर टाकली. नंतर ती म्हणाली, 'मला तुमच्याशिवाय दुसरें कांहीं नको. तुम्ही स्वतः

मला मिळालां, म्हणजे मला सर्व कांहीं मिळालें. हें एवढें दान देतां का मला?' शारदेचे हे शब्द ऐकून दादासाहेबांचा चेहरा चिंतातुर झाला. ते म्हणाले, 'शारदे, माझी आशा तूं आतां सोडून दे; तुला माझ्यापेक्षां अनेक भाग्यवान् पुरुष मिळतील. जिकडे तुला सुख होण्यासारखें असेल, तिकडे तूं खुशाल जा. हें ऐकून शारदा विकट हास्य करूं लागली. ती म्हणाली, 'मला आतां कोणीकडे सुख होण्यासारखें आहे, तें तुम्हांला दाखवूं कां? हें पहा, इकडे पहा!' असें म्हणून शारदेनें खालीं जमिनीकडे बोट केलें. दादासाहेब खालीं पाहतात, तों त्यांना एक भयंकर विवर दिसलें. या विवरांतून तो हिरवागार डोंगराळ प्रदेश व ती नदी त्यांना पुन्हां दिसली. इतकेंच नव्हे, तर त्या नदीच्या पात्रांतून शारदा वहात चालली आहे, असें त्यांना दिसलें. पुन्हां दादासाहेब भयानें ओरडून जागे झाले. या स्वप्नासंबंधानेंहि असेच अनेक विचार त्यांच्या चित्तांत घोळूं लागले. ही वास्तविक झोंपेची वेळ नव्हती; पण दोन वेळां झोंपमोड झाल्यामुळें व मन त्रस्त झाल्यामुळें चांगली झोंप थोडा वेळ तरी मिळावी असे त्यांना वाटूं लागलें; पुन्हां ते आंथरुणावर पडले आणि झोंप घेण्याचा प्रयत्न करूं लागले. थोड्या वेळानें त्यांना झोंप लागली; पण या झोंपेंतहि स्वप्नानें त्यांना सोडलें नाही. त्या पूर्वीच्या पर्णकुटिकेंत ते इंदिरेसह असतां दूर एका झाडाखालीं नानासाहेब व शारदा या दोघांचा कांहीतरी वाद चालला आहे, असें त्यांना दिसलें. दोघांचें बोलणें चाललें असतां नानासाहेबांनीं एक झगझगीत सुरी बाहेर काढली आणि ती शारदेच्या अंगावर ते उगारूं लागले. हा प्रकार पाहून दादासाहेबांना शारदेची दया आली व ते तिला सोडविण्यासाठीं झाडाजवळ गेले. नानासाहेब शारदेला रागानें म्हणाले, 'तुला दोन वेळां पाठविलें, तरी तूं त्यांना घेऊन आली नाहींस. ते पहा आतां येथें आले आहेत. त्यांचें मन सुप्रसन्न कर आणि त्यांना बरोबर घेऊन चल.' शारदेच्या डोळ्यांतून अश्रु पडत असून ती गायीपेक्षां देखील दीन झाली होती. ती हात जोडून म्हणाली, 'नानासाहेब, मला क्षमा करा. मला आतां या जन्मीं दादासाहेबांची प्राप्ति व्हावयाची नाहीं. त्या दोघांना आतां सुखानें कालक्रमणा करूं द्या, आणि मी जाईन तिकडे मलाहि जाऊं द्या.' शारदेचें हें म्हणणें ऐकून नानासाहेब संतप्त झाले. हातांतली सुरी शारदेच्या कपाळाकडे रोंखून ते म्हणाले, 'जा, तुला वाटेल तिकडे जा; पण नानासाहेबांचा आशाभंग केल्याबद्दलचें बक्षीस घेऊन जा!' असें म्हणून नानासाहेबांनीं ताडकन् सुरीचें टोंक शारदेच्या कपाळांत खुपसलें. याहि वेळीं झोंपेंत ओरडून दादासाहेब जागे झाले. जागे होऊन या विलक्षण स्वप्नाचा ते विचार करतात, तोंच त्यांच्या दिवाणखान्याच्या दारावर कोणीं जोरानें ठोठावलें.

दादासाहेब उठले आणि त्यांनीं घाईघाईनें दार उघडलें. दाराशीं गोदू उभी असून तिचा चेहरा अगदीं उतरून गेला आहे, असें त्यांना दिसलें. ते म्हणाले, ‘ गोदू, काय झालें ?’ गोदू म्हणाली, ‘शारदेच्या कपाळाला जखम झाली. लवकर दिवाणखान्यांत चला. ’ ते शब्द ऐकून दादासाहेबांच्या अंतःकरणांत एकदम धस्स झालें. ते तत्क्षणीं मोठ्या दिवाणखान्यांत गेले. पाहतात तों ज्या कोचावर शारदा बसली होती, त्याच्या समोर असलेला इंदिरा–मुकुंदाचा मोठा फोटो खालीं पडून सगळ्याभर फुटक्या कांचेचे तुकडे पसरले होते व त्यांतला एक तुकडा उडून शारदेच्या कपाळांत शिरला होता. वाड्यांतल्या एका कुशल दासीनें तो हळूच उपटून काढून ती जखम दादासाहेब येण्याच्या आधींच बांधली होती. दादासाहेब त्या दासीला म्हणाले, “ डॉक्टरला बोलावणें पाठवूं का ? ” दासी म्हणाली, “नको, जखम कांहीं मोठी नाहीं. एक दोन दिवसांत बरी देखील होईल.” नंतर दादासाहेबांनीं आपली दृष्टि शारदेवर वळविली. तिच्या डोक्याला पट्टी बांधली होती, तरी दादासाहेबांना तिचें सौंदर्य अप्रतिमच भासलें. तिला तिचें कुशल विचारावें असे दादासाहेबांना वाटलें, पण पुन्हां शारदेच्या सौंदर्यांतला उन्मादकपणा आपणास बेहोष करील अशी त्यांना भीति वाटली आणि ते तसेच बाहेर हिंडण्यासाठीं निघून गेले. इंदिरा-मुकुंदाचा फोटो खालीं पडला, हें वाचकांच्या लक्षांत आलें असेलच. शारदेनें तो घाईघाईनें टांगल्यामुळें त्याची दोरी खिळ्यावरून घसरली व हळूहळू खिळ्यावरून निघून इतक्या वेळानें तो फोटो जमिनीवर आदळला. कसेहि असो. इतकें मात्र खरें की, या स्वप्नाचा दादासाहेबांना विशेष चमत्कार वाटला व बाहेर जंगलांत ठरलेल्या ठिकाणीं त्यांची व दिनकरची जेव्हां गांठ पडली, तेव्हां त्यासंबंधानें त्या दोघांचें बराच वेळ बोलणेंहि झालें.

## प्रकरण आठवें

# गुरूचा आदेश

सूर्योदय होण्यास अद्यापि थोडा अवकाश होता. हे दिवस लवकर सूर्योदय होणारे होते; परंतु आकाश ढगांनीं अगदीं गच्च भरलेलें असल्यामुळें पुण्यासारख्या शहरांत जिकडे तिकडे काळोखच पसरलेला दिसत होता. मोठा पाऊस पडावा, असें आभाळ भरून आलें होतें; पण पाऊस झिम झिम पडत होता. आणि त्यामुळें पुण्याच्या रस्त्यावर चांगला चिखल झाला होता. हा महिना ज्येष्ठाचा असून गांवांत

लग्नाची थोडी धामधूम असल्यामुळें भूपाळी रागाचे गोड स्वर अनेक ठिकाणीं सूरसनयांतून निघत होते. तसेच चिखल आणि अंधार असतांहि माणसांची वर्दावळ रस्त्यावर बरीच सुरू झाली होती. अशा वेळीं एका मोठ्या वाड्याच्या ओसरीवर असलेल्या झोपाळ्यावर एक तरुण गृहस्थ सचित बसला होता. त्याचें स्नान झालें असून त्यानें रोजच्या नियमाप्रमाणें आपला गीतेचा पाठहि संपविला होता. ओसरीच्या मध्यभागीं एक कंदील जळत होता. या दिव्याचा प्रकाश विशेष जरी नव्हता, तरी त्या प्रकाशांत तरुणाचा चेहरा स्पष्ट दिसत होता आणि तो त्याचा चेहरा पाहतांच तो विलक्षण चितातुर असावा असें उघड दिसत होतें. तो जरी काळजीनें त्रस्त झाल्यासारखा दिसत होता, तरी मुखावर गंभीरपणा कायम असून तो हळूहळू झोंकाहि घेत होता. मधून मधून तो बडबडतहि होता; पण त्याचें तें बडबडणें झोंपाळ्याच्या कड्यांच्या आवजांत मिळून जात होतें. त्याचें सर्व पुटपुटणें स्वतःच्या मनाशीच चाललें होतें; पण विचाराची एकादी लहर असह्य झाली, तर तेवढ्यापुरता एकादा शब्द त्याच्या तोंडांतून बाहेर पडत होता. केव्हां केव्हां त्याचा चेहरा संतापानें लाल होत होता, तर केव्हां केव्हां तो विशेष गंभीर होत होता. केव्हां केव्हां त्याच्या डोळ्यांतून अश्रु पडत होते, तर केव्हां केव्हां तेच डोळे शांत भावानें पुढील कित्येक वर्षांचा चित्रपट पहात आहेत, असे दिसत होतें. ‘पुण्यास ज्या गृहस्थाला कवडीचा मान नव्हता, अशा गृहस्थाच्या हाती संस्थानची दिवाणगिरी येण्याबरोबर त्यानें आपल्या स्वार्थसिद्धीसाठीं वाटेल तें नीच कर्म करावें, यांत मला तर कांही आश्चर्य वाटणार नाहीं. माकडाच्या हातीं कोलीत दिल्यावर त्यानें दुसऱ्यांच्या घरांना आगी लावावयाच्या नाहींत, तर मग करावयाचें तरी काय? पाहूं या आतां नानासाहेब कोणाकोणाच्या घराला आगी लावतात ते? मी आणि दिनकर दोघेहि फार भयंकर आहोंत. आणि हें कशावरून तर आम्ही आमच्या मातृभूमीवर प्रेम करतों म्हणून! केवढा हा आमचा अपराध! शीलसंवर्धन आणि कर्तव्यपालन हीं जेव्हां गुन्ह्याच्या सदरांत येतात, तेव्हां गुन्हेगार ठरवून घेण्यावांचून कांहीं इलाज नसतो. राष्ट्रसेवेचें बक्षीस निदान आमच्या देशांत तरी असेंच मिळावें, असा योगायोग दिसतो. तसें नसतें, तर सर्व प्रकारें अधोगतीस पोहोंचलेल्या नानासाहेबांना आमच्यावर एवढा जुलूम खचित गाजवितां आला नसता. इंदिरेच्या सर्व आयुष्याची माती करूनच त्यांचें समाधान नाहीं, तर तिच्या विवाहासाठीं खटपट करणारे–दिनकर व मी, लोखंडी गजांच्या कोठडींत अनेक वर्षें खिचपत पडावेत असा त्यांचा मनोदय आहे! नानासाहेब! तुम्हांला हें साध्य आहे! तुमच्या अंगांत एवढें सामर्थ आहे हें मी कबूल करतों, आणि ज्यांनीं ज्यांनीं म्हणून

आपल्या सदसद्विचारबुद्धीस तिलांजली देऊन राक्षसी वृत्तीचा अवलंब केला आहे, त्या सर्वांना हें साध्य आहे! खाई कशी खणावी आणि त्यांत एकाद्या भल्या गृहस्थाला कसें ढकलावें, ही कला कोणत्याहि काळीं सहज साध्य आहे. आणि हें कार्य मोठ्या बुद्धिमत्तेचें नसल्यामुळें आळशी आणि शेंबड्यालेंबड्या उनाड तरुणांना तो एक अपूर्व धदा मिळाला आहे. नानासाहेबांसारख्या बुद्धिवान् मनुष्यानें तर यापेक्षां अधिक कांही-तरी करणें साहजिक आहे. त्यांनी ठरविलेल्या मुलीबरोबर दादासाहेबांचा विवाह न झाल्यास सर्व संस्थान खालसा करीन, अशी त्यांनी प्रतिज्ञा केली आहे. ज्या मनोरा-क्षसिणीला साक्ष ठेवून त्यांनीं ही प्रतिज्ञा केली असेल, ती मनोराक्षसी इतकी भयंकर नसेल, असें कोणी म्हणावें! कसेंहि असो, नानासाहेबांनीं इतकें मात्र लक्षांत ठेवावें कीं, हें युद्ध सुशील आणि दुःशील यांमध्यें आहे. आम्ही जिकलों, तर सुखानें राहूं आणि हरलों, तर समाधानानें मरूं!' याप्रमाणें या तरुणानें आपल्या मनाशीं बडबड चालविली होती. थोड्या वेळानें तो झोंपाळ्यावरून उठला व बाहेर बरेंच उजाडलें आहे, असे पाहून त्यानें कंदील विझविला. नंतर तो माडीवर दिवाणखान्यांत जाऊन पादचारणा करूं लागला.

दिवाणखान्यांत इकडून तिकडे विचार करीत फिरणारा हा तरुण म्हणजे पांडुरंग होय, हें वाचकांच्या लक्षांत आलें असेलच. पांडुरंगाचें हें घर म्हणजे मोठा थोरला वाडा होय. हा वाडा पूर्वीं अगदी जुन्या पद्धतीचा होता; परंतु भगवंतरावांनीं थोडीशी पाडापाडी करून या जुन्या वाड्याला अगदी नवीन पद्धतीच्या घराचें स्वरूप आणलें होतें. घराच्या पुढें असलेल्या अंगणांत लहानसा सुंदर बगीचा तयार केलेला होता. मागच्या बाजूच्या अगणांतहि बाग केलेला असून अळू वगैरेसारखा थोडा भाजीपालाहि लावलेला होता. घराच्या मध्यभागीं प्रशस्त चौक असून त्यांत हौद व कारंजें अशी एकत्र व्यवस्था केली होती. त्यामुळें चौकाला शोभा येऊन सोयहि झाली होती. मागच्या अंगणांत लहानशी विहीर असून एक दगडी तुळसीवृं-दावनहि बाधलेलें होतें. पांडुरंगाचें घराणें पूर्वींपासून श्रीमंत घराण्यांत मोडत होतें; परंतु हा श्रीमंतपणा नुसता नांवाचा नसून तो खरोखर होता. त्याच्या घराण्यांत झालेले सर्व कर्ते पुरुष विलक्षण मितव्ययी, साध्या वागणुकीचे आणि चोख वृत्तीचे होऊन गेल्यामुळें वडिलार्जित संपत्तीत अधिकाधिक भर पडत गेली होती. आपल्या घराण्याचे हे सर्व गुण पांडुरंगाच्या आंगीं असून त्याला आपल्या सांपत्तिक स्थितीचा अभिमान असा बिलकुल नव्हता. वर्तणूक अत्यंत साधी व घरांतले एकंदर व्यवहार बिन डामडौली असल्यामुळें पांडुरंग श्रीमंत आहे ही माहिती फारच थोड्यांना

होती. नानासाहेबांनीं माईसाहेबांना असें भासविलें होतें कीं, पांडुरंग हा साधारण स्थितींत असल्यामुळें दादासाहेबांना दहा पंधरा हजार हुंडा मिळणार नाहीं; परंतु इतका हुंडा देण्याची पांडुरंगाची शक्ति होती व हा हुंडा अगदीं निराळ्या स्वरूपानें दादासाहेबांना मिळावा अशी भगवंतरावांनी व्यवस्थाहि करून ठेवली होती. पांडुरंगाचा हा वाडा एकाद्या संस्थानिकाप्रमाणे सजविलेला नव्हता, हें खरें; पण त्या वाड्यांत प्रवेश केल्याबरोबर समाधान वाटावें, अशी मात्र योजना केली होती. स्वच्छता आणि टापटीप ही तर त्या वाड्यांत अप्रतिम होती. अंतःकरणांत शांत भाव उत्पन्न व्हावा, अशा प्रकारचा साधा रंग सर्व वाड्याला आंतून दिलेला होता. वरच्या मजल्यावर जो प्रशस्त दिवाणखाना होता, तो कांहीं दृष्टींनी फार पाहण्यासारखा होता. प्रख्यात ऐतिहासिक पुरुषांच्या जुन्या तसबिरी महत् प्रयासानें मिळवून लावलेल्या येथें दिसत होत्या. तसेंच कांही जुन्या संस्मरणीय वस्तूहि मोठ्या टापटिपीनें ठेवलेल्या होत्या. अलीकडे प्रसिद्धीस आलेल्या पुरुषांचीहि तेथे चित्रें वगैरे असून संस्कृत, मराठी व इंग्रजी पुस्तकांचीं तर कपाटेंच्या कपाटें ठेवलेली होती. अनेक देशांचे नकाशे व त्या देशांतलीं विशेष पाहण्यासारखी स्थळें यांचेहि चित्रपट मधून मधून भिंतीवर लोंबत होते. दिवाणखान्याच्या अर्ध्या भागांत इंग्रजी पद्धतीची बैठक असून दुसऱ्या अर्ध्या भागांत दरबारी पद्धतीची बैठक होती. दिवाणखान्याच्या दोन्ही बाजूंला दोन मोठाल्या खोल्या असून त्या खोल्यांमधून आंतल्या माडीत जाण्याचे रस्ते होते. या दोन्ही खोल्यांतून पांडुरंगानें अनेक साधुसंतांच्या तसबिरी लावून व तेथें धार्मिक ग्रंथ वगैरे ठेवून त्या खोल्यांना त्यानें अध्यात्ममंदिराचेंच स्वरूप आणलें होतें. अशा ठिकाणी थोडा वेळ बसलें, तरी देखील समाधान वाटत असे. यांपैकी एका खोलीच्या मागें असलेल्या माडींत पांडुरंग अभ्यासासाठीं बसत असे. तसेच दुसऱ्या खोलीच्या मागें जी माडी होती, त्या माडींत इंदिरा बसत-उठत असे. वर सांगितलेल्या दिवाणखान्यांत पांडुरंग सचिंत फिरत असतां भिवा गडी तेथें घाईघाईनें आला व आश्चर्य आणि आनंदकारक स्वरानें म्हणाला, "दादा, ते सोमगडावर आपल्याला महाराज भेटले होते, ते खाली आले आहेत." हे भिवा गड्याचे शब्द ऐकून पांडुरंगाचा सचिंत चेहरा एकदम प्रफुल्ल झाला. तो हर्षानें म्हणाला, "कोण गुरुमहाराज? जा, जा, त्यांना लवकर पलीकडच्या खोलीत घेऊन ये." असें म्हणून पांडुरंग त्या खोलींत गेला आणि जमिनीवर मृगचर्म आंथरून तो गुरूच्या सत्काराची घाईघाईनें व्यवस्था करूं लागला. इतक्यांत त्याचे गुरु वर आले. त्यांना पाहतांच पांडुरंगानें साष्टांग नमस्कार केला आणि मोठ्या सत्कारानें त्यांना आंत आणून मृगचर्मावर बसविलें. आपल्या नेह-

मींच्या गोड व गंभीर स्वरानें पांडुरंगाला आशीर्वाद देऊन ते म्हणाले, "सर्व कुशल आहेत ना? इंदू वगैरे कोठें दिसत नाहींत त्या?" पांडुरंग म्हणाला, "सर्व कुशल आहेत. एका आप्ताकडे लग्न असल्यामुळें आई, इंदू आणि शेजारच्या मुली, पहांटे-सच तिकडे गेल्या आहेत."

गुरुमहाराजांचा चेहरा सतेज व गोरा होता. मस्तकावर लहानसा जटाभार असून दाढी तर बरीच वाढलेली होती. सर्व केस पांढरे शुभ्र झाले होते; परंतु वृद्धाप-काळची किंचित् छटा देखील त्यांच्या चेहऱ्यावर दिसत नव्हती. त्यांचें नाक तरतरीत असून डोळे सतेज होते. त्यांच्या दृष्टींत जो एक प्रेमळपणा होता, तो अपूर्व होता. पाहण्याबरोबर त्यांच्याविषयीं अंतःकरणांत पूज्यभाव उत्पन्न व्हावा, असें कांहीं विलक्षण त्यांच्या चेहऱ्यावर तेज होतें. अंगांत एक भगव्या रंगाची कफनी असून पाऊस लागूं नये म्हणून पांढरी घोंगडी त्यांनीं अंगावरून घेतली होती. आंत आल्यावर त्यांनीं दाराजवळ पायांतल्या खडावा काढून ठेवून अंगावरची घोंगडी एका खुंटीला निथळत ठेवली होती. आपला कमंडलु मात्र ते जवळच घेऊन बसले होते. इकडचे तिकडचे थोडे कुशल प्रश्न केल्यावर ते म्हणाले, "पांडु-रंग, तुझ्या चेहऱ्यावरून तूं बराच काळजींत असावास असें दिसतें. तुझ्या या काळजीचें कारण काय तेंहि मला समजलें आहे. कोणत्या उपायानें या काळजीं-तून निघतां येईल, हें सांगण्यासाठीं मी आलों असेन, असे तुला वाटेल; पण तसें कांहीं समजूं नकोस. मी फक्त तुला गतधैर्य होऊं नकोस आणि भलताच मार्ग स्वीकारूं नकोस, एवढेंच सांगण्यासाठीं आलों आहें. एकादें संकट आलें, म्हणजे पुष्कळांना असें वाटतें कीं, आमचें दुर्दैव ओढवल्यामुळें संकट आलें; परंतु हा दैववाद म्हणजे मनाचा एक भास मात्र होय. संकट हें केव्हांहि तुमच्या मनुष्य-त्वाची कसोटी पाहण्यासाठीं येत असतें. जो त्या संकटास धैर्यानें तोंड देतो आणि अशा वेळींहि अनुचित मार्गाचा जो अवलंब करीत नाहीं, तोच खरा पुरुष होय. ज्ञाते यावरूनच पुरुषत्वाची पारख करतात. श्रीकृष्णास पुरुषोत्तम म्हणतात, तें उगीच नाहीं. त्याचा सर्व जन्म विपत्तीशीं झगडण्यांत गेला आहे आणि त्यांत लक्षांत ठेवण्यासारखी गोष्ट ही कीं, त्या आपत्तीबद्दल त्यानें कोठेंहि कुरकुर केलेली दिसत नाहीं, किंवा त्यानें दुसऱ्याच्या मदतीचीहि अपेक्षा केलेली दिसत नाहीं. तुझ्यापुढें मीं एकदम भगवंताचेंच उदाहरण ठेवल्यामुळें तुला थोडें चमत्कारिक वाटेल; पण 'माझ्या मागून या' हीच मुळीं आपणां सर्वांस भगवंताची आज्ञा आहे. 'आपण तसेच होऊं या' हें आम्हां सर्वांचें ध्येय असलें पाहिजे. श्रीरामकृष्ण परमहंसांना

'भगवंत कोठें आहे' म्हणून विवेकानंदांनीं जेव्हां प्रश्न केला, तेव्हां 'तो तूंच आहेस' असा त्या महात्म्यानें जबाब दिला. अर्थात् आम्ही जर भगवंत आहों, तर त्या पुरुषोत्तमाप्रमाणें वागावयाला नको काय? कर्मक्षेत्रांत आपण अवतार घेतला आहे, तेव्हां कर्मवीराप्रमाणें वागून सुखदुःखाच्या भ्रामक कल्पनेंतून बाहेर पडण्याचा आम्हीं अर्थातच प्रयत्न केला पाहिजे. पांडुरंग, आम्ही फसतों, ते या सुखदुःखाच्या कल्पनेनेंच फसतों. आमची दिशाभूल होते, ती सुखदुःखाच्या मायाजाळामुळेंच होते. वास्तविक सुखदुःख हें मृगजळ होय. तें आम्हींच आमच्या इच्छेनें उत्पन्न करीत असतों. त्यांत दैवाचा यत्किंचित् देखील संबंध नाहीं. एकादी गोष्ट घडून आली म्हणजे, तिला आम्हीं सुख म्हणतों, दुसरी एकादी घडली म्हणजे, तिला दुःख म्हणतों. आतां याचा तूंच विचार करून पहा म्हणजे तुला असें कळून येईल कीं, हीं सुखदुःखें आम्हींच आमच्या इच्छाशक्तीनें उत्पन्न करतों. 'जशी इच्छा तसे फळ' असें जे म्हणतात, तें एवढ्याचसाठी. तेव्हां या संकटाच्या वेळी डगमगून न जातां संकटास धैर्यानें तोंड दे, म्हणजे सर्व कांही चागलें होईल. आपल्या प्रत्येक प्रयत्नानें चांगलेंच व्हावयाचें आहे, असा आत्मविश्वास मात्र अंतःकरणांत अढळ ठेव. आत्मविश्वासावांचून कांहींहि व्हावयाचें नाहीं, हें लक्षांत ठेव. पुष्कळांना असे वाटतें कीं, यशाची गुरुकिल्ली म्हणजे दीर्घोद्योग होय; परंतु हें सर्वस्वी खरें नाही. आमचें प्रत्येक पाऊल जगाच्या कल्याणासाठीं पडलें पाहिजे, आमच्या जिव्हेनें प्रत्येक शब्द जगाच्या कल्याणासाठीं उच्चारला पाहिजे आणि आमच्या हृदयानें प्रत्येक श्वास जगाच्या कल्याणासाठी सोडला पाहिजे! (यश आणि स्वार्थ या दोन्ही गोष्टी फार दूर दूर आहेत!!)

गुरुमहाराजांचें हें भाषण ऐकत असतां पांडुरंगाच्या मुखावरील काळजीचीं चिन्हें बरींच कमी होऊन तो थोडा सतेज दिसूं लागला. तो किंचित् करुणाजनक स्वरानें म्हणाला, " महाराज! आपण म्हणतां तें सर्व खरें; पण पदोपदीं संकटें आल्यावर कोण त्रासणार नाही? आणि आश्चर्य हें कीं, ज्या नीच लोकांकडून ही संकटें उद्भवलीं जातात, ते आम्हांला आमच्यापेक्षां सुखी दिसतात. जे समाजाची शांति मोडतात, राष्ट्राला जे अवनतीस नेतात आणि निरपराध्यांना ज्यांच्यामुळें दंड भोगावे लागतात, त्यांना त्यांच्या कृतीबद्दल परमेश्वराकडून ऐषआरामाचें बक्षीस मिळत आहे, हें पाहून साहजिक आश्चर्य वाटतें." पांडुरंगाचे हे शब्द ऐकून गुरुमहाराजांना साहजिक हसूं आलें. ते म्हणाले, " पांडुरंग, तुमच्या-आमच्या स्थूल दृष्टीचा हा सारा परिणाम आहे. सूक्ष्म दृष्टीनें पाहिल्यास त्यांच्या ऐषआरामाचें चित्र फारच निराळें

दिसेल. असले लोक समाजांत जितके अधिक असतील तितकें चांगलें. आम्हां हिंदु लोकांचा असा समज आहे, कीं पापाचा घडा जितका लवकर भरेल, तितकें बरें. तेव्हां राष्ट्रीय पापाचा घडा भरण्यास जे लोक मदत करीत आहेत, त्यांचें राष्ट्रानें वास्तविक उतराई असलें पाहिजे. तूं हें नानासाहेबांसंबंधानें म्हणालास, हें माझ्या लक्षांत आलें आहे; पण नानासाहेबांचा हा सावळा गोंधळ बंद पाडण्यासाठीं, तुम्ही तरी काय प्रयत्न केला आहे? तुम्हीं सर्वांनीं मिळून सरकाराकडे केव्हां दाद मागितली आहे?"

पांडुरंग थोडा वेळ स्तब्ध राहिला. नंतर नम्रपणें म्हणाला, "या बाबतींत कांहीं प्रयत्न केला नाहीं, हें खरें; पण त्यांत आम्हांस यश येण्याचीच खात्री वाटत नाहीं." पांडुरंगाचें हें म्हणणें ऐकून गुरुमहाराज हंसले, ते म्हणाले, "तूं अजूनहि त्या यशापयशाला चिकटून बसला आहेसच. अरे, फलाफलाचा आणि यशापयशाचा केव्हांहि विचार न करतां कर्तव्य करीत राहिलें पाहिजे. आम्हीं आमचें कर्तव्य बजावलें किंवा नाहीं, हा आयुष्यांत मुख्य मुद्दा असतो. कर्तव्याचें फळ जें मिळावयाचें असेल, तें मिळेल; पण आम्हीं केव्हांहि या फलाशेपासून अलिप्त राहूनच कर्तव्य बजावलें पाहिजे. रोज गीता वाचतोस, आणि एवढेंहि तुला समजूं नये. आणि दुसरी गोष्ट लक्षांत ठेवावयाची ती ही कीं, बहुजनसमाज हीच खरी न्यायदेवता होय. या न्यायदेवतेकडून आपणास दूषण लागणार नाहीं, अशा रीतीनें वागलें पाहिजे. नानासाहेब जसे तुम्हांला फसवूं पहात आहेत, त्याप्रमाणें तुम्हीहि त्यांना फसवूं शकाल! नाहीं असें मी म्हणत नाहीं; पण तें मला मात्र पसंत नाहीं. तेव्हां दादासाहेब आणि इंदू यांचा विवाह कोणाला कळूं न देतां करण्याचा जो तुम्ही निश्चय केला आहे, तो मला मुळींच पसंत नाहीं. उघड काय तें करा. सर्वांना बोलवा. थाटानें लग्न करा. त्यांतच सगळे लोक टुम्हांला शाबासकी देतील; पण हें सर्व शाबासकीसाठीं करावयाचें आहे, अशी मात्र समजूत करून घेऊं नका. विवाहाच्या आधीं मात्र सावधगिरी बाळगा; पण विवाहाच्या वेळीं बिलकुल गुप्तपणा ठेवूं नका. पांडुरंग, इतकें सांगण्यासाठीं मी जो मुद्दाम आलों, त्याचें कारण फार निराळें आहे. तुझ्याप्रमाणें इंदिरेची वृत्तीदेखील निराळ्या मार्गाला वळलेली आहे. कांहीं देहाचे संस्कार तुमचे व्हावयाचे राहिले आहेत, तेवढे झाले, म्हणजे आपोआप तुमचें पाऊल निराळ्या मार्गावर पडेल! बरें, जातों आतां."

गुरूंचे हे शब्द ऐकून पांडुरंग हात जोडून म्हणाला, "फार दिवसांनीं दर्शन झालें आहे, तेव्हां आज माझ्याकडे फराळ केल्यास मला फार आनंद होईल.

शिवाय आईला व इंदूलाहि दर्शन होईल." गुरुमहाराज यावर हंसत हंसत म्हणाले, "पुढें केव्हां आलों तर राहीन. आतां मला गेलेंच पाहिजे. त्यांना व शेजारच्या मुलींना माझा आशीर्वाद सांग म्हणजे झालें." असें म्हणून महाराज उठले व त्यांनीं अंगावर घोंगडी चढविली. पांडुरंगानें जेव्हां फारच गळ घातली, तेव्हां त्यांनीं थोडें दूध घेण्याचें कबूल केलें आणि दूध पिऊन मग ते निघून गेले. पांडुरंग या वेळीं खरोखरच फार काळजींत सापडला होता. नानासाहेबांसारखे दांडगे शत्रु भोंवतालीं असल्यामुळें तो भिऊन गेला होता व दादासाहेब अनुकूल असल्यास गुप्तपणें इंदूबरोबर त्यांचा विवाह करावा, असें त्यानें कांहीं मित्रांच्या विचारानें ठरविलें होतें. अशा वेळीं अकस्मात् गुरूंचें आगमन व त्यांनीं दिलेली सल्ला यांबद्दल पांडुरंगास साहजिक आश्चर्य वाटलें. पुढें आतां कोणत्या रीतीनें वागलें पाहिजे, याचा तो विचार करीत असतां इंदू त्याच्या दिवाणखान्यांत आली आणि म्हणाली, "दादा, आज चहाला वेळ झाला नाहीं का? ठेवलाय चहा, आतां होईल हो." हें ऐकून पांडुरंग म्हणाला, "इंदू, मला चहा घ्यायला कांहीं उशीर झाला नाहीं; पण तुम्हांला मात्र बाहेरून यायला उशीर झाला. लवकर आलां असतां, तर महाराजांचें दर्शन झालें असतें." पांडुरंगाचे हे शब्द ऐकून इंदू एकदम विस्मयानें पण खिन्न स्वरानें म्हणाली, "कोण? महाराज आले होते? अरेरे, जरा लवकर आलों असतों, तर दर्शन तरी झालें असतें. आतां केव्हां येणार ते?"

"कदाचित् सोमगडावर लवकरच सर्वांच्या भेटी होतील, असें ते म्हणाले; पण निश्चयानें भेट होईलच, असें कांहीं सांगतां येत नाहीं. केव्हां तरी अकस्मात् भेटतात, नाहींतर वर्ष वर्ष त्यांची गांठहि पडत नाहीं. आज ते येतील अशी मला कल्पना देखील नव्हती."

पांडुरंगाचे हे शब्द ऐकून इंदू स्वतःशींच उदासीनतेनें म्हणाली, "आज त्या लग्नाला गेलें नसत्यें, तर बरें झालें असतें!" असें म्हणून ती पांडुरंगाला म्हणाली, "दादा, पहांटे मला एक स्वप्न पडलें, त्यांत महाराजांचें दर्शन झालें आणि आज ते स्वतःच येथें येऊन गेले, याचा कांहीं अर्थ तर नसेलना!" इंदूचे हे शब्द ऐकून पांडुरंगास साहजिकच आश्चर्य वाटलें. 'तूं काय स्वप्नांत पाहिलेंस' म्हणून पांडुरंगानें विचारल्यावर ती म्हणाली, "दादा, पहांटेसच तें मी तुला सांगणार होतें; पण घाईंत विसरून गेलें आणि गुरुमहाराज आले नसते, तर मला त्या स्वप्नाची कदाचित् आठवण देखील राहिली नसती. सोमगडाच्या कुशावर्ताच्या एका पायरीवर बसून

मी जशी कांहीं महाभारतांतलें सावित्री आख्यान वाचीत आहें आणि तें ऐकण्यासाठीं माझ्या सभोंवतीं आपल्या शेजारच्या अन्नपूर्णा नी यमुना बसल्या आहेत, असें मला प्रथम स्वप्नांत दिसलें. तें आख्यान वाचीत असतां तितक्यांत निष्कारण आमचें नुकसान करणारीं कांहीं माणसें आम्हांला कुशावर्तावर दिसलीं. त्यांना पाहतांच अन्नपूर्णा आणि यमुना यांनीं तेथून पलायन केलें. त्या पळत असतां 'आपल्या घरांत शिरा' म्हणून मी त्यांना प्रोत्साहन देत होतें. मी देखील घाबरलें होत्यें आणि हातांत पुस्तक घेऊन पळण्याच्या विचारांत होतें; इतक्यांत गुरुमहाराजांची ती शांत आणि गंभीर मूर्ति तेथें दिसली. अत्यंत संतप्त मुद्रेनें त्या लोकांकडे पाहून ते म्हणाले, 'दुष्टांनों, त्या अबलेला त्रास देण्यास तुम्हांला शरम वाटत नाहीं? लक्षांत ठेवा, याबद्दल चांगला दंड मिळेल!' असें ते म्हणाले, व त्यांनीं स्वतःच्या मागें येण्याविषयीं मला खूण केली. ते पुढें चालले होते, मी त्यांच्या मागें चाललें होत्यें. जातां जातां आम्ही दोघेंहि सोमगडावरील तलावाच्या कांठीं येऊन पोहोंचलों. तेथें आल्यावर मी त्यांना म्हणाल्यें, 'महाराज, पुराणांत ऋषींच्या आश्रमांचीं ठिकठिकाणीं वर्णनें आढळतात; पण ऋषींचा तो आनंददायी संसार आतां कोठेंच दृष्टीस पडत नाहीं.' तेव्हां ते म्हणाले, 'इंदू, आजहि पुष्कळ ऋषि आहेत; पण ते अवस्थाभेदामुळें ओळखतां येत नाहींत. अशा कांहीं ऋषींचें तुला दर्शन घ्यावयाचें असल्यास, माझ्या मागून ये.' असें म्हणून ते पुढें चालूं लागले आणि मी त्यांच्या मागून चालूं लागलें. थोडें पुढें गेल्यावर दहावीस मोठाल्या झाडांच्या खालीं पांच पन्नास माणसांचा समुदाय माझ्या दृष्टीस पडला. तीं सर्व माणसें मंडळ करून बसलेलीं असून मध्यभागीं एक स्त्री-पुरुषाचें सुंदर जोडपें बसलेलें होतें. हीं सर्व माणसें गरीब स्थितींतील व हलक्या वर्गांतील होतीं. त्यांचीं वस्त्रें मलीन व फाटकीं होतीं; पण चेहरे सतेज व उत्साहदायक दिसत होते. त्यांच्या मध्यें बसलेला तरुण त्यांना कांहीं सांगत होता आणि ती मंडळी तें मोठ्या भक्तिभावानें ऐकत होती. त्या तरुणाकडे बोट करून महाराज म्हणाले, 'तो पाहिलास एक ऋषि! आपल्या दरिद्री बांधवांना पोटभर अन्न आणि अंगभर वस्त्र कसें मिळेल, याचें भाष्य तयार करीत असून तें त्यांना समजावून सांगत आहे. त्याला लोभ नाहीं, अभिमान नाहीं, अहंकार नाहीं, स्वतःचें कसें होईल, ही देखील, काळजी नाहीं. दरिद्री बांधवांना अन्नवस्त्र कसें मिळेल, या विवंचनेनें तो स्वतःच्या देहाला देखील विसरून गेला आहे. इंदू, कलियुगांतले हेच खरे ऋषि आहेत. हेच खरे साधु आणि आत्मोद्धारक आहेत. मोक्षाचीं कपाटें यांच्यासाठीं सदैव उघडीं आहेत. इंदू, चल, आपण त्या महात्म्याच्या जवळ जाऊं.'

दादा, तुला सांगितलें तर खोटें वाटेल; पण आम्ही जेव्हां त्या ऋषीजवळ गेलों, तेव्हां तो ऋषि म्हणजे तूं आहेस, असें मला दिसून आलें!" इंदिरा पुढें विशेष विस्मयानें म्हणाली, "आणि दादा, ती ऋषिपत्नी कोण तें तुला समजलें का? अरे, आपली शेजारची यमुना! हा प्रकार पाहिल्यावर लवकरच मी जागीं झाल्यें. मला प्रथम या स्वप्नांत विशेष कांहींच वाटलें नाहीं; पण तूं जेव्हां गुरुमहाराज आले होते, म्हणून म्हणालास, तेव्हांपासून मात्र या स्वप्नाबद्दल मला विशेष आश्चर्य वाटूं लागलें आहे. पुष्कळ वेळां असे वाटतें की, स्वप्न म्हणजे झोपेंतले मनोव्यापार होत; पण एवढ्यानें मनाचें समाधान होत नाही. स्वप्नांत खरोखरच कांहीं अर्थ आहे कीं नाहीं, तें ईश्वरास माहीत." इंदिरेचे हे शब्द पुरे होत आहेत, तोंच दाराच्या आड यमुना येऊन उभी राहिली व तेथूनच 'इंदूताई' अशी हळूच हांक मारूं लागली. इंदूनें तिकडे पाहिलें तों यमुना हातांत चहा व फराळाचें घेऊन आलेली तिला दिसली. तिला पाहतांच इंदू हंसत हंसत म्हणाली, "यमू, चहा आणून दादासमोर ठेव. एवढी लाजतेस कशाला?" इंदूनें असे म्हटल्यावर यमुना अधिकच लाजली. तिनें किंचित् रोषानें चहाचें ताट तसेंच खालीं ठेवलें आणि ती आपल्या घरीं निघून गेली. यमूच्या कृतीकडे पांडुरंगाचें मुळींच लक्ष नव्हतें; पण तो प्रकार पाहून इंदूच्या अंतःकरणास मात्र गुदगुदल्या झाल्या. शेवटीं इंदूनें तो चहा पांडुरंगापुढें आणून ठेवला आणि तोहि घरांत गेली. पांडुरंग मात्र अजूनहि साचित मुद्रेनें पुढील कार्याची दिशा ठरवीत होता. गुरुमहाराजांचा उत्साहपूर्वक आदेश मिळाल्यामुळें आडमार्गानें कार्यभाग साधण्याचा बेत त्यानें अर्थातच सोडून दिला होता आणि उघडपणें इंदु-मुकुंदाचा संयोग कसा होईल, याची योजना तो आपल्या मनांत करूं लागला होता. कार्यक्रमाची आंखणी निश्चित होतांच त्यानें दिनकरला एक पत्र लिहिलें, आणि तें दिनकरच्याच हातीं पडावें, अशी त्यानें योग्य ती तजवीज करून तें पत्र विजयगडास रवाना केलें.

प्रकरण नववें

## इंदिरा-मुकुंद-संयोग

सायंकाळची वेळ असून इंदू व अन्नपूर्णा अशा दोघी मागच्या माडींत विणीत बसल्या होत्या. अन्नपूर्णा आणि इंदू या दोघींचें एकमेकीवर बहिणीपेक्षांहि अधिक प्रेम होतें. अन्नपूर्णा ही इंदिरेपेक्षां वर्ष दोनवर्षांनीं वयानें मोठी असून ती इदूप्रमाणेंच सरळ व प्रेमळ स्वभावाची होती. लिहिणें, वाचणें व विणणें यांत इंदूनें बरेंच प्राविण्य संपादन केलेलें असल्यामुळें तिच्याकडे शेजारपाजारच्या बऱ्याच मुली कशिदा वगैरे शिकण्यासाठीं येत असत. या मुलींत अन्नपूर्णा आणि यमुना या दोघी शेजारींच रहात असल्यामुळें आणि त्या दोघींच्या स्वभावाशीं इंदूच्या स्वभावाचें बरेंच साम्य असल्यामुळें या तिघींचा स्नेहभाव पराकाष्ठेचा वाढला होता. शिवाय मुख्य गोष्ट ही कीं, त्यांचा शेजारधर्म कित्येक पिढ्यांचा असून वाडवडिलांपासून एकमेकांत प्रेमवृद्धि होत होती. अन्नपूर्णा आणि यमुना या दोघी सख्ख्या बहिणी असून त्यांच्या वडिलांचें नांव पुरुषोत्तमराव असे होतें. पुरुषोत्तमरावांचा आणि भगवंतरावांचा पराकाष्ठेचा स्नेहसंबंध असून आपल्या मुलांबाळांवर नजर ठेवण्याविषयीं भगवंतरावांनीं आपल्या अंतकाळीं पुरुषोत्तमरावांना विनंति केली होती. पुरुषोत्तमराव पुण्यासच कलेक्टर कचेरींत चिटणीस असून त्यांची नौकरीहि बरीच झाली होती. पुरुषोत्तमरावांच्या कुटुंबांत ते स्वतः, त्यांची पत्नी द्वारकाबाई, वर सांगितलेल्या दोन मुली आणि दहा-बारा वर्षांचा एक मुलगा एवढी मंडळी होती. वडील मुलगी अन्नपूर्णा अठरा एकोणीस वर्षांची असून तिला एक वर्षांचा मुलगा होता. ही अन्नपूर्णा आमच्या वाचकांच्या परिचयाचा जो दिनकर त्याची स्त्री होय. यमुना तेरा-चवदा वर्षांची असून तिचें लग्न अद्याप व्हावयाचें होतें. या दोन्ही कुटुंबांचा स्नेहसंबंध अलीकडे इतका वाढला होता कीं, त्यांच्यांत परकेपणा असा बिलकूल राहिला नव्हता. इंदिरेच्या लग्नासंबंधानें पांडुरंगास व पार्वतीबाईस जितकी काळजी वाटत होती, तितकीच ती पुरुषोत्तमरावांच्या मंडळीसहि वाटत होती, इतकें सांगितलें म्हणजे या दोन कुटुंबांतल्या स्नेहसंबंधाची कोणासहि कल्पना येईल. दिनकराचा आणि पांडुरंगाचा स्नेह पुष्कळ वर्षांचा असल्यामुळें तो स्वतःच्या प्रेरणेनेंच विजयगडास गेला होता, हें खरें. पण त्या बाबतींत पुष्कळसें प्रोत्साहन त्याला त्याच्या गृहिणीकडून मिळालें होतें, हें विसरून चालावयाचें नाहीं. दिनकर विजयगडास गेल्यापासून तो तिकडे काय खटपट करीत

आहे, हें अन्नपूर्णेला पत्रोत्तरानें अर्थातच कळत होतें; पण इंदिरेला त्यांतलें कांहींहि कळू नये अशाविषयीं मात्र अन्नपूर्णा फार काळजी घेत होती. स्वतः इंदिरेला आपल्या लग्नाची काळजी नव्हती असें कांहीं नाही; परंतु दिनकरकडून जेव्हां अन्नपूर्णेला इंदूच्या विवाहांतल्या अडचणी कळून आल्या, तेव्हां तिला साहजिक इंदूपेक्षां अधिक काळजी वाटूं लागली. विजयगडाहून एकादे दिवशीं कांहीं विलक्षण पत्र आलें, तर तिच्या डोळ्यांतून इंदूसाठीं अश्रू देखील पडत.

त्या दिवशी दोघी विणीत बसलेल्या असतां यमुना तेथें आली आणि ती विणीत असलेला रुमाल इंदू पुढें धरून म्हणाली, " इंदूताई, माझी एवढी अढी दुरुस्त करून दे. पुढें अढी कशी घ्यायची तें मला समजत नाहीं. " अगदीं आपल्याजवळ यमुनेला बसवून इंदूनें ती अढी कशी घ्यावयाची तें तिला सांगितलें. नंतर हळूच तिच्या गालावर टिचकी मारून इदू म्हणाली, " यमू, सकाळीं दादाला चहा देते वेळीं एवढी लाजलीस कां ? ती बाई चेष्टेनें कांहीं तरी म्हणाली, तेवढ्यावरून कां तूं लाजूं मुरडूं लागलीस ! " इंदूच्या या म्हणण्यास यमुनेनें कांहीं उत्तर दिलें नाही. आपला रुमाल हातांत घेऊन ती चटकन् तेथून निघून गेली. यमू गेल्यावर अन्नपूर्णा हंसत हंसत म्हणाली, " खरेंच कां चहा देतांना यमू लाजली ?" यावर इंदूहि हंसत हंसत म्हणाली, " हो ! आज सकाळीं आपण लग्नाला गेलों होतों ना, तेथें आईच्या ओळखीची एक बाई भेटली. त्या वेळी यमू आईजवळ उभी होती. ती बाई आईला म्हणाली, "पार्वतीबाई, मुलगी मोठी गोड दिसते ! जुळत असेल तर या ज्येष्ठांतच उरकून टाका ! हेंच आपलें यमूला निमित्त झालें. तेव्हांपासून तिची कोण त्रेधा उडाली आहे. " इंदूचे हे शब्द ऐकून अन्नपूर्णा खिन्नस्वरानें म्हणाली, " खुळी आहे ! तिला अजून समजत नाहीं. पांडुरंगदादा श्रीमंत आणि बी. ए. झालेला. त्याच्याबरोबर यमूचें लग्न करावयाचें म्हणजे बाबांच्या आंगाचें चांगलेंच साल निघेल. थोडें फार शिकलेला मुलगा पहावयाचा आणि मुलगी उजवावयाची. आमच्या-सारख्यांनीं पांच पांच हजार रुपये हुंडा आणावयाचा कोठून ? "

अन्नपूर्णेचें हें म्हणणें इंदूला रुचलें नाहीं. ती म्हणाली, " छिः ! लग्नासारखी मंगलकारक गोष्ट हुंड्याच्या देवघेवीनें का करावयाची ? निदान माझा दादा तरी तें केव्हांहि कबूल करणार नाहीं. मी तर म्हणत्यें कीं, यमुनेसारखी मुलगी जर दादाला मिळाली, तर त्याच्यासारखा नशीबवान् कोणीच नाहीं. बोलणें किती गोड, स्वभाव किती सालस, वागणूक कशी साधी आणि हजार पांचशें बायकांत

निवडून पडण्यासारखी. अशा मुलीचा लाभ होणें, हें तर मी भाग्यच समजेन. खरेंच अन्नपूर्णा, माझ्या मनांतून तुला किती दिवसांपूर्वीच विचारावयाचें होतें; पण विचारण्यास धैर्यच झालें नाहीं. आज यमुनेचें तें लाजणें मुरडणें पाहून तुला केव्हां विचारीन असें झालें आहे. तुझ्या बाबांनीं आणि आईनीं माझें एवढें म्हणणें मान्य केलें, तर मजवर अनंत उपकार होतील. मला कीं नाहीं, माझ्या दादाची फार काळजी वाटते. केव्हां केव्हां तो विचारांत इतका गढून जातो कीं, त्याला खाण्यापिण्याची देखील आठवण रहात नाही. त्याची ही वागणूक यमूला चांगली माहीत झाली आहे. त्याला काय आवडतें काय नाहीं, हें देखील यमूला माहीत झालें आहे. यमूचें जर दादाबरोबर लग्न होईल, तर माझी सगळी काळजी दूर होईल." शेवटचें वाक्य उच्चारतांना इंदूचा कंठ दाटून आला आणि तिचे डोळेहि पाण्यानें भरून आले. ते शब्द ऐकून अन्नपूर्णेला अर्थातच आनंद झाला; पण तो न दर्शवितां ती म्हणाली, "इंदू, तसें होईल, तर त्यांत आम्हां सगळ्यांनाच आनंद वाटेल. यमूच्या नशिबीं असें चांगलें स्थळ लिहिलेलें असेल, तर ती खरोखरच नशीबवान् असली पाहिजे; पण तूं हें आपलें म्हणणें दादाला नी आईला कळविलेंस कीं काय?"

इंदू म्हणाली, "नाहीं. अजून कोणाला सांगितलें नाहीं. प्रथम तुला विचारावें आणि मग काय तें ठरवावें, असाच मुळीं माझा विचार होता." अन्नपूर्णा थोडा वेळ स्तब्ध राहून नंतर म्हणाली, "आतां तूं या संबंधानें फिरून कोणाजवळ देखील बोलूं नकोस. तुझें लग्न झाल्यावांचून दादा स्वतः लग्न करणार नाहीं, हें तर अगदीं स्पष्टच दिसत आहे. तोंपर्यंत मी बाबांना आणि आईला सर्व कांहीं सांगून ठेवीन. तूं यासंबंधानें मुळींदेखील काळजी करूं नकोस." यानंतर दोघींचें यासंबंधानें बरेंच बोलणें झाल्यावर अन्नपूर्णेनें इंदूचा निरोप घेतला आणि ती घरीं निघून गेली.

इंदूनें यमूची पांडुरंगासाठीं मागणी केल्यापासून अन्नपूर्णेला साहजिक मोठा संतोष वाटूं लागला. ती गोष्ट अगोदर आईबापांस कळविण्यापेक्षां पतीला कळविणें चांगलें असें तिला वाटलें व त्याप्रमाणें तिनें दिनकरला पत्रहि लिहिलें. हें पत्र पाठवून तीन चार दिवस झाल्यावर अन्नपूर्णेचे पत्रोत्तराकडे अगदीं डोळे लागले होते. सुमारें सात-आठ दिवसांत दिनकरकडून पत्र न आल्यामुळें तिला बरीच काळजी वाटत होती. या अवधींत पांडुरंगालाहि दिनकरचें पत्र नसल्यामुळें तोहि काळजींतच होता. इतक्यांत पोस्टाच्या शिपायानें त्याच्या हातांत पत्र आणून दिलें. पाकिटावरील

अक्षर दिनकराचेंच असल्यामुळें पांडुरंगानें घाईघाईनें पाकीट फोडलें, आणि तो पत्र वाचूं लागला.

"मित्रवर्य पांडुरंगराव यांस, कृ. सा. न. वि. वि.

गेल्या सात आठ दिवसांत पत्र न पाठविल्यामुळें आपली काळजी वाढणें साहजिक आहे. या सात आठ दिवसांत निश्चित असे पत्रोत्तर पाठविण्यासारखी स्थिति नसल्यामुळें पत्र न पाठविणेंच बरें असें वाटलें. ज्या कार्यासाठी मी येथें आलों आहें, त्यांत परमेश्वरकृपेनें बरेंच यश मिळालें आहे आणि त्याच्याच कृपेनें सर्व कार्य निर्विघ्न पार पडेल, असा भरंवसा वाटतो. नानासाहेवांनी जो विलक्षण डाव मांडून ठेवलेला आहे, तो उधळून टाकणें अर्थातच श्रेयस्कर नाही. तसे केल्यास साहेबमजकूर सूडबुद्धीनें इतके खवळतील कीं, मग ते कोणतीहि वाईट गोष्ट केल्यावांचून राहणार नाहीत. तेव्हां ते आपली प्यादी ज्या धोरणानें पुढें सरकावीत आहेत, त्याला विशेष विरोध न करता कार्यभाग साधण्याचें ठरविलें आहे. मला प्रथम दादासाहेवांची फार भीति होती. प्रत्यक्ष त्यांच्या वाड्यांत शारदेसारख्या सुंदर आणि तरुण मुलीला आणून ठेवल्यामुळें काय होतें आणि काय नाहीं, अशा काळजींत असतां, शारदेची विलक्षण जन्मकथा समजली. ती हकीकत कशी समजली वगैरे समक्ष सांगेन. हें रहस्य कळल्यामुळें दादासाहेबांचें मन नानासाहेबांसंबंधानें अधिकच विटलें. शारदेविषयी दादासाहेबांच्या मनांत प्रेम उत्पन्न झालें होतें व त्यांनीं थोडी त्या दृष्टीनें चूकहि केली; परंतु याच वेळीं दोन तीन अशा विलक्षण गोष्टी घडल्या कीं, त्यामुळें दादासाहेबांचा संकल्प अधिक दृढ झाला. एक तर या विवाहास स्वतः शारदा अनुत्सुक आहे, असें दादासाहेबांना वाटलें. त्यांनी एके दिवशीं तिची कांहीं चेष्टा केली; पण त्याच दिवशीं इंदूची तसबीर भिंतीवरून पडली आणि एक कांचेचा तुकडा शारदेच्या कपाळांत शिरला. ही गोष्ट काकतालीय न्यायानें घडली असली, तरी तिचा परिणाम मात्र दादासाहेबांच्या मनावर चांगलाच झाला आणि तिसरी गोष्ट म्हणजे शारदेची जन्मकथा! दादासाहेब पहिल्यापासूनच इंदूबरोबर विवाह करण्यास उत्सुक आहेत, हें आपणास माहीत आहेच. त्यांत अशा कांहीं गोष्टी घडून आल्यामुळें आणि पुढें दिवसगतावर गोष्ट ढकलणें म्हणजे नानासाहेबांस आपलीं प्यादीं पुढें लोटण्यास संधि देण्यासारखें असल्यामुळें, त्यांनीं इंदूबरोबर शक्य तितक्या लवकर विवाह करण्याचें ठरविलें आहे. ही विवाहयोजना मी, दादासाहेब आणि आणखी चार पांच मंडळी यांनीं अत्यंत गुप्तपणें ठरविली आहे. पुण्याचे सरदार फाळके हे आपणासच अनुकूल असल्यामुळें त्यांनीं कोणा तरी मोठ्याच्या लग्नासाठीं म्हणून पुण्यांतला

दादासाहेबांचा वाडा मागून घेतला आहे व तो वाडा मांडव वगैरे घालून उत्तम रीतीनें ते शृंगारीत आहेत. वास्तविक ही तयारी दादासाहेबांच्या लग्नासाठीं आहे. तसेंच माझे वडील व मातुःश्री आणि विजयगडांतील दुसरी कांहीं मंडळी येथून जवळच एका गांवीं लग्न असल्यामुळें तिकडे गेली आहेत. ही सर्व मंडळी तेथून तशीच पुण्यास रवाना होणार आहेत. मीहि आज येथून निघून वाटेंत एका स्टेशनवर उतरणार आहें. सरदार फाळके यांची भपकेबाज निमत्रणपत्रिका आजच दादासाहेबांच्या हातीं पडली आहे व ते उद्यां रात्रींच्या गाडीनें आपल्या लव्याजम्यानिशीं पुण्यास जाण्यासाठीं निघणार आहेत. वरील हकीकतीवरून आम्हीं या बाबतीत कितपत सावधगिरी बाळगिली आहे, याची आपणास शंका वाटेल; पण आम्हीं शक्य तितक्या सावधगिरीनें ही योजना तयार केली आहे, इतकेंच आपणास सुचवितों. आपणहि शक्य तितकी सावधगिरी बाळगावी. दादासाहेब पुण्यास आपल्या दाब्यांत येऊन दाखल झाले, म्हणजे मग मात्र गुप्तपणा न ठेवतां पुढील प्रत्येक विधि सरदारी थाटानें झाला पाहिजे. आपण आपल्याकडची तयारी सावधगिरीनें करावी. कळावें. नवल विशेष मजकूर नाहीं. आपल्या शेजारच्या घरीं माझें कुशल कळवावें."

हें पत्र वाचून होतांच पांडुरंगाच्या चित्तवृत्तीचें चांचल्य क्षणभर स्थिर झालें. गुरूंचा आदेश आणि त्याप्रमाणें कार्य घडून येण्याचीं चिन्हें, याबद्दल अर्थातच त्याला आश्चर्य वाटलें. पांडुरंगानें तें पत्र काळजीपूर्वक खिशांत घातलें आणि तसाच तो आपल्या कुलोपाध्यायाकडे गेला. इंदिरेच्या लग्नाचा घोटाळा उपाध्यायास अगोदरच माहीत झालेला असल्यामुळें त्यानें पांडुरंगास पाहतांच 'विजयगडाकडील काय खबर आहे?' म्हणून पहिला प्रश्न केला. या उपाध्यायाचें नांव रामशास्त्री असें असून 'पुण्याच्या प्रसिद्ध रामशास्त्र्यांप्रमाणेंच हा गृहस्थहि निस्पृहपणासंबंधानें प्रसिद्ध होता. रामशास्त्र्याचें वय या वेळी पन्नाशीच्या वर असून त्याचें पांडुरंगावर पुत्रवत् प्रेम होतें. शिवाय त्या दोघांचा घरोबाहि पुष्कळ दिवसांचा होता. रामशास्त्री पट्टीचा विद्वान् असून अत्यंत निगर्वी होता. शास्त्रीबोवांस उत्तर न देतां पांडुरंगानें खिशांतून पत्र काढून तेंच त्यांच्या स्वाधीन केलें. डोळ्यांवर चष्मा चढवून शास्त्रीबोवांनीं तें पत्र काळजीपूर्वक वाचून पाहिलें व नंतर तें पत्र पांडुरंगाच्या हातीं परत करून म्हणाले, "समजलों, त्या मूर्खाला असेंच सपशेल तोंडघशीं पाडलें पाहिजे. अरे, ज्या संस्थानचें अन्न खावयाचें, त्या संस्थानाशीं अशी दगलबाजी! आणि दादासाहेबांसारख्या पोराशीं! शिव शिव! नानासाहेबाला वाटत असेल कीं,

काळ बदलला आहे, तेव्हां या वाहत्या गंगेंत घ्यावेत हात धुवून; पण म्हणावें, आमच्या चित्रगुप्तांनीं तुझ्या प्रत्येक श्वासाचा देखील हिशोब ठेवला आहे! वेळ आली म्हणजे सर्व हिशोब चुकता करावा लागेल! जाऊं द्या. त्याशीं आपणास कांहीं कर्तव्य नाहीं. पांडुरंग, तुला आतां यासंबंधानें कांहीं काळजी नको. कशा रीतीनें तयारी करावयाची, तें माझ्या सर्व लक्षांत आलें आहे. उद्यां सकाळीं दादासाहेब त्यांच्या वाड्यांत येऊन दाखल होईपर्यंत तू एक अक्षर देखील कोणाजवळ बोलूं नकोस. कारण नानासाहेबांचा एकादा दोस्त पुण्यांत नसेल असें नाहीं, आणि लग्नाच्या कामांत वाटेल त्याला विघ्न उत्पन्न करतां येतें. म्हणून मौनं सर्वार्थसाधनं. दादासाहेब येथें आल्याची खबर मात्र मला अगोदर देम्ह णजे सकाळपासून सायंकाळपर्यंत पुण्याहवाचनापासून तों टाळीवाजेपर्यंत सर्व व्यवस्थितपणें आणि यथासांग उरकून घेतों. त्याची अगदी काळजी नको. अरे, रामशास्त्र्याचे हातानें गरिबाचें लग्न देखील थाटानें पार पडतें, तर तुमच्यासारख्याचें कार्य सरदारी थाटानें कां पार पडणार नाहीं? आचारी, पाणके, शागीर्द, शिधा, सामान वगैरे सगळी व्यवस्था उद्यां दोन तासांच्या आंत लावतों." वृद्ध शास्त्रीबोवांचे हे अंतःकरणापासून निघालेले शब्द ऐकून पांडुरंगाचे डोळे पाण्यानें भरून आले. पांडुरंगाचे डोळे पाण्यानें भरलेले पाहून शास्त्रीबोवा त्याच्या पाठीवर हात फिरवून म्हणाले, "हं, असें शुभप्रसंगीं डोळ्यांत पाणी आणूं नये. अरे, प्रभु रामचंद्रासारख्यांना विपत्ति भोगावी लागली, तेथें आपली काय कथा? अशा प्रसंगीं तुम्ही सगळे हिंमतीनें वागलां, हेंच अधिक. सगळे तुझी या बाबतींत तारीफ करतात. दुष्टांचीं कामें दुष्ट करतात, म्हणून काय सज्जन केव्हां बेहिंमत होतात काय? कांहीं भिऊं नकोस. प्रभु पाठीराखा असल्यावर असल्या मर्कटांच्यानें काय होणार आहे?" पांडुरंग थोडा वेळ स्तब्ध राहून म्हणाला, "घरांत मनुष्यबळ नाहीं, हें आपणांस माहीत आहेच. तेव्हां चार दिवस काकूंना मुलांबाळांसह पाठविलें पाहिजे आणि त्यांनीं घरांतली सगळी व्यवस्था पाहिली पाहिजे. तसेंच आमची आप्तमंडळी जी येथें आहे, त्यांनाहि बोलावण्याची तुम्हींच जोखीम संभाळली पाहिजे; कारण मला पुष्कळांची माहिती देखील नाहीं!" रामशास्त्र्यांनीं हें पांडुरंगाचें म्हणणें मोठ्या आनंदानें कबूल केलें. नंतर थोडें इकडचें तिकडचें बोलणें झाल्यावर पांडुरंगानें त्यांना नमस्कार केला आणि तो मग दुसऱ्या मित्रमंडळीकडे गेला. ही सर्व व्यवस्था फार गुप्तपणें करून त्याला घरीं यायला रात्रीचे नऊ दहा वाजून गेले. लग्नाच्या बाबतींत घरांत कोणाजवळहि कांहीं न बोलतां दुसऱ्या दिवशीं पांडुरंग लवकर उठला आणि स्नान वगैरे करून बाहेर निघून

गेला. ज्या चार दोन स्नेह्यांचा दादासाहेबांशीं दाट परिचय होता, त्यांना पांडुरंगानें बरोबर घेतलें आणि गाडी येण्याच्या आधींच ते सर्व स्टेशनवर जाऊन पोहोंचले. रोजच्याप्रमाणें त्या दिवशीहि गाडी वेळेवरच आली. गाडी धक्क्याच्या जवळ येण्याच्या आधींच दिनकरनें खिडकीच्या बाहेर तोंड काढलें आणि हात हलवून 'सर्वांसह आलों' असें त्यानें सुचविलें. ती सूचना मिळतांच सर्वांचे चेहरे उत्साहित झाले आणि ते त्या डब्याच्या अनुरोधानें धांवले. गाडी उभी राहातांच फर्स्ट-क्लासच्या डब्यांतून दिनकर व दादासाहेब खालीं उतरले. यावेळीं सर्वांच्या चेहऱ्यावर हास्याची लकेर झळकत असून कित्येकांच्या डोळ्यांत थोडे अश्रूहि चमकत होते. परस्परांचे नमस्कार व कुशल प्रश्न झाल्यावर ही सर्व मंडळी स्टेशनच्या बाहेर पडली व पांडुरंगानें मुद्दाम आणलेल्या खाजगी गाड्यांतून दादासाहेबांच्या वाड्या-कडे गेली. सरदार फाळके हे वाड्यांत या मंडळीची वाट पहातच बसले होते. त्यांच्याजवळ रामशास्त्री बसलेले असून त्या दोघांचें याच संबंधानें बोलणें चाललें असतां दादासाहेबांनीं जेव्हां आपल्या लव्याजम्यानिशीं वाड्यांत प्रवेश केला, तेव्हां त्या दोघांनाहि विलक्षण आनंद झाला. दारापुढें उत्कृष्ट मांडव घातलेला असून वाडाहि चांगल्या रीतीनें सजविलेला आहे, हें पाहून दादासाहेब व दिनकर यांना मोठा संतोष झाला. रामशास्त्र्यांनीं दिनकरला बाजूला बोलावून कांहीं प्रश्न केले व त्या प्रश्नांचीं समाधानकारक उत्तरें मिळतांच क्षणार्धांत दादासाहेबांच्या वाड्याला लग्न-घराचें मंगल स्वरूप आलें. सूरसनईच्या ताफ्यांतून मंजूळ आलाप निघावयाला लागले, दादासाहेबांचे आप्तस्वकीय, त्यांचा उपाध्याय व स्नेहीमंडळी यांच्या नट-ल्यासजलेल्या बायकामुलांनीं सगळा वाडा गजबजून गेला आणि दादासाहेबांच्या कल्पनेच्या बाहेर लग्नाची तयारी धूमधडाक्यानें चालू झाली.

वरपक्षाकडे असा आनंदोत्सव सुरू झाला होता; पण वधूकडे अद्यापि सामसूमच होतें. इंदू आणि पार्वतीबाई यांना अजून या विवाहासंबंधाची गंधवार्ताहि नव्हती. भिवागडी मात्र लवकर उठला होता आणि तो सगळा वाडा झाडून सारवून स्वच्छ करीत होता. त्यानें एक दोन गड्यांना आपल्या मदतीला बोलावून आणलें होतें आणि त्यांच्यासह त्यानें वाड्यांत झाडलोटीचें काम सुरू केलें होतें. भिवाचा तो उद्योग पाहून इंदू व पार्वतीबाई यांना साहजिक आश्चर्य वाटलें व त्यांनीं त्याला त्यासंबंधानें विचारलें देखील. भिवानें उत्तर दिलें, "हे दोघे तिघे पाहुणे आले आहेत, तेव्हां एकदां सगळ्या माड्याबिड्या सारवून घेतों झालें. मला एक-ट्याला बिछाईत काढाघालावयाला मग फार त्रास होतो." भिवाचें हें म्हणणें त्या

दोघींना पुष्कळ अंशीं खरें वाटलें. भिवाच्या या गडवडीवरून पांडुरंगानें त्याच्या कानांत कांहीं तरी सांगितलें होतें, हें उघड होय. आईवर व बहिणीवर जितका विश्वास टाकावा, त्यापेक्षां पांडुरंगानें भिवावर जास्त विश्वास टाकल्याचें पाहून पुष्कळांना आश्चर्य वाटलें असेल; परंतु ही गोष्ट विश्वाची नसून धोरणाची होती. आईला आणि बहिणीला लग्नासंबंधानें सांगावें आणि वेळेवर दादासाहेब न आल्यास किंवा दुसरा कांहीं घोंटाळा उत्पन्न झाल्यास त्या दोघींची निराशा व्हावयाची, हें थोडें भयप्रद असल्यामुळें पांडुरंगानें त्या दोघींजवळ साहजिक मुग्धता स्वीकारली होती. दादासाहेबांना त्यांच्या वाड्यांत आणून पोंहोंचविल्यावर मात्र केव्हां घरीं जाईन असें पांडुरंगास झालें व त्याप्रमाणें तो रामशास्त्र्यांना बरोबर घेऊन घाईघाईनें परतला.

या वेळीं पांडुरंगाचा चहा आतां करूं कीं मग करूं, या काळजींत इंदिरा असतां, अन्नपूर्णा तिच्याकडे आली आणि किंचित् खिन्न स्वरानें म्हणाली, "इंदू, विजयगडाहून या सात आठ दिवसांत मला एक बोटभर चिठ्ठी देखील पाठवावयाचें झालें नाहीं. नुसतें खुशाल म्हणून कळवावयाला काय खर्च होतें, कोणाला माहीत! म्हटलें पांडुरंगदादाला कांहीं पत्र वगैरे आलें कीं काय म्हणून शोधावें. आला होता का पोस्टाचा शिपायी तुमच्याकडे?" अन्नपूर्णेचे हे शब्द ऐकून इंदिरा हंसत हंसत म्हणाली, "दिनकरदादावर कां हा एवढा राग! अन्नपूर्णा, कामाकाजाच्या गर्दींत नसेल पत्र पाठविलें. दादा कोठें बाहेर गेला आहे. पत्रें आलीं असल्यास तीं त्याच्या टेबलावर असतील. चल, माझ्याबरोबर दिवाणखान्यांत चल. अक्षरावरून त्यांचें पत्र तुला ओळखतां येईल." दोघीहि दिवाणखान्यांत गेल्या आणि त्या दिवसाचें टपाल टेबलावर पडलें होतें, तें उलथेंपालथें करूं लागल्या. त्यांत दिनकरचें पत्र मुळीच नाहीं, हें पाहून अन्नपूर्णेला अधिक हुरहुर वाटूं लागली. इतक्यांत खालीं पांडुरंगाचा शब्द ऐकूं आला व त्यावरून इंदू अन्नपूर्णेला म्हणाली, "अन्नपूर्णा, दादा येत आहे, आतां त्यालाच विचारूं म्हणजे झालें." इंदू असें म्हणत आहे, तोंच पांडुरंग रामशास्त्र्यांना घेऊन वर आला. कोणी तरी परकें आलें आहे, अशा समजुतीनें इंदू आणि अन्नपूर्णा अशा दोघीहि आंत जाणार होत्या; पण सर्व पोराबाळांना प्रिय व पूज्य झालेले रामशास्त्री येत आहेत, असें पाहून त्या तशाच तेथें उभ्या राहिल्या. पांडुरंग आंत आल्याबरोबर त्यानें शास्त्रीबोवांना तक्याशीं बसविलें व तो मोठ्यानें 'आई आई' म्हणून पार्वतीबाईना हांक मारूं लागला. ही हांक कातर स्वराची असल्यामुळें पार्वतीबाईनें हातांतलें काम तसेंच टाकलें आणि ती घाईघाईनें

वर येऊं लागली. तितक्या अवधींत इंदू पांडुरंगाला म्हणाली, "दादा, दिनकर-दादाचें कांहीं पत्र आलें आहे?" इंदूचा हा प्रश्न ऐकून पांडुरंग हंसत हंसत म्हणाला, "कोण अन्नपूर्णावैनी विचारतात वाटतें! त्यांना म्हणावें, त्यांचें पत्र कांहीं आलें नाहीं; पण ते स्वतः मात्र आले आहेत. वैनीवर ते रागावल्यामुळें तिकडे दादासाहेबांच्या वाड्यांत उतरले आहेत." दोघीनाहि या म्हणण्याचा अर्थ चांगला समजला नाहीं. इतक्यांत आईकडे वळून आर्द्रस्वरानें व डोळ्यांत पाणी आणून पांडुरंग म्हणाला, "आई, आज सायंकाळीं गोरज मुहुर्तावर इंदूचें लग्न आहे. दादासाहेब आपलीं दहावीस माणसें बरोबर घेऊन आले आहेत. अन्नपूर्णा, यमुना, द्वारकाबाई, यांना बोलावून आणून उद्योगाला लागा. शास्त्रीबोवांची मंडळी लवकरच येतील. ते स्वतः चार दिवस आपल्याचकडे राहणार आहेत." पांडुरंगाचे हे शब्द ऐकून इंदू व अन्नपूर्णा तशाच आंतल्या माडींत निघून गेल्या. पार्वतीबाईची स्थिति तर अगदी चमत्कारिक झाली. हृदय आनंदानें दाटून आलें, डोळ्यातून अश्रूंच्या धारा वाहूं लागल्या आणि तोंडांतून शब्द निघेनासा झाला. बिचारीची ती स्थिति पाहून रामशास्त्र्यांचें देखील अंतःकरण कळवळून आलें. ते म्हणाले, "पार्वतीबाई, झालें गेलें आतां सगळें विसरून जा. तुम्हांला परमेश्वराचा पाठिंबा आहे. त्याच्याच दयेनें हा दिवस उगवला आणि त्याच्याच कृपेनें सर्व कार्य निर्विघ्नपणें शेवटास जाईल. आतां अगोदर घरात जा आणि उद्योगास लागा."

पार्वतीबाई यावर कांहीच बोलली नाहीं आणि बोलण्यासारखी तिची स्थितीहि नव्हती. मागच्या माडीत इंदिरा अश्रु गाळीत बसली होती, आणि अन्नपूर्णेनें तिला आपल्या हृदयाशीं कुरवाळून धरलें होतें. याच वेळी पार्वतीबाईहि त्या माडीत आली. बाहेर निरनिराळ्या वाद्यध्वनींची विलक्षण गडबड उडाल्यामुळें द्वारकाबाई व यमुना यांना मोठें आश्चर्य वाटलें व त्या दोघी अन्नपूर्णेच्या मुलाला बरोबर घेऊन घाई-घाईनें त्याच माडीत आल्या. द्वारकाबाईना पाहतांच अन्नपूर्णा म्हणाली, "आई, या इंदूला नी पार्वतीबाईना तूं तरी कांहीं सांग. हें काय असें वेड्यासारखें. लग्नाचा दिवस आणि असें डोळ्यांतून पाणी काढणें चांगलें का!" प्रौढपणाचें अवसान आणून अन्नपूर्णा असें म्हणाली; पण तसे म्हणतां म्हणतांच तिचे डोळे देखील पाण्यानें भरून आले. हें काय प्रकरण आहे, तें द्वारकाबाईच्या तेव्हांच लक्षांत आलें. तिनें त्या दोघींना दोन गोष्टी सांगून हंसतें केलें आणि कोणाला बोलवावयाचें, घरांत काय आहे, काय नाहीं, याची वाटाघाट तिनें सुरू केली. पुरुषोत्तमरावहि बाहेर दिवाणखान्यांत येऊन पांडुरंगाबरोबर याचसंबंधानें बोलत होते. इतक्यांत हा

वेळपर्यंत पांडुरंगानें चहा वगैरे कांहीं घेतला नाहीं, याची आठवण पार्वतीबाईला झाली. ती म्हणाली, " इदू, अगोदर स्वयंपाक घरांत जाऊन चांगले दहा बारा पेले चहाचें आधण ठेव. " आईचे हे शब्द ऐकून दादानें चहा घेतला नाहीं, अशी इंदूलाहि आठवण झाली आणि ती उठूं लागली; पण यमुना तिला न उठूं देतां म्हणाली, " छे! नवऱ्यामुलीनें आतां कोणत्याहि कामाला बोटदेखील लावावयाचें नाहीं. आणि आम्हां शेजाऱ्यापाजाऱ्यांचा मग उपयोग तरी काय? अन्नपूर्णाताई, तूं इंदू-जवळ बैस. मी आतां चहा नी फराळाचें तयार करतें. " असे म्हणून यमुना तशीच स्वयंपाक घरांत निघून गेली. इकडे पार्वतीबाई व द्वारकाबाई खालीं जाऊन घरांत काय आहे, काय नाहीं, तें पाहूं लागल्या. सगळ्याजणी त्या माडींतून गेल्यावर इंदू अन्नपूर्णेला म्हणाली, " दादानें अजून कांहीं खाल्लें नाहीं, असें म्हटल्यावर यमू कशी धांवली, तें तूं पाहिलेंस ना? अन्नपूर्णाताई, मी सासरीं जाण्यापूर्वी यमूच्या स्वाधीन दादाला करून जावें, अशी माझी फार इच्छा आहे. तसें झालें म्हणजे मी अगदीं निष्काळजी होईन. मला माझ्यापेक्षां माझ्या दादाचीच फार काळजी वाटते. " असे म्हणून आशाजनक दृष्टीनें इंदू अन्नपूर्णेकडे पाहूं लागली. अन्नपूर्णा म्हणाली, " इंदू, त्यासंबंधानें तूं मुळींच काळजी करूं नकोस. ईश्वरकृपेनें सगळें तुझ्या मनाप्रमाणेंच होईल. "

सुमारें एका तासाच्या आंत इंदूच्या लग्नाचें वर्तमान पांडुरंगाच्या आप्तस्वकीयांस समजलें व त्याबरोबर मानापानानें बोलावण्याची वाट कोणींहि न पहातां पांडुरंगाच्या घरीं जो तो येऊं लागला. रामशास्त्र्यांनीं अगोदरच तजवीज केलेली असल्यामुळें थोडक्याच अवधींत सर्व सामान घरांत येऊन पडलें व घरचें कार्य समजून जो तो खटपटीस लागला. नवऱ्यामुलाकडे मोठा मांडव आणि मुलीच्या दाराशीं कांहींच नाहीं, ही गोष्ट कित्येकांस आवडली नाहीं व त्यांनीं दुपारचे एक वाजण्याच्या आंत भला मोठा मांडव दारापुढें तयार केला. पावसाची भीति होती; परंतु पर्जन्य आला, तर तें अधिक शुभदायक आहे, अशी त्यांनीं सगळ्यांची समजूत घातली होती. ही अशी लग्नाची तयारी मोठ्या उत्साहानें चालली असतां दहाच्या सुमारास दिनकर, त्यांचे श्वशुर पुरुषोत्तमराव व त्यांचे पुरोहित उमाकांत दीक्षित असे तिघे पांडुरंगाच्या दिवाणखान्यांत येऊन बसले. पांडुरंगानें सर्वांचा आदरसत्कार केल्यावर पुरुषोत्तमराव पांडुरंगाला म्हणाले, " पांडुरंगराव, तुम्ही तीन वाजण्याच्या सुमारास कचेरींत या, म्हणजे तुम्ही व मी मिळून साहेबांना लग्नाचें आमंत्रण करूं. साहेब फार सज्जन आहेत. ते लग्नाला अवश्य येतील व त्यांची हजेरी फार महत्त्वाची आहे, हें

तुम्हांला माहीत आहेच." ही सूचना पांडुरंगानें अर्थातच मान्य केली. या महत्त्वाच्या सूचनेचा उगम दिनकरच्या डोक्यांतून झाला होता व त्याबद्दल पांडुरंगानें दिनकरचे आभारहि मानले. यानंतर थोडा वेळ सर्व स्तब्ध बसले होते. नंतर उमाकांत दीक्षित पांडुरंगास म्हणाले, "आपल्या मातुश्रींना बोलवा. थोडें काम आहे." या बोलण्याचा अर्थ पांडुरंगाच्या लक्षांत आला नाहीं. त्यानें त्याप्रमाणें आईला बोलावून आणलें व तोहि तेथेंच बसला. पार्वतीबाई बाजूला उभी राहिल्यावर उमाकांत दीक्षित म्हणाले, "पार्वतीकाकू, आम्ही कांहीं कोणी परके नाहीं, आणि तुम्ही आम्हां सर्वांपेक्षां वडीलहि आहां, तेव्हां उभे राहण्याचें कांहीं कारण नाहीं. आज इंदूचा विवाह ईश्वरकृपेनें निर्विघ्नपणें पार पडेलच. विवाह झाल्यावर इंदू सासरीं जाणार, हेंहि तुम्हांला सांगावयाला नकोच. तुमचा झाला आहे वृद्धापकाळ; तेव्हां याच मंगल प्रसंगी लक्ष्मीप्रमाणें सून जर घरांत आली, तर तिला नाहीं म्हणून म्हणू नये, अशी विनंति करण्यासाठीं आलों आहें." उमाकांत दीक्षितांचे हे शब्द ऐकून पार्वतीबाईचें अंतःकरण आनंदानें दाटून आलें. ती हंसत हंसत म्हणाली, "माझीहि तशीच इच्छा आहे; पण लग्न म्हणजे जन्माच्या गांठीं असतात. तेव्हां घाईनें कांही तरी करून पुढें मुलाच्या संसाराची अव्यवस्था होऊं नये म्हणून जपले पाहिजे. आणि पांडुरंग जवळच आहे. त्याची सल्ला घ्या म्हणजे झालें. त्याला मुलगी पसंत पडली, तर पुढें सगळ्या गोष्टी."

पांडुरंगास हें एक संकटच वाटलें. इतक्या लवकर लग्न करण्याचा त्याचा विचार नव्हता. शिवाय घाईघाईनें आलेल्या मुलीसंबधानें कांहींच माहिती नसतां, लग्नाला कबूल होणें, त्याला अनुचित वाटलें. तो उमाकांत दीक्षितांना म्हणाला, "आपण अगदी भलत्याच वेळी ही गोष्ट काढली असे मला वाटतें. एक तर इंदूचें लग्न अद्याप लागावयाचें आहे. शिवाय एवढी परीक्षा होईपर्यंत लग्न करूं नये, असें मीं ठरविलें आहे." यावर उमाकांत दीक्षित हंसत हंसत म्हणाले, "लग्न झालें, म्हणजे अभ्यासांत व्यत्यय येतो, हें वेड अलीकडे पुष्कळ तरुणांच्या डोक्यांत शिरलें आहे. जणुं काय विवाहित मुली नवऱ्याच्या हातांतलीं पुस्तकें हिसकून घेतात ! पांडुरंगराव, राग येऊं देऊं नका. परीक्षा आणि लग्न याचा खरोखर कांही संबंध नाहीं. तुमच्या परीक्षा वगैरे सगळें तुमच्या मनोनिग्रहावर अवलंबून आहे. पुष्कळ तरुणांचा मनावर ताबा मुळींच नसतो आणि गप्पा मात्र मोठाल्या मारतात. अशांच्या नशिबीं अपयश आलें, म्हणजे लग्न लवकर केल्याबद्दल वडील माणसांवर राग काढावयाचा ! पांडुरंगराव, मीं जी तुमच्यासाठीं मुलगी पाहिली आहे, ती तुमच्या अभ्यासांतच काय, पण

कोणत्याहि कृत्यांत व्यत्यय आणणार नाहीं. उलट तिचें प्रत्येक बाबतींत झालें तर तुम्हांला थोडें-फार साहाय्य मात्र होईल. मुलीला तुम्ही दररोज पहातच आहां, तेव्हां तिचा स्वभाव, तिची वर्तणूक व तिचें रूप यांबद्दल सांगण्याचें कांहीं कारण नाहीं. पुरुषोत्तमरावांची मुलगी यमुना आपणास द्यावी अशी त्यांची, माझी व दिनकर-रावांची इच्छा आहे. मुलगी पैशानें गरीब आहे, पण बुद्धीनें, शीलानें, कुलानें, गुणानें व रूपानें श्रीमंत आहे. तुमचा आणि आईसाहेबांचा विचार ठरवा आणि आमची कोणाची निराशा होणार नाहीं, असें उत्तर द्या." उमाकांत दीक्षितांचें हें भाषण ऐकून पांडुरंगाच्या मनावर जो परिणाम झाला, तो अवर्णनीय होय. यमूसारखी गृहिणी मिळणें, हें त्यास अर्थातच मोठें भाग्य वाटलें. या विवाहाला कोणत्या शब्दांनीं संमति दर्शवावी, हें त्यास कळेनासें झालें. त्याच्या चेहऱ्यावर आनंद मावेनासा झाला होता; पण तो शब्दानें व्यक्त करणें त्याला साधलें नाही. पांडुरंगानें मौन स्वीकारलें आहे, असें पाहून पार्वतीबाई म्हणाली, "उमाकांत दीक्षित, पूर्वजन्मींचें कांहीं संचित म्हणून यमूसारखी सून मिळत आहे. हें जर तुम्हीं अगोदरच सांगितलें असतें, तर आम्हांला विचारण्याचें देखील कारण उरलें नसतें." असें म्हणून पार्वतीबाई हंसत हंसत पुरुषोत्तमरावांस म्हणाली, "पुरुषोत्तमराव, तुमची मात्र आतां मोठी पंचाईत होणार असें दिसतें. पांडुरंग तुमचाच, यमूहि तुमची, तेव्हां आतां दोन्हीकडची व्यवस्था तुम्हीच पाहिली पाहिजे. देण्याघेण्याच्या बाबतींत तुम्ही यत्किंचित देखील काळजी करावयाची नाहीं. मुलाला दूधभात जेऊं घालून कार्य पार पाडलें, तरी त्यांत मला संतोष आहे."

पुरुषोत्तमराव म्हणाले, "माझ्यासारख्या गरीब मनुष्याला तुम्ही पदरांत घ्याल असा मला भरंवसा होता, म्हणूनच मीं तुम्हांला विनंति केली. दूधभातावर संतुष्ट असणें हें तुमचें सौजन्य आहे; पण तुम्हांला तरी कांहीं चार दोन मुलें नाहीत. एवढा एकच मुलगा. ही गोष्ट लक्षांत ठेवून मी माझ्या शक्तीप्रमाणें कोठेंहि कमी पडूं देणार नाहीं. आणि जेथें कमी पडेल तेथें तुम्ही संभाळून घ्यायला आहांच."

उमाकांत दीक्षित म्हणाले, "पार्वतीबाई, या ज्येष्ठ महिन्यांत कांहीं चांगले मुहूर्त नाहीत. परवांचा मुहूर्त फार चांगला आहे. थोडी घाई होईल खरी, पण त्याला कांही उपाय नाहीं."

दिनकर इतका वेळ गप्पच बसला होता. तो आतां हंसत हंसत म्हणाला, "हे आतां एकामागून एक पोटांत जाणारे लाडू पचवावेत कसे, ही मात्र काळजी उत्पन्न

झाली. उमाकांत, तुम्हीं लग्नें वाटेल तितक्या घाईनें लावा; पण जेवणावळी मात्र चार चार दिवसांच्या अंतरानें ठेवा. अहो, पूर्वी लग्नोत्सव सोळा दिवस होत असे; तो या जेवण्याच्याच सोयीसाठीं."

दिनकरचे हे शब्द ऐकून सर्व मंडळी मोठ्यानें हंसली. लग्नतिथि निश्चित झाल्यावर पुरुषोत्तमरावांनीं कचेरींत येण्याविषयीं पांडुरंगास पुनः सुचविलें व ते सर्वांचा निरोप घेऊन कचेरींत निघून गेले. एका लग्नोत्सवाची खबर आप्तेष्टांना समजते न समजते तों पांडुरंगाच्या लग्नाचीहि बातमी सगळीकडे पसरली. या तिन्ही कुटुंबांच्या आप्तस्वकीयांना या बातमीमुळें अर्थातच फार आनंद झाला व पांडुरंगाचें घर माणसांनीं अगदीं गच्च भरून गेलें. वेळ अगदीं थोडा आणि मंडळी पुष्कळ जमल्यामुळें कार्य बिनबोभाट कसें पार पडेल यांची पुष्कळांना भीति वाटत होती; परंतु जमलेले सर्व आप्तस्वकीय ही गोष्ट जाणून असल्यामुळें सगळ्यांनीं झटून मेहनत घेतली आणि त्यामुळें उणेपणा असा कोठेंहि भासला नाहीं. इतकेंच नव्हे, तर दोन्ही लग्नोत्सव कल्पनेच्या बाहेर थाटानें पार पडले. या वेळीं दादासाहेबांनीं विलक्षण मनोधैर्य दाखविल्यामुळें पांडुरंगाची मोठी काळजी दूर झाली, इंदिरेचा हृद्रोग नाहींसा झाला, पार्वतीबाईना लोकांत तोंड लपविण्याचें कारण उरलें नाहीं आणि मुख्य गोष्ट ही कीं, दादासाहेब आपल्या परमपूज्य पित्याच्या वचनांतून मोकळे झाले.

### प्रकरण दहावें

## सर्पाचे फूत्कार !

मुकुंद ऊर्फ दादासाहेब हे पुण्यास जाऊन दोन दिवस झाल्यावर नानासाहेबांना अर्थातच त्यांच्यासंबंधानें अनेक शंका येऊं लागल्या. कदाचित् पांडुरंगाच्या तडाख्यांत दादासाहेब सांपडल्यास ते इंदिरेबरोबर विवाहहि करतील अशी नानासाहेबांना भीति वाटली व म्हणून त्यांनीं पुण्याच्या आपल्या एका दोस्ताला दादासाहेबांवर लक्ष ठेवण्याविषयीं पत्रहि लिहिलें. शारदेनें मुंबई सोडून विजयगडास ज्या दिवशीं प्रवेश केला, त्याच्या तीन चार दिवसांनीं नानासाहेबांच्या घरीं वत्सलाबाईचेंहि आगमन झालें होतें. शारदेचा वाड्यांत प्रवेश झाल्यापासून दादासाहेबांच्या वर्तनांत कसकसा फरक पडतो, यावर नानासाहेबांनीं फार बारीक नजर ठेवली होती व

तिकडे त्यांनीं विशेष लक्ष पुरविल्यामुळें बाकीच्या अनेक गोष्टीकडे त्यांचें साहजिक दुर्लक्ष झालें. इतकी तादात्म्यवृत्ति नानासाहेबांची झाली नसती, तर त्यांना इंदिरेच्या लग्नाची थोडी तरी गुणगुण समजली असती. शारदेचा हात धरून तिला दादासाहेब कोचावर बसवीत होते, असें जरी गोदूच्या दृष्टोत्पत्तीस आलें होतें, तरी तिनें ती गोष्ट सात गांठी मारून ठेवली होती; परंतु त्याच दिवशीं शारदेच्या कपाळांत कांच शिरल्यानें गोदूच्या त्या गांठी सुटल्या आणि तिनें आपल्या एका सोबतिणीजवळ ती गोष्ट सांगितली. नंतर थोडक्याच वेळानें तो सर्व प्रकार नानासाहेबांसहि समजला. दादासाहेबांकडून अशा चार पांच चुका घडल्या, म्हणजे त्यांना खुषीनें अथवा सक्तीनें शारदेबरोबर विवाह करणें भाग पाडावयाचें असा नानासाहेबांचा डाव होता व तें शिक्षण वत्सलाबाईनें शारदेला भरपूर दिलें होतें; पण आमची शारदा अगदी अरसिक! आपल्या सुगोल-गौरबाहुपाशांनीं दादासाहेबांना आबद्ध करण्याचें धैर्य तिला झालें नाहीं!

तिकडे पुण्यास थाटानें लग्नसमारंभ चाललेले असतां इकडे विजयगडास नानासाहेबहि मनोराज्यांत दंग होऊन एका आरामखुर्चीवर पडून चिरूटांतून धुराचे झुरके इतस्ततः सोडीत होते. वत्सलाबाईहि जवळच एका खुर्चीवर बसून 'महिला-मंदिर' नांवाच्या मासिक पुस्तकाचा नवा अंक वाचीत होत्या. त्या अंकांत त्यांनीं स्वतःच 'विधवा आणि ब्रह्मचर्य' या नांवाचा एक लेख लिहिला होता व तो लेख त्या आतां पुनःपुन्हां वाचीत होत्या. दोघांचींहि मानसिक साम्राज्यें याप्रमाणें वृद्धिंगत होत असतां तेथें एकदम पोस्टाच्या शिपायानें प्रवेश केला आणि नानासाहेबांच्या हातांत दोन जाडीं लठ्ठ पाकिटें त्यानें दिली. एक पाकीट सरकारी असून एक खाजगी आहे व ती दोन्हीं पुण्याहून आलीं आहेत, हें नानासाहेबांना तेव्हांच उमगून आलें. या वेळीं ते सरकारी पाकिटापेक्षां खाजगी पाकिटाचीच विशेष उत्सुकतेनें वाट पहात असल्यामुळें त्यांनी प्रथम खाजगी पाकीट फोडलें व तें वाचण्यास आरंभ केला.

"कृ. सा. न. वि. वि.:—

आपलें कृपापत्र पावलें. पत्रांतील मजकुराचा अर्थ लक्षांत येतांच त्या उद्योगास लागलों. सायंकाळच्या सुमारास दादासाहेबांच्या वाड्याजवळ जातों, तोंच टोलेजंग मिरवणूक दृष्टीस पडली. शोधाअंती ही मिरवणूक स्वतः दादासाहेबांच्याच लग्नाची आहे, असें समजलें. शहरांतील बहुतेक सरदार, प्रसिद्ध गृहस्थ व सरकारी ऑफिसर वगैरे या लग्नाला हजर असून एकंदर समारंभ रुस्थानिकास शोभण्यासारख्याच

थाटानें पार पडला. विशेष महत्त्वाची गोष्ट ही कीं, या विवाहास कलेक्टरसाहेब हजर राहिले होते. यानंतर आणखी दोन दिवसांनीं आपले परमप्रिय 'मित्र' भगवंतराव यांचे चिरंजीव पांडुरंगराव यांचाहि विवाह थाटानें पार पडला. हे दोन्ही विवाह पुणें शहरांत फार गाजले. कारण दोन्हीं प्रसंगीं शहरांतील हजारों गरिबांना भरपूर अन्न-वस्त्र देण्यांत आलें. तसेंच, हुषार पण गरीब विद्यार्थ्यांना उत्कृष्ट जेवण व एक महिन्याची फी देण्यांत आली. असे विद्यार्थी सुमारें सात आठशें असून त्यांत कांही कॉलेजांतील देखील होते. याशिवाय निरनिराळ्या बऱ्याच संस्थांना दोघांकडूनहि चांगली मदत झाली. दादासाहेबांना सुमारें पंधरा हजार रुपये हुंडा पांडुरंगानें दिला; पण तो निराळ्या स्वरूपानें दिला. हे पंधरा हजार रुपये संस्थानानें चांगल्या कामीं व्याजीं लावावे व येणारें व्याज जे गरीब शेतकरी जमीन महसूल देण्यास असमर्थ असतील, त्यांना जमीन महसुलासाठी म्हणून द्यावें—"

पत्रांत अजून किती तरी मजकूर होता; पण तो सर्व मजकूर वाचून पाहणें नानासाहेबांना अशक्य झालें. दादासाहेबांचें इंदूबरोबर लग्न झालें, हा आशय आरंभींच लक्षांत आल्यामुळें निराशा, संताप आणि सूडबुद्धि ही एकाच वेळीं नानासाहेबांच्या अंतःकरणांत उदय पावली आणि त्यामुळें त्यांचा चेहरा भेसूर दिसूं लागला. तें लांबलचक पत्र वाचीत असतां वत्सलाबाईची नजरहि ओघानेंच नानासाहेबांच्या चेहऱ्याकडे वळली व निरनिराळ्या मनोविकारानें त्यांचा पालटणारा चेहरा पाहून तिच्या अंतःकरणांतहि हुरहुर उत्पन्न झाली. शेवटीं जेव्हां नानासाहेबांचा चेहरा विलक्षण भेसूर झाला व आपले दांत चावून ते जेव्हां मुठी वळूं लागले, तेव्हां तर वत्सलाबाईस विचारल्यावांचून राहवेना. ती म्हणाली, "आपण एवढे कां रागावलां? त्या पत्रांत असें काय विलक्षण आहे!"

तें पत्र वत्सलाबाईच्या आंगावर भिरकावून नानासाहेब रागानें म्हणाले, "पहा, वाचून पहा. दादासाहेबांनीं शारदेचा गळा कापला! तिच्या सगळ्या आयुष्याचा त्यांनीं नाश केला!"

पत्र वाचून पाहण्याचें वत्सलाबाईस अर्थातच कारण पडलें नाहीं. तेवढ्या दोन वाक्यांनींच सर्व कांहीं त्यांच्या लक्षांत आलें. त्या विषण्णतेनें म्हणाल्या, "म्हणजे! त्यांनीं त्या नकट्या इंदिरेबरोबर विवाह केला वाटतें?" या प्रश्नाचें नानासाहेबांकडून काय उत्तर मिळतें याची वाट देखील न पाहतां वत्सलाबाईंनीं धीर सोडला आणि डोळ्यांतून अश्रु गाळीत त्या करुण स्वरानें म्हणाल्या, "नानासाहेब, आतां माझ्या शारदेचें कसें होणार?"

या प्रश्नाचें उत्तर देण्यापूर्वी नानासाहेबांनीं आपला ओंठ दातांनीं किंचित् चावला व आपल्या मनाशीं ते म्हणाले, 'शारदेचें काय व्हावयाचें असेल, तें होईल; पण त्या अगोदर नानासाहेबांचें काय होणार ? हा नानासाहेबांपुढें प्रश्न आहे !' नंतर एक दीर्घ श्वास सोडून ते स्पष्टपणें व शून्य दृष्टीनें मुठी वळीत म्हणाले, "दादासाहेब, हे पोरखेळ तुम्ही नानासाहेबांशी खेळलां आहां, ही आठवण तुम्हांला जन्मभर ठेवीन ! ती भिकारीण संस्थानची मालकीण होणार आणि शारदा अन्नासाठीं तोंड लपवीत फिरणार, हें देवाच्या घरी जरी रुजू असलें, तरी तें नानासाहेबांच्या घरी रुजू नाहीं, हें खास समजा ! तुम्हीं विषारी सर्पाला खिजविलें आहे, हें आतां तुम्हांला कधीहि विसरतां येणार नाही ! मोठमोठ्या बुद्धिवानांना ज्या नानासाहेबांनीं आपल्या बुद्धिचमत्कारांनी चकित करून सोडलें आहे, त्यांना दादासाहेबासारख्या पोराला वाटेल तिकडे फेंकून देण्यास किती वेळ लागणार आहे ?" असे म्हणून नानासाहेब किंचित् थांबले. ते स्वस्थ झाल्यासारखे दिसले हें खरें, पण त्यांच्या अंतःकरणांत यावेळीं जे भयंकर विचार चालले होते, त्याचा विचार करणेंहि भयावह होय. ते आतां खुर्चीवरून उठले आणि त्या माडींत इकडून तिकडे हिंडूं लागले. हिंडतां हिंडतां मध्येंच एकदां ते हंसले. त्या आसुरी हास्याच्या लकेरी जेव्हां वत्सलाबाईच्या कानांत शिरल्या, तेव्हां त्यांच्या निर्ढावलेल्या अंतःकरणास देखील चरका बसला. नानासाहेब तसेच वत्सलाबाईजवळ आले आणि त्यांचा हात आपल्या हातांत धरून म्हणाले, "वत्सलाबाई, मला साहाय्य कराल ना ?" हा प्रश्न ऐकून वत्सलाबाई अधिक भयाकुल झाल्या. नानासाहेब आपणाकडून एकादी भयंकर गोष्ट करविण्याच्या विचारांत आहेत, असे त्यांना वाटलें व त्यामुळें त्यांनीं मुग्धता स्वीकारली. नानासाहेबांना वाटलें, ह्या निराशेनें उदास झाल्या आहेत आणि म्हणून बोलत नाहींत. त्यांचा हात अधिक कुरवाळून नानासाहेब म्हणाले, "वत्सलाबाई, तुमच्या मनाला वाईट वाटणें साहजिक आहे; पण तुम्हांला संतोष होईल अशा प्रकारचा सूड उगविल्यावांचून मी राहाणार नाही, हें लक्षांत ठेवा. दादासाहेबांना वाटत असेल कीं, मीं नानासाहेबांना चकविलें; पण शारदेचें कल्याण साधणें अजून नानासाहेबांच्या हातांत आहे. वत्सलाबाई, तुमची जशी समजूत आहे त्या समजुतीप्रमाणें शारदेला वैभवशाली झालेली तुम्ही पहाल !" असें म्हणून नानासाहेबांनी वत्सलाबाईचा हात सोडला आणि ते खुर्चीवर स्वस्थ पडले. त्यांच्या अंतःकरणांतली ती वावटळ शांत झाल्यावर दुसऱ्या पाकिटाकडे त्यांचें लक्ष गेलें व तें वाचून पाहिल्यावर तर त्यांचा चेहरा सूडबुद्धीनें अधिक भीषण दिसूं लागला. दादासाहेबांच्या हातीं संस्थानचीं

सर्व सूत्रें दिल्याचा उल्लेख त्या पाकिटांत होता. एकाच वेळीं असे दोन भयंकर तडाखे नानासाहेबांच्या मनोराज्यावर पडल्यामुळें ते किती क्रुद्ध, निराश व सूड-बुद्धीनें प्रेरित झाले असतील, याची कल्पनाच केली पाहिजे.

* * * *

इंदिरेला आज कोण आनंद झाला होता ! अगदीं आपल्याजवळ ती आज यमुनेला घेऊन बसली होती. यमू तिची जिवलग मैत्रीण होती, ती अगदीं शेजारीं रहात होती आणि ती प्रत्यहीं इंदिरेच्या घरीं येऊन इंदूजवळ बसत असे. असें असतां आजच इंदूला एवढा आनंद कां झाला होता ? आजच्या आनंदाचें कारण निराळें होतें. आज यमुना तिची भावजय म्हणून तिच्याजवळ बसली होती. इंदूची पुष्कळ दिवसांची आकांक्षा आज पूर्ण झाली होती. सुंदर सुंदर वस्त्राभरणांनीं ती गौरी-प्रमाणें यमुनेची नटलेली मूर्ति पाहून आपल्या बापाचें घर आज गृह या संज्ञेस योग्य झालें, असें तिला वाटलें. इंदिरेला आज आनंद झाला होता; पण यमूचा जीव हुरहूर करीत होता आणि केव्हां केव्हां तिच्या डोळयांतून चटकन् अश्रु पडत होते. आज इंदिरा तिच्या पतीबरोबर सासरी जाणार या विचारानें यमूला साहजिक वाईट वाटत होतें. यमूचा तो कोमेजलेला चेहरा पाहून इंदिरेचेंहि अंतःकरण गहिंवरून आलें; पण तसें न दाखवितां तिनें यमूला आपल्या हृदयाशीं कुरवाळून धरलें आणि ती हंसत हंसत म्हणाली, " वेडे, मी जाणार म्हणून एवढें का तुला वाईट वाटतें ? मी कांहीं तेथें फार दिवस राहणार नाहीं. आठ चार दिवसांच्या आंत परत येईन; पण यमू, आतां परत यायचें तें तुझ्या घरीं. माझ्या घरीं नाही हो ! हें घर आतां तुझें झालें. येथल्या एकाद्या वस्तूला देखील हात लावावयाचा अधिकार मला आतां उरला नाहीं. यमू, आतां हा सगळा संसार तुझाच आहे. तो तूं नीट सांभाळ. घरांत तुझ्यावांचून दुसरें कोणी पाहण्यास नाहीं, हें तुला माहीत आहेच. आतां तूं फार दक्षतेनें वागलें पाहिजे. माझ्या आईचें प्रेम मजपेक्षां देखील तुजवर अधिक आहे. ती तुला फारच चांगल्या रीतीनें वागवील. ही आपली सासू नसून आईच आहे, असे तुझ्या अनुभवाला येईल. तिचा स्वभाव पहिल्यापासून फार प्रेमळ आहे. सासूपणाच्या अभिमानानें वागावयाचें तिला कोणी शिकविलें, तरी तिच्या आंगीं असुरी वृत्तीचा तो अभिमान केव्हांहि यावयाचा नाहीं. तिचें लक्ष संसारांत मुळीं नाहीं म्हटलें तरी चालेल. त्यांतून आतां तिच्या मनाप्रमाणें सून मिळाल्यामुळें तर ती तूं काय करतेस आणि काय नाहीं, याकडे मुळींच लक्ष देणार नाहीं. तिला तूं देवपूजेचें साहित्य अगदीं तिच्या मनाप्रमाणें करून देत जा. त्यांत तिला तर संतोष वाटेलच, पण

तुझ्याहि मनाला मोठें समाधान वाटत जाईल. दादाचा स्वभाव तुला माहीत आहेच. गोडधोड कांहींहि करून त्याच्या पुढें ठेवलें, तरी कुरकुर करावयाची त्याला संवय नाहीं. नको तें टाकावें आणि रुचेल तें खावें, असा त्याचा स्वभाव आहे; म्हणून त्याच्या खाण्यापिण्याला फार संभाळ हो. त्याला काय आवडतें, काय नाहीं, हें तुला सगळें माहीत झालें आहे. स्त्रीचे चोज पुरविणें हें जसे पतीचें कर्तव्य, त्याचप्रमाणें पतीला सदोदित संतुष्ट ठेवणें हें स्त्रीचें कर्तव्य होय. उभयतांचा संतोष हेंच खरें संसारसुख होय. पतीला देवाप्रमाणें पूज्य मानणें सुशिक्षित स्त्रियांच्या जिवावर येतें; पण यमू, ही पूज्य भावना ज्या स्त्रीच्या अंतःकरणांत उत्पन्न होत नाहीं, तिच्यांत आणि पशूंत यत्किंचित् देखील अंतर नाही. या पूज्य भावनेवांचून चाललेला संसार म्हणजे पशूंचा संसार होय. केवळ दोन पाय आणि शेंपूट नाही, एवढ्यानें कांही पशूपणाचा आरोप जाणार नाहीं. आहार–निद्रादि व्यवहार पशूप्रमाणें आम्हीहि करतों; परंतु आमच्या या प्रत्येक व्यवहारांत पूज्य भावना असली पाहिजे, तरच आमच्या मनुष्य-जन्माचें सार्थक होय. या प्रत्येक व्यवहारांतलें पशुत्व पायाखालीं दडपून टाकणें, हाच मनुष्यत्वाचा पाया होय. पशुत्व नाहीसे करणें, मनुष्यत्व संपादन करणें, आणि अंतःकरणांत एकसारख्या पूज्यभावना खेळत्या ठेवून मनुष्यत्वाच्या पलीकडे जाणें, हेंच प्रत्येक मनुष्याचें कर्तव्य होय. पति जर आपल्या स्त्रीला गृहदेवता समजतो, तर स्त्रीनें पतीला देवाप्रमाणें पूज्य मानावयाला नको का ? यमू, पांडुरंग तुला गृहदेवतेप्रमाणेंच मानील; पण हें महत्त्व सांभाळणें सर्वस्वीं तुझ्या हातीं आहे. परमेश्वरानें तुला पुष्कळ वभव दिलें आहे; पण त्याचा अगदीं अभिमान न बाळगतां फार साधेपणानें वागत जा. भपकेबाज पोशाक आणि ख्यालीखुशालीनें राहण्याची संवय चांगली नाही. गरिबांवर नेहमी परोपकार करीत जा. तुला कांहीं कमी नाहीं आणि गरिबांसाठीं तुजकडून अधिकउणा खर्च झाला, तरी दादा तुला मुळींच बोलणार नाहीं. गडी वगैरे नौकर माणसांशी प्रेमानें वागत जा. तीं हलकीं माणसें आहेत म्हणून त्यांचा तिरस्कार करू नकोस. गडीमाणसांना आम्ही अशिक्षित समजतों; पण यमू, हे लोक जितके विश्वासू, जितके प्रेमळ आणि संकटांत जितके जिवाला जीव देणारे असतात, तितकी भलायी सुशिक्षितांच्या वांट्याला शतांशहि आलेली नसते. आपला भिवागडी फारच विश्वासू असून पांडुरंगावर त्याचें पोटच्या मुलाप्रमाणें प्रेम आहे. तो वृद्ध झाला आहे, त्याला कोणी देखील नाहीं. त्याला कोणत्याहि गोष्टीचें उणें पडूं देऊं नकोस. यमू, सांगितलेली बुद्धि आणि दिलेली शिदोरी जन्मभर पुरत नाहीं, अशी म्हण आहे; तेव्हां तूं तुझ्या स्वतःच्या बुद्धीनें आपला संसार

पहा म्हणजे झालें. अडलें तर सासूला आणि आईला विचारावें. मला मधून मधून पत्र पाठवून इकडची सगळी हकीकत कळवीत जा. मीहि तुला पत्र पाठवून माझी हकीकत कळवीन."

इतकें सर्व यमुनेनें शांतपणें ऐकून घेतलें; नंतर एक दीर्घ श्वास सोडून व अश्रु गाळीत गाळीत ती म्हणाली, "इंदूवन्सं, तुम्ही येथें कांही दिवस असतां, म्हणजे मी तुमच्याजवळ सगळें हळूहळू शिकलें असतें. वन्सं, माझ्याकडून कांहीं चुकलेंमुकलें, तर त्याबद्दल संभाळून घेण्यासंबधानें सासूबाईना आणि—" पुढचे शब्द यमूच्या तोंडांतून बाहेर पडेनात, तेव्हां इंदू हंसत हंसत यमूला कुरवाळून म्हणाली, "आणि कोणाला पांडुरंगाला होय! वेडे, त्या दोघांना त्यासंबंधानें कांही देखील सांगावयाला नको. ते तुला कांहीं देखील बोलणार नाहींत. यमू, तुझ्या हितानहिताला तूच जपलें पाहिजे, हें लक्षांत ठेव म्हणजे झालें. बाकी मीं त्या दोघांना तुझ्या आधीं सांगितलें आहे."

दोघी याप्रमाणें बोलत बसलेल्या असतां बाहेर दादासाहेबांचें सामान बांधून व गाड्या भरून तयार होत होत्या. निघण्याची एकच गर्दी उडाली होती. 'हां लवकर आटोपा, गाडीची वेळ होत आली.' अशी मधून मधून इषारतहि मिळत होती. निघण्याला थोडा अवकाश राहिल्यावर, कोणाला भेटावयाचें असल्यास भेटून घे, असें इंदूला पांडुरंगानें सुचविलें व त्याप्रमाणें ती शेजारीपाजरी विचारण्यासाठीं गेली. इंदूला अगदींच नवख्या ठिकाणीं जावयाचें होतें, असें कांहीं नाही. जुन्या ओळखीच्याच मंडळींत जावयाचें होतें; तरीपण मैत्रिणीचे निरोप घेतांना प्रत्येक वेळीं तिचे डोळे पाण्यानें भरून येत होते. द्वारकाबाईचा आणि आईचा निरोप तिनें जेव्हां घेतला, तेव्हां तर तिच्या डोळ्यांतून अश्रूंच्या धारा वाहूं लागल्या. मुलीला निरोप देते वेळीं पार्वतीबाईला अगदीं भडभडून आलें. इंदूनें आईला जेव्हां नमस्कार केला, तेव्हां 'अष्टपुत्रा सौभाग्यवती भव' हा आशीर्वाद पार्वतीबाईनें इतक्या गहिंवरून उच्चारला कीं, ते शब्द ऐकून सर्वांच्याच डोळयांत पाणी उभें राहिलें. यमू आतां सासुरवासीण असल्यामुळें बाजूला उभी राहून अश्रु पुशीत होती. तिचा निरोप फारच सावधगिरीनें घेतला पाहिजे, नाहीं तर ती अधिक रडावयाला लागेल, असा विचार करून इंदूनें आपले डोळे चांगले पुसले आणि ती उसनें अवसान आणून म्हणाली, "यमू, जातें हो. नीट संभाळून रहा." इंदूनें यावेळीं शिकस्त केली, तरी तिचा कंठ दाटून आला आणि डोळेहि पाण्यानें भरून आले. यमूला तर आतां मुळींच राहवेना. तिनें इंदूला कडकडून मिठी मारली आणि ती लहान मुलाप्रमाणें

रडूं लागली. स्फुंदत स्फुंदत ती म्हणाली, " इंदूवन्सं, गेल्याबरोबर पोहोंचल्याचें मला पत्र पाठवा." इंदूनें तिच्या गालावरून हात फिरवून ' पाठवीन बरें ' म्हणून सांगितलें आणि ती मोठ्या कष्टानें यमूनें मारलेला हाताचा विळखा सोडवूं लागली. आपली मिठी इंदू सोडवीत आहे, हें पाहून यमू अधिक उच्च स्वरानें रडूं लागली. इतक्यांत तेथें द्वारकाबाई व पार्वतीबाई आल्या. द्वारकाबाई म्हणाल्या, " इंदू, आतां मुळीच वेळ नाही. लवकर नीघ." इंदू आर्तस्वरानें म्हणाली, " पण यमू मला सोडीत नाही, मी जाऊं कशी ?" द्वारकाबाईनी यमूला आंजारूनगोंजारून तिची मिठी सोडविली आणि यमूला कुरवाळून त्या म्हणाल्या, " वेडे, इदू आणखी चार आठ दिवसांच्या आंत येईल. तिला चांगला आनंदानें निरोप द्यावयाचा की, असें रडावयाचें !" इंदूनें पुनः एकदां सर्वांचे निरोप घेतले आणि ती गाडींत जाऊन बसली. तिला सोबत म्हणून अन्नपूर्णाहि गाडींत बसली. दिनकर अगोदरच विजयगडास गेलेला असल्यामुळें तिला विजयगडास जावयाचेंच होतें. विजयगडापर्यंत अन्नपूर्णेची सोबत मिळाल्यामुळें इंदूला साहजिक बरें वाटलें.

दादासाहेब सहपरिवार सुखरूप विजयगडास येऊन पोहोंचले. यावेळी विजयगडच्या लोकांनी जो आनंदोत्सव केला, तो अपूर्व होय. त्यानंतर दादासाहेबांनीहि संस्थानच्या सर्व लोकांना यथाशक्ति संतुष्ट करण्याचा प्रयत्न केला. माईसाहेबांचें प्रेम शारदेपर विलक्षण बसलें होतें व तिची विनयशीलता वगैरे पाहून हीच आपणास सून मिळावी, असें त्यांना फार वाटत होतें. इंदिरा वयानें फार मोठी आहे, लिहावयाला वाचावयाला पुष्कळ शिकली आहे आणि अलीकडच्या छिचोर पद्धतीचा पोशाक करते, अशी माईसाहेबांची नानासाहेबांनीं समजूत करून दिली होती व ती समजूत आणखी कांही कारणांनी दृढ झाली होती. ती घोडनवरी आपल्या घरांत आली, म्हणजे घराची सगळी शोभा जाईल आणि घरांत सगळा सुधारणेचा बाजार माजेल, अशी माईसाहेबांना भीति वाटत असल्यामुळें बालबोध दिसणाऱ्या शारदेबरोबर दादाचा विवाह व्हावा, असें त्यांना फार वाटत होतें. शिवाय इंदिरेपेक्षां शारदा निःसंशय अधिक सुंदर आहे व तिची प्राप्ति मुकुंदला झाली म्हणजे माझ्या वाड्याला शोभा येईल, असेहि वृद्ध माईसाहेबांना वाटत होतें. शारदेचें तें सौंदर्य पाहून आणि तिच्या गोड स्वभावामुळें संतुष्ट होऊन ती खरोखर कोणत्या कुलांतली आहे, याचा शोध करण्याचें देखील माईसाहेबांना भान राहिलें नव्हतें. माईसाहेबांच्या मनाची अशी चमत्कारिक आशाजनक स्थिति झालेली असतां, अकस्मात् त्यांच्या कानावर जेव्हां दादाच्या लग्नाची वार्ता गेली, तेव्हां म्हातारीला प्रथम फार वाईट

वाटलें, नंतर तिला दादाचा मनस्वी राग आला आणि हा राग शांत झाल्यावर माईसाहेबांना थोडा संतोषहि झाला. त्याच्या वडिलांच्या आज्ञेप्रमाणें तो वागला, तेव्हां झालें हें बरें झालें, असेंहि त्यांना वाटूं लागलें. जन्मदात्या आईला एकुलत्या एक मुलाचा लग्नसोहळा पाहण्यास मिळाला नाही, याबद्दल माईसाहेबांना अर्थातच फार वाईट वाटलें; पण सुधारक फारसा लग्नसोहळा करीत नाहींत, अशीहि त्यांनी आपल्या मनाची समजूत करून घेतली. तरी पण एकदर लग्नोत्सव कसा काय झाल हें ऐकण्याची त्यांना चुटपुट लागली व दिनकराची आई लग्नाला गेली होती, असे समजल्यावर त्यांनीं तिला मुद्दाम बोलावून आणून विचारलें. दिनकरच्या आईनें घडलेली सगळी हकीकत जेव्हां माईसाहेबांना सांगितली, तेव्हां त्यांना मोठा आनंद झाला आणि त्यांचें अतःकरण गहिंवरून आलें. विशेषतः लग्नाला कलेक्टरसाहेब आले होते, हें ऐकून तर त्यांच्या अंतःकरणांत पुष्कळ समाधान उत्पन्न झालें. त्यानंतर दादाला संस्थानचा अधिकार मिळाल्याचेंहि त्यांना समजलें व त्यामुळें त्यांची सगळी काळजी दूर झाली. नवीन येणारी सून कशी वागते आणि ती सासूचा कितपत बोज ठेवते, एवढेंच फक्त त्यांना पहावयाचें होतें. दादासाहेबांनी इंदिरेसह मोठ्या थाटानें जेव्हां वाड्यांत प्रवेश केला, तेव्हां इंदिरेचें तें राजलक्ष्मीप्रमाणें सौंदर्य, मुखावरील तेजस्विता, रत्नाभरणांनी अलंकृत झालेली तिची देहलतिका आणि सहजपणें नजरेस पडणारी तिची शालीनता यामुळें सगळ्या नगरवासीयांना डोळ्याचें पारणें फिटल्याप्रमाणें झालें. दादासाहेबांनी पत्नीसह प्रथम कुलदेवतेस नमस्कार केला आणि नंतर ते मातुश्रीच्या दिवाणखान्यांत गेले. यावेळीं माईसाहेब सर्व राग वगैरे विसरल्या व दोघांनांहि त्यांनीं वात्सल्यप्रेमानें आपल्या हृदयाशी कुरवाळून धरलें. माईसाहेबांचे डोळे प्रथम अश्रूंनी डबडबल्यामुळें त्यांना इंदिरेकडे नीट नजर पुरवितां आली नाहीं; पण त्यांनीं जेव्हां डोळे पुसून इंदूवर नजर टाकली, तेव्हां त्यांना इंदिरा शारदेपेक्षां शतपट सुंदर व सज्जन दिसली. त्यांनी एकव्या इंदूला पुनः हृदयाशीं कुरवाळून धरलें आणि तिच्या गालाचें चुंबन घेऊन त्या शून्य दृष्टीनें वर पाहून म्हणाल्या, " देवा, माझ्या घरांत आज ही खरोखरच लक्ष्मी आली. तिच्याकडून माझ्या वंशाची वृद्धि कर एवढेंच तुझ्याजवळ मागणें आहे ! "

आपणास सून जशी पाहिजे होती, तशी मिळाली, अशी चार दोन दिवसांच्या आंत माईसाहेबांची खात्री झाली. इंदूची टापटीप, स्वच्छता, शुश्रुषा, आज्ञाधारकपणा, नम्रता, प्रेमळ स्वभाव आणि तिचें गोड भाषण यांमुळें सुनेला कोठें ठेवूं आणि कोठें नाहीं, असें माईसाहेबांना झालें होतें. देवघरांतील पूजेचें साहित्य आणि स्वच्छता

हीं पाहून तर माईसाहेबांच्या अंतःकरणांत समाधान मावेनासे होई. इंदू फार मोठी असून शारदा लहान आहे, असें नानासाहेबांनीं माईसाहेबांना सांगितलें होतें; पण आतां इंदूपेक्षां शारदाच माईसाहेबांना अधिक उंच दिसूं लागली. वास्तविक इंदूपेक्षां एक वर्षानें शारदा लहान होती; पण उंच बांध्याची असल्यामुळें ती थोडी मोठी दिसूं लागली. शारदेसंबंधानें इंदूला अगोदरच गुणगुण समजली होती आणि आपल्या तोंडचा घास इंदूनें काढून घेतला, हें शारदा आतां प्रत्यक्षच पहात होती; पण मौज ही की, दोघींच्याहि मनांत एकमेकींविषयीं मत्सर असा यत्किंचितहि उत्पन्न झाला नाहीं. शारदा अद्यापिहि वाड्यांतच होती. प्रथम एक-दोन दिवस तिच्याकडे लक्ष देण्यास इंदूला सवड झाली नाहीं; पण तिसऱ्या दिवशीं शारदेची तिनें मुद्दाम गांठ घेतली. आपल्या भवितव्याचा विचार करीत एका कोचावर शारदा बसलेली असतां, इंदिरा तिच्याजवळ गेली आणि सहानुभूतिपूर्वक म्हणाली, "शारदाबाई, तुमची नी माझी मुळीच ओळख नाही, म्हणून मजबरोबर बोलण्याचालण्यास तुम्ही संकोच बाळगीत असाल; पण ओळख करून दिल्यावांचून होत नाहीं! तुमच्या सुखाच्या आड मी आल्यें, असें मला येथे आल्यावर समजलें. खरोखर मला त्याबद्दल फार वाईट वाटतें; पण मी तरी काय करूं. पुष्कळ गोष्टी माणसांच्या हाती नसतात. विवाह हीदेखील त्यांतलीच एक. म्हणून म्हणत्यें माझ्याकडून नकळत घडलेल्या या अपराधाबद्दल मला क्षमा करा." असें म्हणत म्हणत शारदेच्या अगदीं शेजारीं इंदिरा जाऊन बसली; परंतु त्याबरोबर शारदा कोचावरून उठली आणि नम्रतेनें कोचाजवळ उभी राहिली. ती गंभीर स्वरानें म्हणाली, "तुम्ही म्हणतां तें अगदीं खरें. ज्या गोष्टी माणसांच्या हातीं नसतात, त्या घडल्याबद्दल माणसांनी खेद तरी कशाला करावा? मला खरोखर याबद्दल यत्किंचित् देखील वाईट वाटत नाही. तुम्हांला हक्कानें प्राप्त होणारें सौभाग्य मीं जर हिरावून घेतलें असतें, तर माझी सर्वत्र नालस्तीच झाली असती. परमेश्वराची मोठी कृपा म्हणून त्यानें मला त्या पातकापासून अलिप्त ठेवलें. क्षमा मीच तुमची मागितली पाहिजे आणि तेवढ्यासाठींच मी या वाड्यांत राहिलें आहें." हंसत हंसत इंदूनें शारदेचा हात धरला आणि तिला आपल्याजवळ बसवून इंदू म्हणाली, "पण शारदाबाई, जेथें अपराधच घडला नाहीं, तेथें क्षमा तरी मागण्याचें कारण काय?"

शारदा खिन्न स्वरानें म्हणाली, "तुम्ही असें म्हणतां, हें तुमचें सौजन्य; पण खरोखर मी अपराधी आहें. समजून म्हणा अथवा न समजून म्हणा, स्वतःच्या बुद्धीनें म्हणा अथवा परक्याच्या बुद्धीनें म्हणा, मीं तुमचें मन दुखविलें आहे. तुमच्या-

सारख्या साध्वीचें अशा रीतीनें मन दुखविणें, हा मला तर मोठा अपराध वाटतो. तुम्ही या अपराधाबद्दल मला क्षमा केली पाहिजे. इंदिराताई, माझे अपराध पोटांत घालाल ना!" शेवटचे शब्द उच्चारतांना शारदेचे डोळे पाण्यानें भरून आले. इतका वेळ इंदूला शारदेविषयीं विशेष अशी कल्पना नव्हती; पण अशा रीतीनें शारदेनें जेव्हां आपलें अंतःकरण उघडें केले, तेव्हां तिला शारदेची खरी किंमत कळून आली. शारदेला आपल्या हृदयाशीं कुरवाळून इंदू म्हणाली, "शारदाबाई, उगीच मनाला वाईट वाटूं देऊं नका. तुमच्याकडून कांहीं देखील चूक झाली नाहीं, मग क्षमा ती कसली मागतां. आणि तुम्हांला मागावयाचीच असेल, तर त्या दयाघनाजवळ मागा. अहो, तुम्ही आणि मी सारख्याच आहों." हें ऐकून शारदा आपले डोळे पुशीत पुशीत म्हणाली, "त्या दयाघनापुढें तर मी पदरच पसरला आहे; पण तुम्हींहि मला क्षमा केली पाहिजे, माझा अपराध असो वा नसो 'तुला क्षमा केली' असें तुम्ही अंतःकरणापासून म्हणालां, म्हणजे मला मोठें समाधान वाटेल." असें म्हणून शारदा आशाजनक दृष्टीनें इंदूकडे पाहूं लागली. शारदेविषयीं आतां इंदूच्या मनांत पूर्ण आदर उत्पन्न झाला होता. तिचा हात धरून इंदू म्हणाली, "शारदाबाई, तुमचा आग्रहच आहे, म्हणून मी तुम्हांला क्षमा केली, असें म्हणत्यें. जाऊं द्या. हा विषयच आपण सोडून देऊं. आतांपासून आपण सख्ख्या बहिणीप्रमाणें एकमेकींशीं प्रेमानें वागूं म्हणजे झालें. वागाल ना माझ्याशीं या नात्यानें!" शारदेच्या अंतःकरणांत इंदूविषयीं अगोदरच आदर उत्पन्न झाला होता. बहुमूल्य वस्त्राभरणांनीं नटून ज्या-वेळीं इंदूनें वाड्यांत प्रवेश केला होता, त्यावेळी पुष्कळांचें लक्ष शालूपैठणीकडे आणि हिऱ्यामोत्यांच्या दागिन्यांकडे वेधलें होतें; पण शारदा मात्र इंदूच्या एकंदर मुखाकृतीवरून तिचें अंतःकरण शोधीत होती. इंदिरा म्हणजे पावित्र्य, सौजन्य, शालीनता, आणि दक्षतेची जणूं मूस आहे, अशी त्याच वेळीं शारदेची खात्री झाली होती. इंदूनें वरील प्रश्न केल्यावर शारदा म्हणाली, "इंदूताई, तुम्ही मला तुमच्या भगिनीप्रमाणें मानलें, तर तें मी माझें मोठें सुदैव मानीन; पण मी अगदीं दरिद्री आहें, असें समजल्यावर हें नातें तुटावयाचें नाहीं ना!"

इंदू म्हणाली, "शारदाबाई, तुम्ही दरिद्री आहां अशी मला कधीं कल्पना देखील यावयाची नाहीं, आणि तुम्ही देखील तें मनांत आणण्याचें कारण नाहीं. अहो, पुष्कळ दरिद्री श्रीमंत असतात, आणि पुष्कळ श्रीमंत दरिद्री असतात. थोर अंतःकरण आणि समाधानवृत्ति हीच श्रीमंतपणाची खरी लक्षणें होत. तीं दोन्ही तुम्हांला लाभलीं आहेत. मग तुम्हांला दरिद्री कोण म्हणेल! शिवाय लौकिकदृष्टी-

नेंहि तुम्हांला सुखी पहावें, अशी माझी फार इच्छा आहे. माझी एकटीचीच नाहीं, तर त्यांची देखील आहे. एकाद्या सुशील तरुणाबरोबर तुमचा विवाह होऊन तुम्हांला दांपत्यसुखाचा लाभ सतत मिळावा, अशी आम्हां उभयतांची इच्छा आहे. तुमचे आईबाप कोठें आहेत?" इंदिरेचा हा प्रश्न ऐकून शारदेचा चेहरा बराच उतरला; पण तसें इंदूला न दाखवितां ती म्हणाली, "हीं दोन्ही नातीं मी परमेश्वरावर लादलीं आहेत. तोच खरा मायबाप आहे. आतां जन्म देणारे आईबाप कोणीतरी असतील हें खरें, पण जन्मतःच त्यांची आणि माझी ताटातूट झाली आहे, तेव्हां ते कोठें आहेत, हें तरी सांगणार कसें?" शारदेचें हें भाषण ऐकून इंदूच्या अंतःकरणाला चरका बसला. तिला वाटलें, हिचे आईबाप वारले असावेत. ती सहानुभूतिपूर्वक म्हणाली, "तर मग तुमचा मार्ग तुम्हांलाच शोधला पाहिजे. मी असें ऐकत्यें कीं, तुम्ही मुंबईला पुष्कळ दिवस शिकण्यासाठीं राहिलां होतां. त्या वेळीं जर तुम्हीं तुमच्या विवाहासंबंधानें कांही योजना ठरविली असेल अथवा तुमच्याबरोबर विवाह व्हावा म्हणून त्यावेळीं जर कोणीं खटपट केली असेल, तर त्या सगळ्या गोष्टींचा विचार करून तुम्ही आपला मनोदय मला कळवा, म्हणजे मी तुमच्या विवाहाची शक्य तितकी खटपट करीन. अथवा आमच्यावर जर सोंपवाल, तर तुमच्या योग्य असा वर ते शोधतील आणि चांगल्या रीतीनें विवाहसमारंभ पार पाडतील. तुम्ही सुखी झालेल्या पहाव्या, हीच आम्हां उभयतांची इच्छा आहे. लग्न झाल्यावर तुम्हांला आणि तुमच्या पतीला श्रीमंती थाटानें आपला संसार चालवितां येईल, अशीच व्यवस्था करूं." यावर शारदा थोडा वेळ कांहींच बोलली नाही. नंतर शारदा खिन्न स्वरानें म्हणाली, "इंदूताई, मीं सुखी व्हावें, अशी जर तुमची खरोखर इच्छा असेल, तर पुन्हां माझ्या लग्नाची मात्र गोष्ट काढूं नका. या एवढ्या अनुभवावरून मीं जर हा धडा घेतला नाहीं, तर माझ्यांत आणि पशूंत कांहींच अंतर उरणार नाहीं. जें सुख आपल्या नशिबीं नाहीं, तें मिळविण्याची खटपट तरी कशाला करावी? आणि इंदिराताई, प्रत्येकाची सुखाची कल्पनाहि निराळी असते. मला आतां लग्न न करणें, इतकेंच नव्हे तर जनतेशीं कसलाहि संबंध न ठेवणें, हेंच सुखाचें वाटूं लागलें आहे. जेथें जनसंपर्क नसेल तेथें जावें आणि आयुष्याचे दिवस तेथेंच कंठावेत, असें मीं ठरविलें आहे. मीं सुखी व्हावें, अशी जर तुमची खरोखर इच्छा असेल, तर या दृष्टीनें मला साहाय्य करा." शारदेचे हे शब्द ऐकून इंदूच्या अंतःकणांत एकदम आश्चर्य उत्पन्न झालें व तिनें तीक्ष्ण दृष्टीनें शारदेच्या चेहऱ्यावर नजर टाकली. शारदेच्या चेहऱ्यावरील तो शांतभाव पाहून इंदूला शारदेबद्दल अधिक

आदर वाटला. तिच्याशीं पुढें काय बोलावें हें इंदूला मुळींच सुचेना. इंदूनें मग तो विषयच सोडून दिला आणि त्या दोघींच्या इकडच्या तिकडच्या गोष्टी सुरू झाल्या.

* * * *

दादासाहेबांना संस्थानचा अधिकार मिळाल्यामुळें आतां आपलें चंबुगवाळें उचलून अन्यत्र कोठें तरी जावें लागेल, अशी नानासाहेबांची समजूत होती; परंतु हा विषारी सर्प मोकळा सोडण्यापेक्षां आपल्याच कावूंत ठेवणें अधिक चांगलें असें दादासाहेबांना वाटलें व त्यांनीं त्याप्रमाणें नानासाहेबांकडेच दिवाणगिरी सोंपविली होती. हे गृहस्थ मोकळे असल्यावर संस्थानावर एकादें किटाळ आणल्यावांचून राहणार नाहींत, अशा दूरदृष्टीनें नानासाहेबांना आपल्या नौकरींत दादासाहेबांनीं ठेवलें होतें; परंतु या सर्पाच्या जातीच्या दिवाणानें शेवटीं दंश करावयास कमी केलें नाहीं. नीच माणसांवर तुम्ही कितीहि नजर ठेवा अथवा स्वतः तुम्ही कितीहि दक्षतेनें वागा, तरी शेवटी नीच लोकांचींच कारस्थानें सिद्धीस गेलेलीं दिसतात. याचें कारण सिद्धि त्यांच्यापुढें हात जोडून उभी असते, हें नव्हे तर कोणतीहि वाईट गोष्ट सहज साध्य असते, हें होय. घर बांधावयाचें कठिण, पण बांधलेल्या घराला आग लावावयाचें फार सोपें. याच न्यायानें बहुतेक दुष्ट कृत्यें मूर्त स्वरूपास आलेली दिसतात. वास्तविक दादासाहेबांविषयीचें वैर मनांत बाळगण्यास नानासाहेबांना कोणतेंहि कारण नव्हतें; परंतु आपला यांत अत्यंत मानभंग झाला आणि स्वार्थ तर कांहीच साधला नाहीं, या शल्यामुळें नानासाहेबांच्या अंतःकरणास विलक्षण त्रास होत होता. आपला स्वार्थ तर आतां साधत नाहींच, तेव्हां दादासाहेबांचें तरी शक्य तें नुकसान करावें, एवढ्याच उद्देशानें नानासाहेबांनी आपली व्यूहरचना चालविली होती. सूड उगविण्याची त्यांना अत्यंत घाई झाली होती हें खरें, पण कार्य फसूं नये म्हणून ते फार सावधगिरीनें वागत होते आणि त्यामुळें त्यांच्या अकलेची दिवटी पाजळण्यास एका वर्षाच्यापेक्षां थोडे अधिक दिवस लागले. या एका वर्षाच्या अवधीत वत्सलाबाई शारदेसह निराळें बिऱ्हाड करून राहिल्या होत्या आणि दादासाहेब निष्कपटानें शारदेच्या लग्नाची खटपट करीत होते; परंतु शारदेची जन्मकथा विलक्षण आणि स्वतः शारदा विवाहाला अनुत्सुक यांमुळें वर्षभर खटपट करूनहि तिच्या लग्नाचें जुळलें नाहीं. तिच्याबरोबर विवाह करणारास पांच हजार रुपये हुंडा देण्याचें देखील दादासाहेबांनीं ठरविलें होतें; परंतु एवढ्या मोठ्या हुंड्याच्या आशेनें देखील कोणी पुढें आला नाहीं आणि जे कोणी पुढें आले, ते इतक्या वाईट दानतीचे होते कीं त्यांच्याबरोबर शारदेचा विवाह करणें दादासाहेबांनाच आवडलें नाही. या अवधींत

इंदू गरोदर होती आणि तिचे दिवस भरत आल्यामुळें पांडुरंग तिला नेण्यासाठीं विजयगडास आला होता; परंतु इंदूची प्रकृति बरी नसल्यामुळें तिला माहेरीं नेण्याचें त्यानें रहित केलें आणि आईला व यमुनेला विजयगडासच त्यानें बोलावून घेतलें. दिनकर व अन्नपूर्णा या वेळी विजयगडासच होतीं. बालपणापासूनचे तिघे स्नेही आणि तिघी मैत्रिणी एका ठिकाणीं जमल्यामुळें त्या सर्वांचे दिवस मोठ्या आनंदानें चालले होते. जंगलांत फिरावयाला जाणें, वनभोजनास जाणें, जवळपासची पाहण्यासारखी स्थळें पाहणें, असा त्या सर्वांचा क्रम चालला होता. याच वेळी नानासाहेबांचा डावहि रंगांत आलेला असून ते हातांत फांसे खुळखुळावित होते. फांसे फेकण्याच्या संधीची ते मोठ्या उत्सुकतेनें वाट पहात होते. त्या आसुरी आनंदाचा स्वाद घेण्यासाठी ते अत्यंत उतावीळ झाल्यामुळें ती वेळ येतांच त्यानी आपले फांसे फेंकले आणि त्याबरोबर सर्व विजयगड संस्थान त्यांनी हलवून सोडलें!

## प्रकरण अकरावें

# अखेर सर्पानें दंश केला!

शुद्धपक्षाची मध्यरात्र असून सर्वत्र पिठासारखें स्वच्छ चांदणें पडलें होतें. दिवस थंडीचे होते आणि ही थंडी विजयगडासारख्या ठिकाणी चांगलीच जाणवत होती. मध्यरात्र आणि कडक थंडी यामुळें सर्व विजयगडांत नितांत स्तब्धता पसरली होती. दिवसाच्या श्रमपरिहारासाठीं सर्व लोक निद्रादेवीच्या मांडीवर सुखानें झोंप घेत होते. अशा रीतीनें सर्व विजयगड शांततेचा उपभोग घेत असतां, तिकडे आमचे नानासाहेब अद्याप जागेच होते. अंतःकरणांत भयंकर विचार घोळत असल्यामुळें त्यांची छाया चेहऱ्यावर पडली होती आणि तीमुळें ते स्वतःहि बरेच भयंकर दिसत होते. यावेळी ते वत्सलाबाईच्या घरीं आलेले असून दोघेंहि एकाच आसनावर बोलत बसलीं होतीं. नानासाहेबांचा चेहरा भयंकर दिसत होता हें खरें, पण तो वत्सलाबाईना विशेष रुबाबदार दिसावा म्हणून ते प्रयत्न करीत होते आणि वत्सलाबाईना त्याप्रमाणें ते रुबाबदार दिसतहि होते. हा सर्व वत्सलाबाईच्या विषमय डोळ्यांचा भ्रम होय. त्यांच्या डोळ्यांत जर विष नसतें, तर त्यांना नानासाहेबांची केव्हांच ओळख पटली असती; परंतु डोळे, मन आणि हृदय हीं वाईट वासनेच्या विकारानें इतकीं शिथिल झालीं होतीं कीं, बरें-वाईट ओळखण्याइतकें देखील त्यांत

चैतन्य उरलें नव्हतें. वत्सलाबाई आणि नानासाहेब या उभयतांचा जो संबंध होता, तसला संबंध अलीकडच्या युगांत पुष्कळ ठिकाणीं दृष्टीस पडतो आणि मौज कीं, हीं उदाहरणें प्रेमाच्या नांवाखालीं विकलीं जातात! बिचाऱ्या प्रेमाचें यापेक्षां अधिक दुर्दैव तें कोणतें? वास्तविक हा सर्व विषयवासनेच्या उन्मादाचा खेळ असतो. हा उन्माद पुच्छहीन द्विपाद पशूंसाठींच राखून ठेवलेला आहे आणि त्यांच्या जातीबंधूंनीं या उन्मादाला प्रेमाचा कितीहि मुलामा चढविला, तरी त्याला कोणीहि मनुष्य प्रेम म्हणून म्हणणार नाहीं. हा संबंध जर खरोखर प्रेमाचा असता, तर सुशील, सद्विचारी आणि सरळ वर्तनी तरुणावर नानासाहेब जेव्हां आग पाखडण्यास सिद्ध झाले, तेव्हां वत्सलाबाईनीं त्यांचा हात धरला असता, त्यांच्यापुढें पदर पसरला असता आणि नानासाहेबांना त्या अधोगामी वृत्तींपासून मागें परतविलें असतें! पण तिच्या अंतःकरणांत हा विचार उद्भवणार कोठून? सर्व अंतःकरण फक्त एकाच विचारानें तन्मय झाल्यावर तेथें दुसरा विचार प्रवेश तरी कोणच्या द्वारानें करणार? वास्तविक तिचें नानासाहेबांपेक्षां अधिक नुकसान झालें होतें. शारदेबरोबर दादासाहेबांनीं विवाह न केल्यामुळें तिला दादासाहेबांचा राग यायला पाहिजे होता व तिच्या अंतःकरणांत नानासाहेबांपेक्षांहि अधिक सूडबुद्धि उत्पन्न व्हावयास पाहिजे होती; परंतु तिच्या अंतःकरणांत सूडाची कल्पना उद्भवली नाहीं, रागाची लहर उत्पन्न झाली नाहीं आणि विषादाची छायाहि पडली नाहीं! पाशविक विचार तिच्या अंतःकरणांत इतके दाटले होते कीं, तेथें त्याशिवाय दुसरा कोणताहि विचार येणें शक्य नव्हतें. जादुगारानें भारलेल्या मंत्रमुग्ध पुतळीप्रमाणें वत्सलाबाईची अनुकंपनीय स्थिति झाली होती. केवळ पशुवृत्तीसाठीं ती नानासाहेबांची दासीहून दासी झाली होती. कुवासनेची कोण ही उन्मादकता!

वत्सलाबाई अशा रीतीनें नानासाहेबांच्या मुठींत सांपडलेल्या असल्यामुळें नानासाहेबांच्या प्रत्येक म्हणण्यास मान तुकाविण्यावांचून त्यांना दुसरा इलाज उरला नव्हता. नानासाहेबांनीं जो एक नवीन डाव रचला होता, तो आतां अगदीं पुरा होत आला होता; परंतु त्याचें जें काय थोडें शेंपूट राहिलें होतें, तेंच मोठें कठिण होतें. त्यासंबंधानें काय व्यवस्था करावी, हेंच या वेळीं ते ठरवीत होते. आपल्या लाडकीला ते म्हणाले, "वत्सलाबाई, दादासाहेबांच्या कृष्णकारस्थानासंबंधानें आतां तुमची खात्री झाली कीं नाहीं? माझी अशी समजूत होती कीं, दादासाहेब फार मोठे भोळे आहेत; पण ही स्वारी माझ्याहिपेक्षां हुशार असून त्यांनींच माझ्यावर मात केली, हें तुम्ही पाहिलेंच आहे. मला त्याबद्दलहि एवढें वाईट वाटत नाहीं; पण

कोणा चांगल्या मुलाबरोबर तिचा विवाह करण्याचें आमिष त्यांनीं आपणापुढें ठेवून शारदेविषयीं अशी पापवासना मनांत बाळगावयाची नव्हती. तिला मुलीला काय समजतें? तो दिनकर, पांडुरंग आणि दादासाहेब, तिघेहि गुलहौशी, सुंदर, तरुण आणि श्रीमान यांमुळें शारदेचें मन बदललें असल्यास त्यांत कांहीं आश्चर्य नाहीं; पण तिघांनीं निदान नानासाहेबांची भीति बाळगून वागावयाला पाहिजे होतें. ठीक आहे. आतां नानासाहेबांशीं गांठ आहे! वत्सलाबाई, याबद्दल तुम्हांला कांहींच का वाटत नाहीं?"

लांबलचक उसासा टाकून खिन्न स्वरानें वत्सलाबाई म्हणाल्या, "वाईट पुष्कळ वाटतें, पण उपाय काय? संस्थानांतले सगळे लोक त्यांचा पक्ष उचलणार. आपली विचारपूस तरी करायला कोणी आहे का?" वत्सलाबाईचा कोण हा मूर्खपणा! नानासाहेब कांहीं तरी सांगत होते आणि त्या सांगण्यावर वत्सलाबाई खुशाल विश्वास ठेवीत होत्या. प्रत्यक्ष पोटचा गोळा शारदा, तिच्यापेक्षां देखील त्यांना नानासाहेब अधिक विश्वासू वाटले आणि नानासाहेबांनीं जी नवीन इमारत रचण्यास आरंभ केला होता, तीच त्यांना खरी दिसूं लागली. वत्सलाबाई खिन्न झाल्या आहेत, असें पाहून नानासाहेब म्हणाले, "वत्सलाबाई, तुम्ही असा धीर सोडण्याचें मुळींच कारण नाहीं. एवीतेवीं शारदेचें जें नुकसान व्हावयाचें तें झालेंच आहे; मग त्या तिघांना चांगली आठवण राहील अशी शिक्षा करावयाला तरी काय हरकत आहे? झाला तर सांपत्तिक दृष्टीनें त्यांत शारदेचा फायदाच होईल. शिवाय पुण्यामुंबईचा एकादा तरुण गृहस्थ तिच्याबरोबर विवाह करण्यासहि तयार होईल."

वत्सलाबाई अगदीं कातर स्वरानें म्हणाल्या, "पण आपल्या या कृत्यास शारदेची संमति नसली तर?" नानासाहेब यावर किंचित् हंसून म्हणाले, "तुम्हांला काय वेड लागलें आहे! तिची संमति मिळणें शक्य नाहीं आणि त्या संमतीचें कांहीं कारण नाही. तिला फक्त मी योजिलेल्या ठिकाणीं कांहीं दिवस नेऊन ठेवलें म्हणजे झालें. त्या मुदतींत कदाचित् तिचेंहि मन बदलेल, आणि जर तिचें मन बदललें, तर मोठीच बहार होईल. दादासाहेबांना नुसत्या अब्रूलाच मुकून भागणार नाहीं, तर त्याबरोबर सर्व संस्थानहि गमवावें लागेल!" हे शब्द उच्चारतांना नानासाहेबांचा चेहरा बराच भेसूर झाला होता. तो चेहरा पाहून वत्सलाबाईचें मन थरारलें, तरी भीतभीत नानासाहेबांचा हात लडिवाळपणें हातांत धरून वत्सलाबाई म्हणाल्या, "ती लहान पोर इतके दिवस कशी एकांतांत राहील. तिला अद्याप बाहेरचें ज्ञान

देखील माहीत नाहीं." हे शब्द उच्चारतांना वत्सलाबाईंचे डोळे पाण्यानें भरून आले होते; पण पाषाणहृदयी नानासाहेबांना शारदेबद्दल यत्किंचितहि फिकीर नव्हती. त्यांचा मत्सराग्नि आतां इतका विकोपाला गेला होता कीं, स्वतःचें वाटेल तें नुकसान झालें तरी हरकत नाहीं; पण दादासाहेबांची विडंबना ही झालीच पाहिजे, अशी त्यांच्या मनाची तयारी झाली होती. अशा स्थितींत ते शारदेच्या सुखदुःखाचा, तिच्या अब्रूचा आणि तिच्या स्वातंत्र्याचा थोडेच विचार करणार होते! हळूच हंसत हंसत ते म्हणाले, "वत्सलाबाई, शारदेवर तुमचें जितकें प्रेम आहे, त्यापेक्षां एक कांकणभर माझें जास्तच आहे. शिवाय जें काय करावयाचें आहे, तें आपणांस शारदेच्या कल्याणासाठींच करावयाचें आहे. आपला कार्यभाग होईपर्यंत शारदेला एकांतांत रहावें लागेल, हें खरें; पण एकांत म्हणजे कांहीं अंधारकोठडीची शिक्षा नव्हे. ज्यांच्याविरुद्ध आपणांस खटपट करावयाची आहे, त्यांना शारदा कोठें आहे, हें समजलें नाहीं म्हणजे झालें. तिला जेथें ठेवण्याची मीं व्यवस्था केली आहे, ती खरोखरच अत्यंत रमणीय जागा असून तेथें तिला काडीइतकें देखील उणें पडूं नये म्हणून मीं शक्य ती खबरदारी घेतली आहे. चार दिवस हवाफेर करण्यासाठीं शारदा कोठें गेल्यास, त्यावेळीं जितक्या शांतपणें तुम्ही राहिलां असतां तितक्याच शांतपणें आतांहि तुम्हीं राहिलें पाहिजे. आणि तुमचा जर माझ्यावर विश्वास नसेल अथवा माझें हें करणें तुम्हांला पसंत नसेल, तर तसें मला सांगा, म्हणजे मी या भानगडींत मुळींच पडत नाहीं. माझा हा प्रयत्न तुमच्या संतोषासाठीं आहे, एवढें लक्षांत ठेवून काय उत्तर द्यावयाचें तें द्या." असें म्हणून नानासाहेबांनीं विलक्षण दृष्टीनें वत्सलाबाईवर सहज नजर टाकली. नानासाहेबांना नाखुष करणें वत्सलाबाईंना अशक्य झालें. इतकेंच नव्हे, तर यावेळीं वत्सलाबाई गालांतल्या गालांत हंसत आहेत, असें दृष्टोत्पत्तीस आलें. नानासाहेबांशीं आंगलट करून त्या हळूच हंसून म्हणाल्या, "हें काय गडे! मी आपल्याबाहेर का आहें? आपण जें काय कराल, त्याला माझी पूर्ण संमति आहे."

वत्सलाबाईंनीं एवढें आश्वासन दिल्यावर नानासाहेबांचा चेहरा अर्थात् उत्साहित झाला. आपल्या खिशांतून एक कागद काढून तो त्यांनीं वत्सलाबाईच्या हातीं दिला आणि ते हंसत हंसत म्हणाले, "या कागदावर सही करा. आणि हें लक्षांत ठेवा कीं, कसलाहि प्रसंग आला, तरी या कागदांत जो मजकूर लिहिला आहे, त्याला विसंगत असा एक शब्दहि उच्चारूं नका." वत्सलाबाईंनीं मान डोलावली आणि मुकाट्यानें त्या कागदावर सही केली. वत्सलाबाई, तुम्हीं त्या कागदावर मुकाट्यानें

सही केली; पण पुढें त्या कागदानें महाराष्ट्रांतल्या किती व्यक्तींना बोलावयाला लावलें, त्या कागदानें कोण कहर उडविला आणि त्यानें किती लोकांच्या डोळ्यांतून अश्रुपात करविला, याची या वेळीं तुम्हांला मुळींच कल्पना आली नसेल! रात्रीं बेरात्रीं असल्या सैतानांच्या आखाड्यांत तयार होणारे कागद किती भयंकर असतात, हें आतां कोणासहि अनुभवानें समजण्यासारखें आहे. या कागदावर वत्सलाबाईची सही झाल्यावर नानासाहेबांच्या चेहऱ्यावर सैतानी हर्षाच्या लहरी दिसूं लागल्या. नंतर त्यांनी वत्सलाबाईना आपल्याजवळ घेऊन त्यांच्या कानांत ते कांहीं बोलले. या वेळीं वत्सलाबाईचा चेहरा पुन्हां खिन्न झाला; पण त्यांनीं नानासाहेबांच्या म्हणण्यास अनुमति दर्शविली. आतां मात्र नानासाहेबांचा आनंद पोटांत मावेनासा झाला व त्यांतला कांहीं भाग त्यांनीं वत्सलाबाईनाहि दिला. नानासाहेबांनी खिशांतून घड्याळ काढून पाहिलें, तों एक वाजून गेला आहे, असें त्यांना दिसून आलें. त्याबरोबर ते उठले आणि वत्सलाबाईच्या घराच्या मागच्या बाजूला जाऊन कोणाची वाट पाहूं लागले. इतक्यांत त्यांच्यापुढें तीन चार इसम दत्त म्हणून उभे राहिले. त्यांना पाहून नानासाहेब हळूच म्हणाले, "वेळेवर आलां. लागा, उद्योगाला लागा. उजाडलें नाहीं, तों तुम्ही त्या ठिकाणीं पोहोंचावयाला पाहिजे आणि फार सावधगिरीनें सगळें काम पार पडलें पाहिजे. थोडी जरी चूक झाली, तरी देखील मोठा घोटाळा होईल आणि मग आपणां सर्वांवर वाईट प्रसंग येईल, हें लक्षांत ठेवा. या, माझ्या मागून या." असें म्हणून नानासाहेब पुढें चालूं लागले आणि त्यांच्या मागे ते तीन इसम चालले होते. ते जिना इतक्या सावधगिरीनें चढत होते कीं, किंचित् देखील आवाज होत नव्हता. माडीवर गेल्यावर नानासाहेबांनी एका खोलीकडे बोट केलें. त्याबरोबर त्यांच्यांतील एक इसम हळूच खोलीजवळ गेला आणि फार सावधगिरीनें खोलीत प्रवेश करूं लागला.

खोलींत एक बारीक दिवा मिणमिण जळत असून पलंगावर शारदा निश्चिंत मनानें झोंप घेत होती. त्या शुभ्र शय्येवर तिची सुंदर देहलतिका शांतभावामुळें अधिक रमणीय दिसत होती. पांडुरंग विजयगडास आल्यापासून तिच्या मनावर एक निराळाच परिणाम झाला होता. पांडुरंगाचे आध्यात्मिक आणि हिंदुस्थानचें दारिद्र्य घालविण्याचे विचार ऐकून तिला आपणास सत्पुरुषाचीच भेट झाली, असें वाटत होतें. तो बोलूं लागला म्हणजे ती अगदीं तन्मय होत असे. आपण अगदीं चमत्कारिक परिस्थितींत सांपडलों आहों, अशी तिची समजूत होती, आणि त्यामुळें ती बरीच कष्टी असे; परंतु पांडुरंगाचे विचार चार आठ दिवस ऐकावयाला मिळाल्यामुळें

आपणासहि आनंद प्राप्तीचा एक मार्ग मोकळा आहे, असें तिला समजलें आणि तिनें त्या मार्गानें जाण्याचा निश्चयहि केला होता. ती आतां त्यांच्यांतच मिसळून गेली होती. तेहि सहानुभूतिपूर्वक शारदेचा सत्कार करीत व बाहेरचीं प्रेक्षणीय स्थळें वगैरे पाहण्यासाठीं तिलाहि बरोबर घेऊन जात. यामुळें शारदेच्या अंतःकरणांत साहजिक समाधान उत्पन्न झालें होतें आणि त्याचें प्रतिबिंब या वेळीं ती निद्रेंत असतांहि तिच्या मुखावर दिसत होतें. अशा समाधानानें व निश्चित मनानें ती झोंप घेत असतां एक काळदूत तिच्या खोलींत शिरला आणि त्यानें हातरुमालावर एका औषधाचे कांही थेंब टाकून तो शारदेच्या नाकाजवळ मोठ्या युक्तीनें धरला. कार्यभाग होतांच त्यानें दुसऱ्या दोन इसमांना खूण केली. त्याबरोबर ते खोलींत शिरले आणि एका वस्त्रांत शारदेला गुंडाळून घेऊन तिच्यासह ते तेथून कोणीकडे निघून गेले.

इतके दिवस शारदेविषयीं दादासाहेब, पांडुरंग व दिनकर हे तिघेहि उदासीन होते. ती विशेष सौंदर्यसंपन्न आहे व थोडें-फार शिकली सवरलेली आहे, इतकीच त्यांची शारदेसंबंधानें कल्पना होती; परंतु अधिकाधिक परिचय होत गेल्यामुळें त्यांच्या मनांत शारदेविषयीं खरा आदर उत्पन्न झाला. पांडुरंगाचे ते उदात्त विचार ऐकत असतां शारदेची होणारी एकतानता आणि तिला उत्पन्न होणाऱ्या शंका, यांवरून शारदा कोणत्या प्रकृतीची आहे, याची अर्थातच सर्वांना ओळख पटत चालली होती. शारदेचें मन इतक्या लवकर पालटून तिला ऐहिक सर्व सुखें जीं तुच्छ वाटूं लागलीं होतीं, त्याचें कारण तिची परिस्थिति हें होय. जन्मापासून तिच्या मागें विडंबना लागली होती आणि आश्चर्य हें कीं तिचा कोणताहि अपराध नसतां तिच्या मागें विडंबना हात धुवून लागली होती. अशा स्थितींत तिचें मन ऐहिकसुखासंबंधानें विटावें व त्याव्यतिरिक्त सुखाचा शोध तिनें करावा, यांत विस्मयासारखें कांहींहि नाहीं. शारदेची वृत्ति बदलून ती जेव्हां पांडुरंगाकडून हळुहळू अध्यात्मविषयाची माहिती मिळवूं लागली व स्वतःच्या प्रेरणेनें त्या विषयाशीं तिनें जेव्हां तादात्म्य करून घेतलें, तेव्हां पांडुरंग वगैरे सर्वांना तिच्याविषयीं सहाजिक आदर वाटूं लागला. पांडुरंगाची तर अशी देखील समजूत झाली कीं, शारदा ही योगभ्रष्ट आहे, व तिचे पूर्वजन्मीचे राहिलेले कांहीं संस्कार पुरे करण्यासाठीं तिनें हा जन्म घेतलेला आहे. तसें नसतें तर तिची अध्यात्मविषयाशीं एवढ्या लवकर इतकी एकतानता झाली नसती, असें पांडुरंग म्हणत असे. सारांश, पंधरा-वीस दिवसांच्या अवधींत त्या सर्वांना शारदा आपल्या भगिनीप्रमाणें आदरणीय वाटूं लागली होती. दादासाहेबांचा अर्थातच यामुळें

मोठा गोंधळ झाला होता. कोणातरी सुशील तरुणाबरोबर शारदेचा विवाह करावा, अशी त्यांनीं खटपट चालविली होती; परंतु आपणास विवाह करणें नाहीं, असें हळूच युक्तीनें शारदेनें इंदूजवळ सुचविलें होतें. एके रात्रीं शारदेच्या विवाहाच्या काळजीनें त्यांना चांगली झोंप देखील आली नाहीं. पहांटेच्या सुमारास त्यांना झोंप लागली; पण त्या झोंपेंत त्यांना स्वप्नांत शारदा पुनः दिसूं लागली. डोंगराळ मुलूख, भयंकर जंगल आणि श्वापदांची गर्दी, अशा ठिकाणीं आपण हिंडण्यासाठीं आलों आहों, असें दादासाहेबांना स्वप्नांत दिसूं लागलें. पर्वताच्या एका उंच शृंगासमोर दादासाहेब उभे असून त्या शृंगाकडे ते विशेष लक्षपूर्वक पहात होते. त्या शृंगाच्या शिखरावर त्यांना एक सुंदर मंदिर दृष्टीस पडलें आणि मंदिराच्या जवळ कांहीं ऋषि बसलेले आहेत असेंहि त्यांच्या दृष्टीस पडलें. ते जेथें उभे होते, तेथून भोंवतालचा सर्व प्रदेश त्यांना भयप्रद दिसत होता. मोठमोठाले जलस्रोत कड्यावरून उड्या घेत असल्यामुळें जो धो धो असा नाद होत होता, त्यामुळें त्यांच्या छातींत धडकी भरली होती. तसेच दूरवर व्याघ्रसिंहादि हिंस्र पशु उभे असून ते आपणाकडे टवकारून पहात आहेत, असेंहि त्यांना दिसून आल्यामुळें ते फार भिऊन गेले होते. तें समोर असलेलें पर्वताचें शिखर मात्र मनोहर व आश्रयास योग्य असें त्यांना वाटलें व म्हणून ते त्यावर चढण्याचा प्रयत्न करूं लागले; पण तो त्यांचा प्रयत्न यशस्वी झाला नाहीं. कारण त्यांना वर चढण्याचा मार्गच सांपडेना. एक–दोन ठिकाणीं त्यांनीं चढण्याचा प्रयत्न केला; पण वर चढतां न आल्यामुळें त्यांचा नाइलाज झाला. इतक्यांत एका वाघानें एका कड्यावरून उडी मारली आणि तो दादासाहेबांच्या रोंखानें येऊं लागला. आतां मात्र दादासाहेब फारच घाबरले, आणि कोणत्या रस्त्यानें पळावें, याचा ते विचार करूं लागले. इतक्यांत शारदा त्यांना तेथें दिसली. पायांत खडावा आहेत, अंगांत भगवी कफनी आहे आणि आपला केशभार माग पाठीवर मोकळा सोडला आहे, असा तो शारदेचा वेष पाहून दादासाहेबांना विलक्षण विस्मय वाटला. धांवत येणाऱ्या वाघाकडे आपलें बोट उगारून शारदा तीव्र स्वरानें म्हणाली, "दुष्टा, मागें फीर. येथें तुझी सत्ता नाहीं. येथें परमेश्वरी साम्राज्य आहे. येथला न्यायाचा तराजू न्यायदेवतेच्या हातीं आहे. तुझ्यासारख्या हिंस्र पशूच्या हातीं नाहीं. जा, आपल्या त्या झोटींग पाच्छाईंत जा, आणि ज्या शेळ्यामेंढ्यांना तुझ्यासारखीं तीक्ष्ण नख नाहींत, त्यांच्यावर खुशाल जुलूम गाजीव." शारदेचे हे शब्द ऐकून त्या वाघानें बराच संताप व्यक्त केला, आणि तेथूनच तो परत फिरला. हा प्रकार पाहून दादासाहेबांना फार आश्चर्य वाटलें. शारदा

नंतर दादासाहेबांकडे पाहून म्हणाली, " तुम्हीं या वाघाला ओळखलें नाहीं? हा वाघ तुमच्या परिचयाचा आहे. तो आतां पिसाळला आहे, आणि तुमचा सर्व नाश करण्यासाठीं तो वाटेल तें करण्यास तयार झाला आहे; पण इकडे तो येऊं शकणार नाहीं." असें म्हणून शारदा त्या सुंदर शिखरावर चढूं लागली. दादासाहेब पुनः त्या शिखराजवळ गेले आणि शारदेला म्हणाले, " शारदे, तूं या शिखरावर भराभर चढून जात आहेस आणि मला मुळींच चढतां येत नाहीं. असें कां?" शारदेला हंसूं आलें. ती म्हणाली, ' लोखंडाचे चणे खाल्ल्यावांचून ब्रह्मपदावर नाचावयाला मिळत नाहीं. मला जन्मापासून तोच खुराक होता. तुमच्याहि वांट्याला ते चणे आतां आले आहेत, आणि ते तुमच्या पोटांत बरेचसे गेले, म्हणजे या शिखरावर तुम्हांस चढतां येईल. जा, आतां तुम्ही घरीं जा.' असें म्हणून शारदा शिखरावर चढूं लागली आणि दादासाहेब घराच्या मार्गाला लागले. एका डोंगराची उतरण उतरून ते खालीं आले नाहींत, तोंच तो वाघ पुन्हां त्यांना दिसला. त्या वाघाला पाहून दादासाहेब झोपेंत दचकले आणि जागे झाले. ते जागे झाले होते, तरी त्यांच्या चेहऱ्यावर तीं भितीचीं चिन्हें कायमच होतीं. दिवाणखान्यांत इकडे तिकडे फिरून अंतःकरणांत निष्कारण उत्पन्न झालेली भीति त्यांनीं घालविली आणि एका आराम खुर्चीवर पडून ते त्या स्वप्नाचा विचार करूं लागले. शारदेच्या विवाहासंबंधानें आपण जो विचार करतों, त्यामुळें हें स्वप्न आपणास पडलें, अशी त्यांनीं आपल्या मनाची समजूत केली आणि तो विचार करण्याचेंच त्यांनीं सोडून दिलें. रोजच्याप्रमाणें स्नान करून व गीतेचा पाठ संपवून ते कचेरींत येतात, तों नानासाहेब म्लानमुख करून बसलेले त्यांना दिसले. नानासाहेबांनीं लवून नमस्कार केल्यावर दादासाहेब म्हणाले, "नानासाहेब, आज अगदीं सकाळीं कां आलां? कांहीं कमजास्त आहे कीं काय?" नानासाहेब घाबरलेल्या आवाजांत म्हणाले, " काल रात्रींपासून शारदेचा कांहीं पत्ता नाहीं. तिच्या आईनें मजकडे निरोप पाठविला, तेव्हां ही गोष्ट आपणास प्रथम कळवावी, असें वाटल्यावरून आपणाकडे एवढ्या सकाळीं आलों. काल रात्रीं ती जेऊन निजली, एवढें तिच्या आईला माहीत आहे. रोजच्याप्रमाणें सकाळीं शारदा उठली नाहीं, असें पाहून ती तिच्या खोलींत गेली; पण तेथें शारदा तिला दिसली नाहीं. खोलीचें दार आणि मागच्या बाजूचीं सर्व दारें उघडीं असून शारदेला विशेष आवडणारीं पुस्तकेंहि घरांत नाहींत, हें पाहून ती फार घाबरली आहे. तिच्या शोधासाठीं मीं चार दोन माणसें पाठविलीं आणि मग आपणाकडे आलों. "नानासाहेबांनीं सांगितलेली ही हकीकत ऐकून दादासाहेबांना जितकें वाईट वाटलें, तितकाच

विस्मयहि वाटला. त्यांना जर तें स्वप्न पडलें नसतें, तर शारदेच्या नाहींसें होण्यांत कांहीं अर्थ आहे, अशी त्यांना कल्पना देखील आली नसती; परंतु तें स्वप्न आणि ही बातमी या दोन गोष्टी जवळ जवळ एकाच वेळीं घडून आल्यामुळें त्यांच्या अंतःकरणांत अनेक प्रकारच्या विचारांच्या लहरीमागून लहरी उत्पन्न होऊं लगल्या. क्षणभर तर ते अगदीं स्तब्ध बसले होते. दादासाहेबांचा हा स्तब्धपणा पाहून नानासाहेबांच्या पोटांत मात्र धसूधस् होत होतें. दादासाहेबांना आपला तर संशय आला नाहीं ना, अशा भीतीनें नानासाहेबांनीं आपले तीक्ष्ण डोळे त्यांच्या चेहऱ्यावर रोंखले होते. थोडा वेळ विचार केल्यावर दादासाहेब म्हणाले, "तुम्हीं तिच्या शोधाला माणसे पाठविलीं आहेतच, तरी आणखी चार पांच घोडेस्वारांना शोध करण्यासाठीं पाठवा आणि पुण्यास व मुंबईस तिच्या ओळखीच्या गृहस्थांना पत्रेंहि पाठवा. चार दोन दिवसांच्या आंत तिचा जर शोध लागला नाहीं, तर पुढें काय करावयाचें, तें आपण उभयतां ठरवूं." नम्रपणें मान हलवून नानासाहेबांनीं नमस्कार केला आणि ते निघून गेले.

याच वेळीं विजयगड संस्थानांत मोठा आनंदोत्सव चालला होता. इंदिरा प्रसूत होऊन तिला मुलगा झाल्यामुळें सर्वांना अर्थातच फार आनंद झाला होता, आणि त्या आनंदोत्सवांत बहुतेक संस्थान गर्क असतां नानासाहेबांनी शारदेची उचलबांगडी केली होती. शारदेच्या पलायनामुळें इतरांच्या आनंदोत्सवांत कांहीं कमतरता आली नाहीं; पण खास दादासाहेबांचा मात्र बराच उत्साहभंग झाला. हळुहळू हें वर्तमान सर्वत्र समजलें व शारदेविषयीं जिकडे तिकडे अनेक प्रकारची चर्चा सुरू झाली. गांव तेथें महारवाडा या न्यायानें खुद्द विजयगडला दादासाहेबांचे कांहीं निंदक होतेच व त्यांनीं शारदेच्या या पलायनाची एक निराळीच कादंबरी रचली होती. यमुना, अन्नपूर्णा, पांडुरंग, दिनकर व दादासाहेब यांना मात्र शारदेची खरी काळजी वाटत होती व तिला शोधण्यासाठीं दिनकरानें कांहीं गुप्त व्यवस्थाहि केली होती. एकेक दिवस म्हणतां म्हणतां एक महिना झाला, तरी शारदेचा शोध लागला नाहीं. वत्सलाबाई इतके दिवस विजयगडालाच होत्या, परंतु आतां त्यांनीं पुण्यास जाण्याचें ठरविलें व जाते वेळीं त्यांची व दादासाहेबांची मुलाखतहि झाली. शारदा ज्याअर्थी तुमच्या संस्थानांत नाहींशी झाली आहे, त्याअर्थी तिचा शोध लावण्याची जबाबदारी तुमच्यावर आहे, असें वत्सलाबाईनीं दादासाहेबांना स्पष्ट कळविलें होतें. वत्सलाबाईच्या या म्हणण्यांत कांहीं विशेष अर्थ आहे, असें दादासाहेबांना वाटलें नाहीं. पण आणखी एक महिना झाल्यावर शारदेच्या अंतर्धानाचें निराळेंच स्वरूप दादासाहे-

बांच्या दृष्टोत्पत्तीस आलें. या वेळीं दिनकर व पांडुरंग एल्‌एल्‌.,बीच्या परीक्षेसाठीं मुंबईस गेलेले असून दादासाहेब एकटेच विजयगडला होते. एके दिवशीं सायंकाळच्या सुमारास टेबलावर पडलेलें टपाल चाळीत असतां, पुण्यास प्रसिद्ध होणाऱ्या, पण बाहेर ठिकाणीं अप्रसिद्ध असलेल्या एका वर्तमानपत्राचा ताजा अंक सहज वरवर पाहिला, तों त्यांत आरंभींच मोठाल्या अक्षरांतला ' विजयगड संस्थानांतील अंधाधुंदी ' हा मथळा त्यांच्या दृष्टीस पडला. त्याबरोबर त्यांचे डोळे तीक्ष्ण झाले व ते फार काळजीपूर्वक त्या लेखावर नजर फिरवूं लागले.

"विजयगड संस्थानच्या तरुण अधिपतीच्या उल्लूपणासंबंधानें आजवर आमच्या कानावर अनेक कागाळ्या आल्या आहेत; परंतु तरुण संस्थानिक लवकरच आपलें वर्तन सुधारतील या समजुतीनें आम्ही आजवर मौन स्वीकारलें होतें. पुष्कळ संस्थानांतून जे घाणेरडे प्रकार दृष्टीस पडतात, त्याचीच पुनरावृत्ति हल्लीं विजयगड संस्थानांत निघाली आहे, अधिकार आणि श्रीमंति हीं दोन्ही हत्यारें संस्थानिकांच्या हातीं असल्यामुळें त्यांचीं अनेक कृष्णकारस्थानें अर्थातच झांकलीं जातात. असें असतांही जेव्हां एकादें पापकृत्य डोके वर काढतें, तेव्हां त्या कृत्याचें खरें स्वरूप फारच विशाल, ओंगळ व भयंकर आहे, असें खुशाल समजावें. विजयगडच्या संस्थानिकांसंबंधानें आम्ही आतां जें विधान करणार आहों, तें खोटें ठरल्यास त्यांत आम्हांला आनंदच आहे; परंतु तें खोटें ठरेल असें मात्र आम्हांस वाटत नाहीं. एका अनाथ व विधवा वत्सलाबाई नांवाच्या स्त्रीला शारदा या नांवाची अत्यंत देखणी व तरुण मुलगी आहे, असें संस्थानिक दादासाहेब यांना समजल्यावरून त्यांनीं शारदेबरोबर विवाह करण्याचें आमिष वत्सलाबाईला दाखवून तिला तिच्या मुलीसह विजयगडला सुमारें वर्ष दीड वर्षापूर्वीं आणून ठेवलें. या मुदतींत शारदेबरोबर दादासाहेबांनी विवाह न करतां आपल्याच वाड्यांत ठेवलें होतें. इतकेंच नव्हे, तर त्यांनी या मुदतीत दुसऱ्या एका मुलीबरोबर विवाहहि केला. शारदेच्या विवाहाची आशा नाहींशी झाल्यामुळें वत्सलाबाईनें मुलीसह पुण्यास जाण्याचें ठरविलें; परंतु त्या अवधींत एके रात्रीं शारदेला पळविल्याचें वत्सलाबाईला आढळून आलें. अपत्य प्रेम आणि अब्रु यांमुळें वत्सलाबाईनें मुलगी परत मिळावी म्हणून संस्थानिकांची पुष्कळ मनधरणी केली; परंतु संस्थानिकांस तिची दया न येतां त्यांनीं तिला संस्थान सोडून जाण्याची आज्ञा केली. बिचारी निमूटपणें विजयगड सोडून पुण्यास निघून आली. आपली पंधरा सोळा वर्षाची मुलगी कोणत्या उपायानें या बाईला परत मिळेल, हें जर कोणी कायदे सल्लागार तिला कळवील, तर तिजवर

फार उपकार होतील. यासंबंधानें स्वतः वत्सलाबाईनें जी हृदयाद्रावक हकीकत कळविली आहे, ती त्यांच्याच सहीनें दुसरीकडे छापली आहे. त्यावरून संस्थानांत अद्यापीहि कसे गोंधळ होतात, याची कल्पना कोणासहि येईल."

पत्रकर्त्याचे हे स्फुट विचार वाचून आश्चर्य आणि उद्वेग हीं दोन्ही एकाच वेळीं दादासाहेबांच्या अंतःकरणांत उत्पन्न झालीं. क्षणभर ते अगदीं विचारशून्य झाले होते. नंतर त्याच वर्तमानपत्रांत असलेलें वत्सलाबाईचें पत्र त्यांनीं वाचून पाहिलें. त्यांतहि त्याच अर्थाचा मजकूर होता. पण शब्द मात्र अधिक करुणाजनक होते. दादासाहेबांना प्रथम असें वाटलें कीं, या मूर्ख पत्रकर्त्यास कोर्टांत खेंचावें; पण तसें केल्यास एका क्षुद्र मनुष्याला निष्कारण महत्त्व दिल्यासारखें होतें, असा विचार करून त्यांनीं फिर्यादीचा विचार रहित केला. दिनकर व पांडुरंग यांना ती हकीकत कळवावी असें त्यांनीं ठरविलें; पण परीक्षेच्या गर्दीत या असल्या गोष्टी त्यांना कळविणें श्रेयस्कर नाहीं, असा विचार करून दादासाहेबांनीं शेवटीं गप्प राहण्याचें ठरविलें. नानासाहेब अलीकडे आपणाबरोबर अगदीं निरुपद्रवीपणानें वागत आहेत, अशी त्यांची समजूत झाली होती; परंतु वर्तमानपत्रांतला तो लेख वाचल्यावर त्यांनीं नानासाहेबांचें पुनः तीक्ष्ण दृष्टीनें निरीक्षण सुरू केलें व या कृत्यांतहि त्यांना नानासाहेबांचा जबरदस्त संशय येऊं लागला. असें करण्यांत नानासाहेबांचा काय हेतु असावा, हें त्यांनीं पुष्कळ शोधून पाहिलें; पण ती सांखळी त्यांना जोडतां येईना. दादासाहेब असा विचार करीत आहेत, तोंच खुद्द नानानाहेबांचीच स्वारी त्यांच्यापुढें येऊन उभी राहिली. इकडचे तिकडचे औपचारिक चार-दोन प्रश्न झाल्यावर नानासाहेब चिंतायुक्त स्वरानें म्हणाले, "संस्थाननें वत्सलाबाईला जो आश्रय दिला होता, त्याचा तिनें अगदीं दुरुपयोग केला असें दिसतें."

हे शब्द ऐकून नानासाहेबांचा अधिकच संशय दादासाहेबांना आला; तथापि तसें न दर्शवितां ते शांतपणें म्हणाले, "कशावरून?" हा प्रश्न ऐकून नानासाहेबांनीं आपल्या खिशांतून एक पत्र काढलें आणि मोठ्या गंभीर स्वरानें ते म्हणाले, "तिनें मला जें एक खाजगी पत्र लिहिलें आहे, त्यावरून ती मोठी विलक्षण स्त्री असावी असें दिसतें." असें म्हणून नानासाहेबांनीं पुण्याहून वत्सलाबाईकडून आलेलें पत्र दादासाहेबांच्या हातीं दिलें. तें वर वर पाहून दादासाहेब आश्चर्यानें म्हणाले, "हें काय? शारदेला मीं कांहीं वाईट हेतूनें पळविलें? आणि त्या बाबतींत तुम्हीं मला साहाय्य केलें? मोठें आश्चर्य म्हणावयाचें? मला ही कांहींच भानगड माहीत नाहीं. हा आरोप त्यांनीं तुम्हांला खाजगी पत्र लिहून कळविला आहे, तेव्हां तुम्हीच काय

तें त्यांना पत्रोत्तरानें कळवा. मजवर जेव्हां त्या स्वतः आरोप करतील, तेव्हां त्यांना काय उत्तर द्यावयाचें तें मी देईन." यावर थोडा वेळ स्तब्ध राहून नानासाहेब म्हणाले, "पण 'वृत्तविनोद' पत्रांत वत्सलाबाईंनीं एक पत्र लिहून आपणावर उघड आरोप केला आहे."

दादासाहेब आश्चर्यानें म्हणाले, "वृत्तविनोद! तें काय आहे?" नानासाहेबहि विस्मयदर्शक स्वरानें म्हणाले, "वृत्तविनोद हें एक पुण्यास निघणारें प्रसिद्ध वर्तमान-पत्र आहे. त्यांत त्यांनीं स्पष्ट लिहिलें आहे. आणि त्या पत्राच्या संपादकानें थोडीशी टीका केली आहे."

"हें वर्तमानपत्र प्रसिद्ध दिसतें खरें. निदान तें यापुढें तरी प्रसिद्धीस येईल असें दिसतें. या पत्राला तुमचा उदार आश्रय दिसतो. विजयगडांत हें पत्र फक्त तुमच्या-चकडे येतें असें दिसतें. कृपा करून त्या पत्राचा तेवढा अंक पाठवाल का?" या प्रश्नाचें नानासाहेबांकडून उत्तर मिळण्यापूर्वींच दादासाहेब म्हणाले, "नको. अंक पाठविण्याचें कांहीं कारण नाहीं. असल्या मूर्खाच्या बडबडीकडे लक्ष देण्यापेक्षां दुर्लक्ष केलेलेंच चांगलें. शिवाय ज्या पत्राचें मीं कधीं नांवहि ऐकलें नाहीं, त्या पत्राची भीति बाळगण्याचेंहि कारण नाहीं. एवढें मात्र खरें कीं पुढील भीत्युत्पादक नाटकाची ही नांदी दिसते. नानासाहेब, या नाटकाशीं तुमचा कांहीं संबंध आहे, असें मी म्हणत नाहीं; पण वत्सलाबाई आणि नानासाहेब या व्यक्ति दोन आहेत, असें मात्र समजण्यास मी तयार नाहीं."

या प्रकरणाशीं आपला संबंध आहे, हें दादासाहेबांच्या ध्यानांत आलेलें पाहून नानासाहेब किंचितहि घाबरले नाहींत. त्यांचा बहुतेक डाव पूर्णतेस आलेला असल्या-मुळें आपलें खरें रूप प्रकट करण्यास कांहीं हरकत उरली नाहीं, असें नानासाहेबांना या वेळीं वाटलें. ते न घाबरतां शांतपणें म्हणाले, "पण आपण असें म्हटल्यानें आपणावरची जबाबदारी कांहीं कमी व्हावयाची नाहीं. उलट आपणच शारदेला पळविलें, असा जो लोकांत संशय पसरलेला आहे, तो मात्र दृढ होईल." दादासा-हेबांनींहि या वेळीं शांतरूपच धारण केलें. ते म्हणाले, "समजलों. लोक म्हणजे बदमाष लोक! सुशील जनता नव्हे! असल्या लोकांनीं संशय घेतला आणि तो तुम-च्यासारख्यांनीं कितीहि दृढ केला, तरी सज्जनांना भिण्याचें कारण नाहीं. संस्थानचें अन्न खाऊन यापेक्षां अधिक चांगला उद्योग तुम्हांला करतां आला नाहीं, हें तुमचें दुर्दैव. माझें नाहीं. शारदेबरोबर लग्न न केल्यामुळें तुम्ही मागेंच मला एकादें राज-

द्रोहाचें यज्ञकुंड पेटवून त्यांत ढकलून देणार होतां; पण तो प्रयत्न न साधल्यामुळें आतां या घाणेरड्या डबक्यांत ढकलण्याची तुम्हीं तयारी केलेली आहे. ठीक आहे! आम्हीहि तयारच आहों. नानासाहेब, तुमच्या मागें केवढीहि प्रचंडशक्ति असली, तरी एवढें लक्षांत ठेवा कीं, ईश्वरी आणि जनतेचें पाठबळ माझ्याच वांटणीला आलें आहे आणि त्यामुळें माझ्या जवळचें समाधान तुम्हांला कोणत्याहि स्थितींत काढून घेतां येणार नाहीं. मला माझ्यापेक्षां शारदेबद्दल वाईट वाटतें. तिची तुम्हीं कांहींतरी विलक्षण दुर्दशा केली असावी, असा मला आतां जबरदस्त संशय येतो. महाराष्ट्रांतल्या या बदललेल्या वातावरणाचा फायदा घेण्यास जोंपर्यंत तुमच्यासारख्या सत्पुरुषांची कमतरता नाहीं, तोंपर्यत अशा अनेक साध्वी स्त्रियांचा आणि सज्जनांचा छळ महाराष्ट्रानें निमूटपणें सोसला पाहिजे!"

नानासाहेबांची कृत्रिमवृत्ति आतां अधिकाधिक वाढत चालली होती. हिंसेनें त्यांचें अंतःकरण विलक्षण भडकलें होतें; तरी ते शांत स्वरानें म्हणाले, "आपण आमचे यजमान आहां, श्रीमंत आहां, सत्ताधीश आहां, आणि विजयगडचे सगळे लोक तुम्हांला अनुकूल आहेत. तेव्हां तुमच्या म्हणण्याला प्रत्युत्तर देणें मला शक्य नाही. याउप्पर मी दिवाणगिरीच्या कामावर राहणें उभयतांसहि श्रेयस्कर नाहीं, हें उघड दिसतें. तेव्हां मी आपली रजा घेतों आणि आपणहि मला परवानगी द्यालच." नानासाहेबांच्या म्हणण्यास दादासाहेबांनीं कांहीं उत्तर दिलें नाहीं. ते आपल्या खुर्चीवर स्वस्थ पडून राहिले होते. नानासाहेबांनींहि उत्तराची वाट पाहिली नाहीं आणि ते तसेच किंचित् रोषानें तेथून निघून गेले. नानासाहेब निघून गेल्यावर दादासाहेबांच्या अंतःकरणांत अनेक विचारांचें विलक्षण आंदोलन होऊं लागलें. नानासाहेबांशीं इतकें स्पष्ट न बोलतां मौन स्वीकारलें असतें, तर तें अधिक श्रेयस्कर झालें असतें, असें त्यांना वाटूं लागलें. परंतु हांतांतला बाण निघून गेल्यावर त्यासंबंधानें अनुताप दर्शविण्यांतहि कांहीं अर्थ नसतो. झालें तें झालें. पण पुढें आतां काय व्यवस्था करावी, हें ठरविण्यास दादासाहेबांना बराच त्रास पडला. घडलेली सर्व हकीगत त्यांनीं दिनकर व पांडुरंग यांची परीक्षा संपल्यावर त्यांना कळविली आणि त्यांचें काय म्हणणें पडतें, याची ते वाट पाहूं लागले.

वरील गोष्टीस चार दोन दिवस झाले नाहींत, तोंच वत्सलाबाईंची फिर्याद पुण्याच्या फौजदारींत दाखल झाली आणि ती गोष्ट वर्तमानपत्रांतून जगजाहीर झाली. एका तरुण मुलीची चोरी आणि तीहि वाईट हेतूनें; असा या फिर्यादींत

दादासाहेबांवर आरोप असून शिवाय दिनकर व पांडुरंग या दोघांनीं त्या बाबतींत दादासाहेबांना साहाय्य केलें, असा त्या दोघांवर आरोप केला होता. या फिर्यादीचीं सूत्रवाक्यें वर्तमानपत्रांतून प्रसिद्ध होतांच साऱ्या महाराष्ट्रांत याच एका विषयाची जोरानें चर्चा सुरू झाली. अलीकडे दादासाहेबांनीं विजयगड संस्थानांत अनेक लोकोपयोगी सुधारणा घडवून आणल्यामुळें आणि त्या बाबतीत त्यांना दिनकर व पांडुरंग यांनीं चांगलें साहाय्य केल्यामुळें हे तिघेहि महाराष्ट्रांत सुप्रसिद्ध झाले असून महाराष्ट्राचेंहि त्यांच्यावर विलक्षण प्रेम जडलें होतें. अशा तीन स्वार्थत्यागी, सरळ व बाणेदार तरुणांवर ही घाणेरड्या आरोपाची फिर्याद झाल्यामुळें साऱ्या महाराष्ट्राचें लक्ष तिकडे वेधलें आणि अनेक पूर्वानुभवांवरून या फिर्यादीचींहि महाराष्ट्रांस दुःस्वप्नें पडूं लागलीं. ही फिर्याद जरी गरिब व विधवा वत्सलाबाईनें केली होती, तरी तिच्या पाठीशीं नानासाहेबांसारख्या कोण कोण व्यक्ति आहेत, हें जनतेस माहित असल्यामुळें पुढें मिळण्याऱ्या न्यायाच्या बाबतींत त्यांचीं मनें आजच साशंक व्हावींत, यांत कांहीं अव्यवहार्य असें नाहीं. जनतेनें वर्तविलेल्या भविष्याप्रमाणें या फिर्यादीनें प्राथमिक चवकशीनंतर विशाल स्वरूप धारण केलें आणि तीन न्यायाधीशांचें कमिशन नेमलें जाऊन पुढील चवकशीस आरंभ झाला. उभयपक्षांचे जवळ जवळ शंभर साक्षीदार कमिशनरापुढें आले व त्या सर्वांच्या जाबजबान्यांवरून फिर्यादीचा अखेर निकाल होण्यास तीन महिने लागले. न्यायाधीशांनीं एकंदर साक्षीपुराव्यावरून खालीं लिहिल्याप्रमाणें अनुमान काढलें.

शारदा ही अत्यंत सुंदर व तरुण असल्यामुळें तिच्याविषयीं वाईट बुद्धि प्रथमपासूनच दादासाहेबांनीं मनांत बाळगलेली दिसते. तिच्याबरोबर आपण लग्न करतों असें सांगून तिला त्यांनीं स्वतःच्या वाड्यांत आणून ठेविलें आणि त्या वेळीं ते तिच्याशीं असभ्यपणानें वागले, असें पुराव्यानें सिद्ध झालें आहे. दादासाहेबांपासून आपलें संरक्षण व्हावें म्हणून प्रयत्न करीत असतां, शारदेच्या कपाळाला मोठी जखम झाली, ही गोष्टहि पुढें आली आहे. दादासाहेबांनीं यानंतर दुसऱ्या एका मुलीबरोबर लग्न केलें असतांहि शारदा व तिची आई वत्सलाबाई, या दोघींना त्यांनीं विजयगड येथून जाऊं दिलें नाहीं. या बाबतींत जो पुरावा पुढें आला आहे, त्यावरून दादासाहेबांनीं आपल्या वजनाचा दुरुपयोग करून त्या दोघींना राहणें भाग पाडलें असें दिसतें. शारदेचें दुसऱ्या कोणाबरोबर लग्न करण्याची खटपट आपण करीत आहों, असें त्यांनीं सर्वांना भासविलें होतें; परंतु असें करण्यांत दादासाहेबांचा वाईट हेतु होता, असेंच गृहित धरावें लागतें. शारदेला ते भूलथाप मारून

बाहेर हिंडण्यासाठीं वगैरे नेत असत, ही गोष्ट दादासाहेबांनींच कबूल केली आहे. त्यांत आपला कांहीं वाईट हेतु नव्हता, असें दादासाहेबांचें म्हणणें आहे, परंतु एकंदर गोष्टींचा विचार करतां या म्हणण्यावर विश्वास ठेवतां येत नाहीं. साक्षदार नंबर चार, पांच आणि सहा यांच्या साक्षी फार महत्त्वाच्या असून त्या तिघांचें म्हणणें खरें असावें असें वाटतें. अक्टोबर महिन्यांत दिवाळीच्या सणाच्या गडबडींत दादासाहेबांनीं शारदेला पळविलें. तिला त्यांनीं सुमारें एक महिनाभर विजयगडापासून चार कोसांवर असलेल्या एका जंगलांतल्या घरांत कोंडून ठेवलें होतें, हें चार व पांच नंबरच्या साक्षीदारांनीं शपथेवर सांगितलें आहे आणि आपणास कांहींच माहिती नाहीं, असें या बाबतींत दादासाहेबांचें म्हणणें आहे. ते यापुढील सर्वच गोष्टी नाकारीत आहेत; पण सहा नंबरचा साक्षीदार शारदेला त्या घरांतून दुसरीकडे दादासाहेबांनीं ठेवल्याचें सांगतो. दादासाहेबांचा व शारदेचा जो पत्रव्यवहार पुढें आला आहे, तो दादासाहेबांच्या विरुद्धच आहे. हा पत्रव्यवहार बनावट आहे, असें दादासाहेबांचें म्हणणें आहे; परंतु अक्षर तपासनिसाच्या साक्षीवरून तीं पत्रें बनावट नाहींत, असें सिद्ध झालें आहे. या बाबतींत दादासाहेबांना दिनकर व पांडुरंग यांचें साहाय्य होतें कीं काय, हें आतां पहावयाचें आहे. त्या तिघांचा खाजगी संबंध काय आहे, हें आम्हांस पहावयाचें नसून आमच्यापुढें जो पुरावा आला, त्या दृष्टीनेंच याचा विचार करावयाचा आहे. दिनकरचा संबंध पुसट पुसट दिसतो आणि म्हणून संशयाचा फायदा त्यास देऊन निर्दोषी ठरवितों. पांडुरंग आणि दादासाहेब यांनीं मात्र शारदेला पळविलें, असें गृहित धरावें लागतें. मनुष्याची चोरी हा भयंकर अपराध आहे, आणि त्या अपराधास शिक्षाहि भयंकर आहे, परंतु शारदेला पळविलें असूनहि खास तिचा अद्यापि शोध नसल्यामुळें या बाबतींत निकाल देणें मोठें कठिण झालें आहे. तथापि संस्थानिक या नात्यानें दादासाहेबाचा या प्रकरणांशीं जो संबंध स्पष्ट झाला आहे, तेवढ्यावरून आम्ही असा अभिप्राय व्यक्त करतों कीं, संस्थानचा कारभार चालविण्यास दादासाहेब अयोग्य आहेत. आणखी पांच वर्षांनीं त्यांचें वर्तन सुधारल्याचें आढळून आल्यास त्यांच्या हातीं संस्थानचीं सूत्रें द्यावींत. तोंपर्यंत त्यांच्या अज्ञान मुलाचे नांवानें कारभार चालावा व त्या मुलाचे पालक म्हणून माईसाहेबांची नेमणूक व्हावी. दादासाहेबांनीं या पांच वर्षांच्या मुदतींत विजयगड येथें मुळींच राहूं नये. विजयगडशिवाय अन्य कोठेंहि त्यांनीं रहावें व त्यांना एकंदर खर्चासाठीं म्हणून दरमहा तीनशें रुपये देण्याचें आम्ही ठरवितों. पांडुरंगराव यांच्यासंबंधानें आम्ही असें ठरवितों कीं, त्यांनीं आणखी पांच वर्षेपर्यंत कोणत्याहि कोर्टांत वकिली करतां कामा नये!

कमीशनरानीं वरील आशयाचा अखेरचा निकाल ज्या दिवशीं प्रसिद्ध केला, त्या दिवशीं सर्व विजयगड उद्वेगानें उदासीन दिसलें. विजयगड शहरानें इतकें औदासीन्य यापूर्वी कोणत्याहि प्रसंगीं प्रकट केलें नाहीं, असें त्या दिवशीं सर्वांच्या अनुभवास आलें. या प्रकरणीं न्याय झाला कीं, अन्याय झाला, हें आमच्या वाचकांना स्पष्ट करून सांगण्याचें प्रयोजन दिसत नाहीं; परंतु त्या वेळीं वर्तमानपत्रांतून या खट-ल्याची साद्यंत हकीगत जेव्हां प्रसिद्ध झाली, तेव्हां झाला हा न्याय योग्यच झाला असें पुष्कळ त्रयस्थांना वाटलें. यावरून नानासाहेब हा केवढा असामान्य बुद्धिमत्तेचा मनुष्य होता व त्यानें ही खोटी इमारतहि कशी बेमालूम रचली होती, याचें सहज अनुमान होतें. नानासाहेब विजयी झाल्याबद्दल त्यांची पाहिजे तर शिफारस करा, अथवा निंदा करा; पण असल्या नीच व्यक्तींना अलीकडच्या युगांत केवढें दांडगें सामर्थ्य प्राप्त झालें आहे, याकडे मात्र कोणीं दुर्लक्ष करतां कामा नये. ज्या दिवशीं हा निकाल झाला, त्या दिवशीं नानासाहेब विजयोत्साहानें बेहोष होऊन गेले होते व विजयगडांतून ते मोठ्या थाटानें बाहेर पडणार होते; पण सर्व नागरिक आपणांवर विलक्षण संतापलेले आहेत, असें पाहून नानासाहेबांना अंधाऱ्या रात्रीं अंगावर काळी घोंगडी घेऊन स्टेशनाचा रस्ता सुधरावा लागला.

दादासाहेबांना विजयगड सोडण्याची लवकरच तयारी करावी लागली. पांडुरंग व दादासाहेब या दोघांनींहि सोमगडावर जाऊन राहण्याचें ठरविलें होतें व पांडुरंगानें आगाऊ सोमगडास जाऊन त्यांची स्वतंत्रपणें राहण्याची व्यवस्थाहि केली होती. निघ-ण्याची वेळ होतांच इंदिरा आणि दादासाहेब यांनीं माईसाहेबांचा आणि आपल्या नूतन अर्भकाचा जेव्हां निरोप घेतला, तेव्हां तो सर्व वाडा आक्रंदन करीत आहे, असेंच वाटलें. दादासाहेबांनीं आईची पुष्कळ समजूत केली; परंतु शेवटीं माईसाहेब मोठ्यानें हंबरडे फोडीत असतांनाच त्यांना वाड्याच्या बाहेर पडावें लागलें. वाड्याच्या बाहेर पडतात, तोंच नगरवासी लोकांनीं त्यांचा मार्ग अडविला. दादासाहेबांची गांठ पुनः केव्हां पडते आणि केव्हां नाहीं, या समजुतीनें कित्येकांनीं त्यांच्यावर पुष्पवृष्टि केली, कित्येकांनीं त्यांच्या गळ्यांत पुष्पहार घातले आणि कित्येकांनीं नुसताच अश्रुपात केला. नगरवासीयांनीं अश्रुपात केलेल्या जमिनीवरून दादासाहेबांना स्टेशनापर्यंत आपलें प्रत्येक पाऊल टाकावें लागलें. या एकाच गोष्टीवरून दादासाहेबांसाठीं नगरवासीयांना किती दुःख झालें, याचें कोणसहि अनुमान करतां येईल. नानासाहेब, हा एवढा अश्रुपात तुमच्या अंतःकरणांतल्या एका लहानशा निर्घृण लहरीनें झाला, हें मनांत आलें, म्हणजे तुमचें सबंध अंतःकरण काय करूं शकेल, याची कल्पनाहि करवत नाहीं आणि

महाराष्ट्राला नानासाहेब तरी एकटेच लाभले आहेत का ? तर तसेंहि नाहीं. शताधिक नानासाहेब महाराष्ट्राची सत्वपरीक्षा पहात आहेत, अशा स्थितींत गरिब बिचाऱ्या महाराष्ट्राची स्थिति अनुकंपनीय व्हावी, यांत कांहीं मोठेंसें आश्चर्य नाहीं!

## प्रकरण बारावें

# मांत्रिकाचे उपचार!

रात्रीच्या वेळीं वत्सलाबाईच्या घरांतून तीन चार इसमांनीं शारदेला उचलून नेलें हें आमच्या वाचकांना माहीत आहेच. यानंतर शारदेचें काय झालें, तें आतां आपणास पाहिलें पाहिजे. खुद्द शारदेचा शोध न लागल्यामुळें न्यायाधीशांचा न्याय देतांना कसा घोंटाळा झाला, हें वाचकांना आठवत असेलच. कायदेपंडितांच्या दृष्टीनें शारदेचा शोध लागल्यावांचून हा खटलाच चालवितां येऊं नये, असें म्हणणें पडलें; परंतु अशा प्रसंगीं अनेक कायदे पुस्तकांतल्या पुस्तकांतच कसे पडून राहतात, हें आतां सर्वांना माहीत झालें आहे. दादासाहेब व पांडुरंग या दोघांवर त्या वेळीं एवढें किटाळ आलें होतें, तरी स्वतःपेक्षां शारदेचीच काळजी त्यांना विशेष वाटत होती. वत्सलाबाईचा पक्ष शारदेचा शोध लावण्याच्या बाबतींत पूर्ण बेफिकीर आहे, हें जेव्हां त्यांच्या अनुभवास आलें, तेव्हां या लोकांनीं शारदेला कोठें तरी अडकून ठेवलें असावें, अथवा तिला यांनीं जगांतून नाहींसें केलें असावें, असें देखील पांडुरंग व दादासाहेब यांना वाटूं लागलें. शारदेची अशी दुर्दशा करण्यास नानासाहेब कारण असल्यामुळें त्यांना नानासाहेबांचा फार राग आला; पण राग येऊन उपयोग काय ? नानासाहेबांना या संबंधानें शासन करण्यास ते दोघेहि असमर्थ असल्यामुळें तो राग त्यांना आंतल्याआंत गिळावा लागला. शारदेची माहिती पांडुरंग व दादासाहेब यांना नव्हती यांत कांहीं मोठेंसें नाहीं; पण आश्चर्य हें कीं, ज्या नानासाहेबांनीं दूर जंगलांत असलेल्या एका ओसांड घरांत शारदेला ठेवलें होतें, त्याच नानासाहेबांना 'शारदा कोठें ?' म्हणून वत्सलाबाईनें जेव्हां विचारलें, तेव्हां नानासाहेब निरुत्तर झाले आणि शारदेबद्दल त्यांना कांहींच सांगतां आलें नाहीं. शारदेच्या अदृश्यतेवर सर्व इमारत नानासाहेबांना रचावयाची असल्यामुळें त्यांनीं तिला अर्थातच फार बंदोबस्तानें ठेवलें होतें. ती तेथून बाहेर पडल्यास आपला सगळा डाव विस्खळला जाईल; इतकेंच नव्हे, तर आपल्या फजितीस पारावार उरणार नाहीं, हें नाना-

साहेब जाणून असल्यामुळें प्रसंगविशेषीं शारदेच्या मानेवर सुरी फिरविण्यापर्यंत देखील नानासाहेबांनीं आपल्या मनाची तयारी करून ठेविली होती. अशा स्थितींत ठेवलेल्या ठिकाणीं शारदा नाहीं, असें जेव्हां नानासाहेबांना आढळून आलें, तेव्हां प्रत्यक्ष भयानें ज्यांना भ्यावें, ते नानासाहेब देखील घाबरले आणि त्यांचें राक्षसी काळीज थरारलें. नानासाहेबांनी शारदेचा अत्यंत सावधगिरीनें पुष्कळ शोध केला व करविला; परंतु त्यांना ती कोठेंहि सांपडली नाहीं. इतके दिवस सर्व गोष्टी त्यांच्या मनाप्रमाणें होत गेल्यामुळें ते मोठ्या तोऱ्यानें वागू लागले होते; परंतु शारदा अदृश्य झाल्या दिवसापासून नानासाहेबांच्या मुखावर चिंतेची छाया दिसूं लागली आणि आपल्या कपट-नाटकाचा स्फोट शारदा करील की काय, असा त्यांना हृद्रोग जडला. आतां नानासाहेबांचा प्रत्येक दिवस काळजींत जाऊं लागला आणि वत्सलाबाईच्या डोळ्यांतलें विष नाहींसे झाल्यामुळें त्याहि नानासाहेबांकडे तिरस्कारानें पाहूं लागल्या.

पुणें आणि विजयगड यांमध्यें जी एक लहानशीच पण दाट झाडांनी किर्र अशी डोंगरांची रांग पसरली आहे, त्या डोंगरांच्या एका दरींत रायवळ आंब्यांचीं दाट झाडें असून त्या झाडींत एक लहानसें घर आहे. हें घर आतां जाऊन पाहिल्यास बरेंच मोडकळीस आलेलें दृष्टीस पडेल; परंतु ज्या वेळी ही गोष्ट घडून आली, त्या वेळी हें घर बऱ्या स्थितींत असून तेथेंच नानासाहेबांनी शारदेला ठेवण्याची व्यवस्था केली होती. कोणास केव्हांहि पत्ता लागणार नाहीं, अशा ठिकाणीं हें घर केव्हां, कोणी व कशाकरितां बांधलें होतें आणि अशा एकांतांत असलेल्या घराचा नानासाहेबांनीं कसा शोध लावला होता, हें कळण्यास आतां कांहीं मार्ग नाहीं; पण एवढें खरें कीं, तें घर नानासाहेबांना माहीत होतें आणि तेथें त्यांनीं शक्य तितक्या बंदोबस्तानें शारदेला ठेवलें होतें. हें घर जेथें आहे तेथून जवळपास गाडी-रस्ता किंवा एकादें खेडेगांव देखील नाहीं. या घराकडे एक पाऊल-वाट मात्र गेलेली आहे; पण त्या वाटेवर वापर नसल्यामुळें ती गवत वगैरे उगवून अगदीं पुसट झालेली आहे. या घराच्या भोंवतालची जागा व आंतील भाग यांकडे विशेष लक्ष पुरविल्यास एखाद्या एकांतप्रिय महात्म्यानें तें घर बांधलें असावें, असें अनुमान निघतें. शारदा आपल्या खोलींत रोजच्याप्रमाणें निजलेली असतां, तिला तेथून कशा रीतीनें नानासाहेबांनीं हलविलें हें आमच्या वाचकांच्या लक्षांत असेलच; बेशुद्ध होण्यापूर्वी झोपेंत असतांना शारदेला एक स्वप्न दिसत होतें.

मनाला आल्हाद देणाऱ्या एका वनप्रदेशांत एक सुंदर ओढा वहात असून त्याच्या कांठीं असलेल्या एका दगडावर ती बसलेली असून तिनें आपले पाय खळ-

खळ वाहणाऱ्या पाण्याच्या धारेंत धरले आहेत, असें तिला प्रथम स्वप्नांत दिसलें. पाण्याच्या ओघानें तिचे पाय धुवून निघत होते आणि त्यामुळें तिला मोठी मौज वाटत होती. ओढ्याच्या दुसऱ्या बाजूला एक आंब्याचें झाड असून त्याच्या छाये-खालीं दादासाहेब, इंदिरा, पांडुरंग आणि यमुना अशीं चौघें बोलत बसलीं आहेत, असें तिला दिसलें. तीं आपणास बोलावीत आहेत, असें शारदेला वाटल्यावर शारदा त्या दगडावरून उठली आणि त्यांच्याकडे जाऊं लागली. इतक्यांत एकाएकी मोठा पाऊस सुरू झाला आणि तो अगदीं लहान दिसणारा ओढा फूं करून दुथड्या भरून वाहूं लागला. शारदेला त्या ओढ्यांतून पलीकडे जातां आलें नाहीं आणि अलीकडेहि निघतां आलें नाहीं. पाण्याच्या एका लाटेसरशीं ती ओढ्यांत आडवी झाली आणि वाहूं लागली. पाण्याच्या लाटांवरून ती वाहूं लागली; पण तिला भीति वाटली नाही. शांतपणें ती पाण्यावर हेलकावे खात होती. शारदा पाण्यांत पडली, असें पाहून दादासाहेब तत्क्षणीं उठले आणि इंदिरा वगैरे नको नको म्हणत असतां त्यांनी शारदे-साठीं पाण्यांत उडी फेकली. आतां तो ओढा एकाद्या सागराप्रमाणें अथांग दिसूं लागला. दादासाहेबांनी पाण्यांत उडी फेंकतांच त्यांच्या मागून इंदिरा आणि इंदिरे-मागून पांडुरंग व यमुना यांनी पाण्यांत उड्या फेंकल्या. आतां पाण्यांत या पांच इसमांची एक मालिकाच वहात आहे, असें शारदेस दिसलें; प्रचंड खळखळाटांत असूनहि सर्व शांत व गंभीर आहेत असे शारदेला दिसलें. ती म्हणाली, "दादासाहेब, मला काढण्यासाठीं तुम्हीं कशाला पाण्यांत उडी फेंकली? मी याच रस्त्यानें आपल्या केंद्रस्थानाकडे जाणार आहें. तुम्ही परत जा. माझी तुम्ही काळजी करूं नका. तुम्ही सर्व परत जा." दादासाहेब परत न फिरतां म्हणाले, "शारदे, तुला अशा स्थितींत सोडून गेल्यास सगळे लोक माझी निंदा करतील. तूं जिकडे जाशील, तिकडे आम्ही सर्व येतों. तुला संकटांत टाकून आम्ही जाणार नाही." दादासाहेब असें म्हणत आहेत, तोंच दूर दिसणाऱ्या एका टेकडीवर एक साधुपुरुष शारदेला दिसला आणि तो आपणां सर्वांस बोलावीत आहे, असें तिला वाटलें. ती त्या अनुरोधानें पाण्यांतून जेव्हां जाऊं लागली, तेव्हां तें सर्व पाणी ओसरून गेलें आणि जिकडे तिकडे उद्यानभूमि तिला दिसूं लागली. तिनें मागें वळून पाहिलें, तों दादा-साहेब वगैरे आपल्या मागून येत आहेत, असें तिला दिसलें. ज्या टेंकडीवर तो साधुपुरुष उभा होता, त्या टेंकडीवर शारदा भराभर चढून जाऊं लागली. दादासाहेब वगैरेहि चढूं लागले; परंतु तितक्यांत दादासाहेबांचा पाय निसटला आणि ते टेंकडी-वरून खालीं गडगडले! हें पाहून शारदा त्या स्वप्नांत मोठ्यानें ओरडण्याचा

प्रयत्न करूं लागली; परंतु त्यापूर्वी एक निमिषार्ध तिच्या नाकाजवळ विषार्कांचा रुमाल धरल्यामुळें ती बेशुद्ध झाली होती. तिच्या खोलींत जे चार धाटिंगण शिरले होते, त्यांनीं तिला तसेंच उचललें आणि वर सांगितलेल्या ओसाड घरांत आणून ठेवलें. शारदा जेव्हां शुद्धींत आली, तेव्हां जरी सर्वत्र लख्ख उजेड पडला होता, तरी आपण त्या स्वप्नसृष्टींतून आतांच जागे होत आहों, असें तिला वाटलें. डोळे उघडून तिनें जेव्हां सभोंवार नजर टाकली, तेव्हां तिच्या विस्मयाला सीमा राहिली नाहीं. आपण आपल्या खोलींत नसून भलत्याच ठिकाणीं आहों, हें तिला स्पष्ट दिसून आलें; पण त्या स्पष्ट दिसण्यावरहि तिचा विश्वास बसेना. आपण आपल्या पलंगावर नसून एका लहानशा बिछान्यावर आहों आणि भोंवतालची जागा बरीच अस्वच्छ आहे, हें पाहून तिच्या अंतःकरणांत साहजिक भीतीहि उत्पन्न झाली. तिच्या मनाचा असा गोंधळ झाल्यावर ती आंथरुणावरून उठली आणि एका खिडकीजवळ जाऊन उभी राहिली. खिडकींतून तिला बाहेरचा भाग विशेष दिसेना; परंतु भोंवतालीं आंब्याचीं दाट झाडें आहेत व त्यांच्या पलीकडे डोंगर आहेत, हें मात्र शारदेला स्पष्ट दिसून आलें. अखेर लवकरच तिची खात्री झाली कीं, जंगलांत असलेल्या एका लहानशा घरांत आपण आहों. ती दाराजवळ जाऊन दार उघडूं लागली; परंतु तें बंद आहे, असें पाहून तिनें दारावर थाप मारली. त्याबरोबर दार उघडलें जाऊन एक नौकरी पेशाचा इसम तिच्यापुढें येऊन उभा राहिला. तो अदबीनें म्हणाला, "आपणास काय पाहिजे?" शारदा प्रथम कांहींच बोलली नाहीं. ती क्षणभर स्तब्ध उभी होती. नंतर खिन्नतेनें म्हणाली, "हें घर कोणाचें, आणि येथें मी कशी आल्यें, हें तुम्हांला माहीत आहे?" शारदेचा हा प्रश्न ऐकून तो इसम म्हणाला, "तें मला कांहीं माहित नाहीं. तुम्हांला येथें आज सकाळीं आणून ठेवलें आहे आणि तेव्हांपासून मी व आणखी एक इसम तुमच्या देखरेखीसाठीं आहों. येथें जितकी तुमची बरदास्त ठेवतां येईल, तितकी ठेवण्याविषयीं आम्हांला हुकूम आहे. तेव्हां तुम्हांला कांहीं पाहिजे असल्यास मला सांगा म्हणजे मी तें तुम्हांला आणून देतों." हा काय प्रकार आहे, हें शारदेला कांहींच कळेना. ती म्हणाली, "येथून विजयगड किती लांब आहे?" तो इसम हाताचीं बोटें मोडीत म्हणाला, "सतरा अठरा कोस." इतक्या लांब आपणास कोणीं आणून ठेवलें आणि कां आणून ठेवलें हे प्रश्न शारदेच्या अंतःकरणांत उत्पन्न झाले; परंतु त्याचीं उत्तरें तिला मिळालीं नाहींत. त्या इसमाला शारदेनें पुष्कळ प्रश्न केले, परंतु त्याच्याकडून समाधानकारक माहिती न मिळाल्यामुळें शारदेला या

नव्या परिस्थितीचा कांहींच बोध होईना. इतकें मात्र तिला कळून आलें कीं, या घरांत आपण बंदिवानाप्रमाणें आहों व येथून कोठेंहि जाणें आतां शक्य नाहीं. तिची तरतूद तेथें यथातथाच ठेवली होती; पण शारदेला कोणतीहि चैनीची चटक नसल्यामुळें तिनें त्या व्यवस्थेबद्दल केव्हांहि आपल्या मनाशीं देखील कुरकुर केली नाहीं. आपणास नानासाहेबांकडूनच हा तुरुंगवास प्राप्त झाला आहे, हें तिच्या तेव्हांच लक्षांत आलें; पण तिच्या अंतःकरणांत नानासाहेबांविषयीं राग उत्पन्न झाला नाहीं. उलट एक प्रकारें नानासाहेबांनीं आपणावर हे उपकारच केले, असें शारदेला वाटलें. अलीकडे एकांतवासाच्या कल्पना तिच्या अंतःकरणांत विशेष घोळत होत्या व एकांतांत आपण राहिल्यास आपलें कसें होईल, अशी तिला थोडी काळजीहि वाटत होती. मनाची अशी गुंतागुंत झालेली असतां एकांताचा अभ्यास करण्यासाठीं नानासाहेबांनीं अशी संधि आणून दिली, हे तिला नानासाहेबांचे उपकारच वाटले. नानासाहेबांचे उपकार वाटण्याचें दुसरें कारण हें कीं, गीता वगैरे जीं पुस्तकें शारदेला विशेष आवडत होतीं, त्या पुस्तकांचें गांठोडेंहि शारदेच्या आंथरुणाजवळच होतें. कैदखाना म्हणून ज्या घरांत शारदेला आणून ठेवलें होतें, तें घर शारदेला तुरुंगाप्रमाणें न वाटतां साधूच्या मठाप्रमाणें वाटलें व तिला त्या एकांतांतच मोठी मौज वाटूं लागली. आपला हा एकांत दादासाहेबांचें अहित करणारा आहे, हें लक्षांत येऊन मात्र केव्हां केव्हां ती उदासीन होत असे. हळुहळू शारदा एका विजयगडालाच काय, पण सर्व जगाला विसरली आणि त्या मठांतच आपलें सर्वस्व आहे, असें समजून परमेश्वरचिंतनांत काळ घालवूं लागली. सुमारें अडीच तीन महिने त्याच घरांत शारदा होती. त्या एकांतांत तिचें ईश्वरचिंतन चाललें असतां अंतःकरणांतल्या अगदीं खोल जागीं कसली तरी आकांक्षा उत्पन्न होत आहे आणि तिचें समाधान करण्यासाठीं कोणा तरी महात्म्याची गांठ घ्यावी, असें तिला वाटूं लागलें. अंतःकरणांत खऱ्या समाधान-वृत्तीचें बीजारोपण करणारे महात्मे अलीकडच्या काळांत क्वचित् दृष्टीस पडतात, हें तिला माहीत होतें; पण पर्वताच्या दऱ्याखोऱ्यांतून हिंडल्यावर एकादा तरी महात्मा आपणास दर्शन देईल, अशी तिच्या मनाची भावना झाली होती. चित्तावर एकसारखे तेच विचार घोळत असल्यामुळें एके रात्रीं ती दचकून जागी झाली. 'ऊठ, हीच संधि आहे. जा, महात्म्याच्या शोधाला येथून दुसरीकडे जा.' असें कोणीं कानांत गुणगुणत आहे, असें तिला वाटलें. दरवाजा बंद असेल, पहाऱ्यावर कोणी असतील; वगैरे कोणतीहि शंका या वेळीं शारदेच्या अंतःकरणाला शिवली नाहीं. तिनें आपलें पुस्त-

कांचें गांठोडें हातांत घेतलें, अंगावरून धाबळी घेतली आणि ती तेवढ्या रात्रीं घराच्या बाहेर पडण्याचा प्रयत्न करूं लागली. दार बंद असेल अशी तिची समजूत होती; पण दाराच्या दोन्हीहि फळ्या मोकळ्या आहेत, हें पाहून तिला मनस्वी आश्चर्य वाटलें. बाहेर स्वच्छ चांदणें पडलें होतें आणि त्या चांदण्यांत जो प्रकार तिच्या दृष्टीस पडला, तो पाहून तर ती विस्मयानें थक्क होऊन गेली. दोघेहि पहारेकरी निश्चेष्ट पडलेले असून त्यांच्याजवळ रक्ताचें थारोळें सांचलें होतें. शारदा जेव्हां त्या दोघांजवळ गेली, तेव्हां एक तर तिला मेलेलाच दिसला आणि दुसरा तळमळतांना दिसला. तो क्षीण स्वरानें 'पाणी पाणी' असें विवळत होता. शारदेला त्याची दया आली व ती तशीच आंत गेली. तिनें एका भांड्यांत पाणी घेतलें आणि तें त्याच्या तोंडांत ओतलें. पोटांत पाणी गेल्यावर त्याला किंचित् हुशारी आली आणि तो डोळे उघडून शारदेकडे पाहूं लागला. शारदेनें जेव्हां त्याला 'तुला काय झालें' म्हणून विचारलें, तेव्हां तो मोठ्या कष्टानें म्हणाला, 'रात्री वाघ आला होता.' झालें. एवढेच शब्द त्याच्या तोंडांतून बाहेर पडले आणि त्यानेंहि प्राण सोडला. या प्रकाराबद्दल शारदेला जितकें आश्चर्य वाटलें, तितकेंच तिला दुःखहि झालें. त्यांच्या मृत्यूस आपणच कारण झालों, असें तिला वाटलें आणि विषण्णतेनें ती मार्ग आक्रमूं लागली. मार्ग म्हणजे गाडीरस्ता नव्हता किंवा पाऊल-वाटहि नव्हती, तर तिचे पाय जिकडे जातील तिकडे ती चालली होती. सगळा दिवसभर ती त्या भयंकर डोंगराळ प्रदेशांतून चालली होती. सायंकाळच्या वेळी ती अगदीं थकल्यामुळें एका झाडाखाली बसून विश्रांति घेऊं लागली आणि ती रात्र तिनें तेथेंच काढण्याचें ठरविलें. भुकेनें तिचा प्राण अगदीं व्याकूळ झाला होता; पण तिच्याजवळ खाण्यासारखी कोणतीच वस्तु नसल्यामुळें तिला उपाशीच निजावें लागलें. ती बरीच थकलेली असल्यामुळें तिचें अंग जमिनीला लागतांच तिला गाढ झोंप लागली. गाढ झोंपेचा अम्मल संपल्यावर पहांटेच्या सुमारास पुन्हां स्वप्नसृष्टींत शारदा सांपडली. दूर, अगदीं दूर अंतरावर एक पर्वतशिखर असून त्या शिखरावर एक मंदिर आहे, असें शारदेला स्वप्नांत दिसूं लागलें. त्या मंदिराच्या अनुरोधानें ती चालली होती; परंतु तिकडे जाण्यासारखा सोपा मार्ग तिला दिसेना. जिकडे नजर फेंकावी तिकडे तिला खोल दऱ्या दिसत होत्या. त्या दऱ्या ओलांडून मंदिराकडे जाणें कठिण असल्यामुळें शारदा निराश झाली आणि एका दगडावर खिन्न होऊन बसली. इतक्यांत पूर्व रात्री ज्या साधूनें तिला स्वप्नांत दर्शन दिलें होतें, तोच महात्मा तिला या स्वप्नांत दिसूं लागला. आपणाकडे तो शांत भावानें पहात असून

गभीर वाणीनें तो आपणास बोलावीत आहे, असें तिला दिसलें. याच वेळीं शारदेचा तंद्राभंग झाला आणि ती डोळे चोळीत इतस्ततः पाहूं लागली. पाहते तों खरोखरच एक महात्मा तिच्या दृष्टीस पडला. डोक्यावर लहानसा जटाभार, पांढरीशुभ्र दाढी, गोरा, सतेज व गंभीर चेहरा, तेजस्वी पण शांत डोळे, अंगावर भगवी कफनी, एका हातांत उंच काठी, दुसऱ्या हातांत कमंडलू, खांद्यावर टाकलेली पांढरी घोंगडी आणि पायांत खडावा; अशा वेशांतल्या त्या महात्म्याला पाहून आपण स्वप्नांत तर नाहीं ! अशी शारदेला शंका आली आणि ती पुनःपुन्हां डोळे चोळून त्या महात्म्याकडे पाहूं लागली. शारदेची ती संशयास्पद स्थिति पाहून त्या महात्म्याला हंसूं आलें. आपणाकडे येण्याविषयी शारदेला त्यानें हातानें खूण केली. जरी रात्रभर झोंप मिळाली होती, तरी सगळा दिवस डोंगराळ प्रदेशांतून चालल्यामुळें अजूनहि तिचे पाय दुखत होते आणि तेथें तसेंच बसून आणखी विश्रांति घ्यावी असें शारदेला वाटत होतें; पण त्या महात्म्यानें खूण करतांच शारदेच्या अंगांत नवें बळ संचारलें आणि ती त्याच्याजवळ जाऊन उभी राहिली. शारदा जवळ आल्यावर आपली प्रेमळ व शांत दृष्टि तिच्यावर टाकून तो साधु म्हणाला, "भिऊं नकोस. माझ्या मागून ये." शारदेनें त्यांना प्रणाम केला आणि ती निमूटपणें त्यांच्या मागून जाऊं लागली. लवकरच दोघेहि एका ओढ्याच्या कांठीं गेले. त्या साधूनें एका झाडाखालीं बिऱ्हाड ठेवून शारदेला स्वस्थ विश्रांति घेण्यास सांगितलें आणि तो स्वतः स्नान वगैरे करूं लागला. बराच वेळ ध्यान-धारणेंत घालविल्यावर त्यांनीं आपल्या कमंडलूंतून कांहीं कंदफळें बाहेर काढलीं आणि त्यांतून बरीच शारदेला देऊन बाकीचीं त्यांनी स्वतः खाल्लीं. तेथें थोडा वेळ विश्रांति घेतल्यावर त्यांनीं पुन्हां प्रवासाची तयारी केली. ते गोड स्वरानें शारदेला म्हणाले, "मुली, मला माहित आहे, तूं फार थकली आहेस; पण आपणांला कांहीं फार लांब जावयाचें नाहीं. जवळच एक खेडें आहे, तेथें आपण रात्रभर राहूं आणि सकाळीं मग पुढें निघून जाऊं;" यावर शारदा कांही बोलली नाहीं. ओढ्याच्या कांठीं चांगला आराम मिळाल्यामुळें आणि क्षुधाहि शांत झाल्यामुळें ती बरीच ताजीतवानी झाली होती आणि त्या महात्म्याला पाहिल्यापासून तिच्या चित्तवृत्तींतहि विलक्षण बदल झाला होता. आपणास खरा मार्गदर्शक मिळाला, इतके दिवस आपण जें शोधीत होतों, तें आपणास सांपडलें; या समजुतीनें ती विलक्षण उत्साहित झाली होती. तुम्ही कोण आहां आणि मला कोठें नेत आहां, हा प्रश्न त्या महात्म्याला पाहून तिच्या अंतःकरणांत उद्भवला देखील नाहीं. तिनेंहि आपलें गांठोडें उचललें आणि

त्यांच्या मागून ती जाऊं लागली. सायंकाळच्या सुमारास दहावीस झोंपड्यांचें एक खेडें त्यांना लागलें. त्या महात्म्याचा एक शिष्य त्या खेड्यांत असल्यामुळें त्यानें त्या दोघांना दूध वगैरे फराळासाठी देऊन रात्रभर निजण्यासहि चांगली जागा दिली. शारदेला तेथें रात्रभर चांगली विश्रांति मिळाल्यामुळें तिला अधिक उत्साह वाटूं लागला. दुसऱ्या दिवशी ती त्या महात्म्याबरोबर त्यांच्या राहण्याच्या ठिकाणीं जाऊन पोहों-चली. हें ठिकाण म्हणजे गांवांतलें घर किंवा मोकळ्या हवेंतला बंगला नसून पर्वता-वर असलेल्या शिखरांत कोरलेली गुहा होती. त्या शिखराच्या पायथ्याला एकंदर सात गुहा कोरलेल्या असून, गुहांच्या समोरच त्या पठारावर एक मोठें तळें होतें. तें अत्यंत रमणीय, प्रशांत व पवित्र स्थान पाहून शारदा तहानभूक देखील विसरून गेली. तेथें कशा रीतीनें रहावयाचें व क्षुधा कोणकोणत्या कंदमूळावर भागवाव-याची हें शारदेला समजून त्याचा कांहीं दिवस तेथें तिला अभ्यास झाल्यावर शारदा सर्व कांहीं विसरली आणि तेथेंच मोठ्या आनंदानें राहूं लागली.

शारदा अशा रीतीनें नाहींशी झाल्यामुळें नानासाहेबांना अर्थातच तिचा कांहीं शोध लागला नाहीं. शारदेचा शोध न लागल्यामुळें नानासाहेबांना नुसती भीति वाटत होती; पण दादासाहेब व पांडुरंग यांना तिच्याबद्दल काळजी वाटत असून पुष्कळ दिवस तिचा पत्ता न लागल्यामुळें त्यांना तिच्यासंबंधानें अनेक शंका येत होत्या. दादासाहेब आणि पांडुरंग या दोघांनीहि आपला मुक्काम आतां सोमेश्वर नांवाच्या गांवीं ठेवला होता. एलएल. बी.च्या परीक्षेंत पांडुरंग जरी पास झाला होता, तरी पुढें वकिलीच्या धंद्यांत आयुष्य खर्च करण्याचा त्याचा प्रथमपासूनच विचार नव्हता. हिंदुस्थानच्या दारिद्र्यासंबंधानें त्याच्या अंतःकरणांत नेहमीं विचार घोळत असत व शेतकरी वगैरे दरिद्री बाधवांची स्थिति पाहून त्याचें हृदय कळवळून येत असे. आमच्या राष्ट्रांत अशी सुधारणा झाली पाहिजे आणि आम्ही तसे हक्क मिळविले पाहिजेत, वगैरे वल्गना करणारांच्या तो अगदी विरुद्ध असून मौन स्वीकारून राष्ट्राचें हित साधणें जेवढें आपल्या हातीं आहे, तेवढें प्रथम साधावें या मताचा तो होता. दादासाहेबांचा आणि पांडुरंगाचा जरी फार बळकट स्नेह होता, तरी त्या दोघांचीं राष्ट्राच्या हितासंबंधानें मतें अगदीं भिन्न होतीं. आपल्या राष्ट्राचें जर खरें हित व्हावें असें कोणास वाटत असेल, तर त्यानें सार्वभौम सरकारकडून कायदे करण्याचे व कायद्याची अम्मल बजावणी करण्याचे हक्क प्रथम मिळविले पाहिजेत, असें दादासाहेबांचें मत होतें. हें केवळ असाध्य आहे, असें पांडुरंगास वाटत होतें, आणि म्हणून त्याला दादासाहेबांचें मत पसंत नव्हतें.

जें आपल्या हाती आहे, तें आपण प्रथम केलें पाहिजे, हें मत पांडुरंगाचें होतें व त्यासाठीं त्यानें मार्गहि आंखून ठेवला होता. आपल्या राष्ट्राचें कल्याण व्हावें, असे ज्यांना खरोखर वाटत असेल, त्यांनीं शेतकऱ्यांवर व तशाच प्रकारचे अन्य धंदे करणाऱ्यांवर प्रेम करण्यास शिकणें, हा राष्ट्रहिताचा ओनामा होय असें पांडुरंगाचें ठाम मत झालें होतें. प्रत्येक देशाची मजबुती निरनिराळ्या वर्गांवर अवलंबून आहे. हिंदुस्थानची मजबुती शेतकरी वर्गावर अवलंबून आहे. हिंदुस्थानांत शेंकडा ऐशीपेक्षां अधिक लोक शेतकरी असल्यामुळें हाच वर्ग आमच्या राष्ट्राचा पाया होय आणि हा पाया जोंपर्यंत डळमळीत आहे, तोंपर्यंत वर इमारत रचणारे अविवेकी आहेत, असें तो स्पष्ट म्हणत असे. शेती व शेतीवर अवलंबून असलेले अन्य धंदे हे केव्हांहि हिंदी जनतेच्याच हातीं असले पाहिजेत, व या धंद्यांची उन्नति होण्यासाठी प्रत्येकानें शक्य तो प्रयत्न केला पाहिजे, अशी त्याची समजूत असून त्यानें आपल्या या मताची छाप पुष्कळ तरुणांवर बसविली होती. सोमेश्वर येथें आल्यावर एकदां पांडुरंगानें यमुनेची एकांतांत गांठ घेतली. या वेळीं यमुना ऐन तारुण्यांत असून ऐश्वर्याचा उपभोग घेण्याचें तिचें वय होतें. सांपत्तिक दृष्टीनेंहि तिला कोणत्या गोष्टीचें उणें नव्हतें; परंतु नटणें आणि चैन करणें हा शरीराचा खरा संस्कार नसून गरिब बांधवांवर परोपकार करण्यासाठी परमेश्वरानें आपणास हें शरीर, मन व पैसा दिला आहे अशी तिची लहानपणापासून समजूत होती आणि ही समजूत पांडुरंग व इंदिरा या दोघांच्या सहवासानें अधिक दृढ झाली होती. तिला आपल्याजवळ घेऊन पांडुरंग म्हणाला, “ माझा विचार तुला इंदूनें कळविला का ? ”

नम्रपणें व मधुर स्वरानें यमुना म्हणाली, “ तुमचा विचार त्यांनी कळविला; पण तो विचार आपण त्यांच्याकडून कां कळविला ? स्वतः सांगण्यास भीति वाटली होय ? छेः ! आपण हें चांगलें केलें नाहीं. स्त्रीबद्दल पतीनें कोणत्याहि बाबतीत थोडा जरी संशय बाळगला तरी त्याबद्दल स्त्रीला फार वाईट वाटतें. मी तुमच्या बाहेर का आहे ? एवढ्या तरुण वयांत मला तुमचें व्रत स्वीकारतां येणार नाही, असें तुम्हांला कां वाटलें ? आणि दुसरें हें की तुमचा मार्ग कितीहि बिकट असला, तरी मला भिण्याचें कांहीं कारण नाही. कारण मला फक्त तुमच्या मागून यावयाचें आहे. इंदूवन्संनीं कितीहि मध्यस्थी केली, तरी मी तुम्हांला सोडून आतां क्षणभर देखील रहाणार नाही. माझ्याबद्दल तुम्ही कांहींतरी भलतीच समजूत करून घेऊं नका. ‘ मजमुळें यमूला ऐश्वर्यादि सुखाचा लाभ होत नाहीं ’ असें तुम्ही पुष्कळांजवळ म्हणतां; पण पतीचें सान्निध्य, पतीची सेवा, आणि पतीचा संतोष, हेंच आम्हां हिंदू स्त्रियांचें खरें

सौख्य आहे) हें तुम्ही कां विसरतां, तें मला समजत नाहीं! इंदूवन्संनीं माझा निरोप आपणास कळविला का?"

पांडुरंगाचे डोळे पाण्यानें भरून आले. तो यमूला कुरवाळून म्हणाला, "हो, तुझा निरोप कळला आणि तूं दिलेले दागिनेहि मिळाले. मी जो आश्रम काढणार आहें, त्या आश्रमाला मदत म्हणून तूं ते दिलेस असें मला समजलें; पण ते दागिने तुझे नाहीत, हें तुझ्या लक्षांत नाही वाटतें?" यमुना शांतपणें म्हणाली, "माझ्या लग्नांत अन्नपूर्णाताईनें, इंदूवन्संनीं आणि आईबापांनी मला जे कांही दागिने दिले, तेवढेच मी आपल्या स्वाधीन केले आहेत. आपण लग्नांत अंगावर घातलेले दागिने मी तसेच डब्यांत ठेविले आहेत. आपल्या आश्रमाला ते दागिने आपण घेतले, तर मला अधिक संतोष वाटेल. मणिमंगळसूत्राशिवाय अन्य अलंकार घालण्याचे हे दिवस नाहीत. आमच्या देशांतल्या शेंकडों स्त्रिया अर्धपोटी आणि उपाशी राहून कालक्रमणा करीत असतां कुलस्त्रियांनीं आभरणांनीं देह नटविणें म्हणजे जन्मभूमीशी कृतघ्न होणें होय."

यमुनेचे हे शब्द ऐकून पांडुरंगास साहजिक समाधान वाटलें. आपली गृहिणी आपल्या हेतूंच्या विरुद्ध नसून उलट आपणास आपल्या कर्तव्यांत उत्साहित करणारी आहे, हें पाहून पांडुरंगाच्या अंतःकरणांत संतोष उत्पन्न झाला. तो म्हणाला, "तूं म्हणतेस तें अगदीं खरें. श्रीमंत आणि दरिद्री हे दोन वर्ग कोणत्याहि देशांत असणारच आणि ते हिंदुस्थानांतहि असले, तर त्यांबद्दल कुरकुर करण्याचें कारण नाहीं, असें पुष्कळ म्हणतात; पण पोटास मिळविण्याचें साधन असून केवळ विपरीत परिस्थितीमुळें उपाशी मरणारा वर्ग फक्त हिंदुस्थानांतच आहे आणि म्हणून ज्यांना देशाचें हित व्हावें असें वाटत असेल त्यांनी स्वार्थत्याग आणि स्वावलंबन करून या वर्गास शक्तिमान् ठेवलें पाहिजे. जे लोक लक्षावधि खंडी धान्य पिकवितात त्यांना पोटभर भाकरी मिळूं नये आणि त्यांच्या शेतांत वाटेल तितका कापूस पिकूनहि त्यांना अंगभर वस्त्र मिळूं नये यापेक्षां देशाचें दुसरें दुर्दैव तें कोणतें? ही स्थिति पालट-ल्यावांचून हिंदुस्थानची केव्हांहि उन्नति होणार नाही. तूं दिलेले दागिने मीं तसेच ठेविले आहेत आणि तुजजवळ असलेले दुसरे दागिनेहि घेण्याचें कांहीं कारण नाहीं. मजजवळ जो नक्त पैसा आहे, त्यांत सर्व भागेल असें वाटतें. न जमल्यास पुढें कांहींतरी तजवीज करतां येईल."

"जमिनीची खरेदी झाली का?"

"होय. बहुतेक झाली. पुण्यापासून जवळच एका खेड्याला आपली थोडीशी

शेती आहे, त्या शेताच्या जवळपासची जमीन खरेदी केली आहे. एकंदर पांचशें एकर जमीन खरेदी केली आहे व तितकी पुरे असें माझ्या कांहीं मित्रांचें म्हणणें आहे. ”

“ या आश्रमाला आपण नांव काय देणार ? ”

“ शेतकऱ्यांसाठीं मोफत प्रयोगक्षेत्र” असें त्याला मीं नांव देणार आहें. नांवांत कांहीं विशेष नाहीं. या प्रयोगक्षेत्रांतल्या व्यवस्थेंत काय तो विशेष आहे. साधारण पंधरा ते वीस वर्षांच्या वयाच्या शेतकऱ्यांच्या पंचवीस मुलांना या क्षेत्रांत फुकट शिक्षण देण्याची व्यवस्था मी करणार आहें. अमेरिकेंत शेतकीचें शिक्षण संपादन करून माझे दोन स्नेही आले आहेत, त्यांच्या देखरेखीखालीं हें शिक्षण द्यावयाचें आहे. जो शेतकरी घरचा गरीब आहे आणि शेतीचाच धंदा पुढें करणार आहे, अशाच तरुण शेतकऱ्याचा प्रवेश या क्षेत्रांत होईल. या पंचवीस विद्यार्थ्यांना अन्न-वस्त्र फुकट पुरवावयाचें व याप्रमाणें पांच वर्षेंपर्यंत त्यांना शिक्षण द्यावयाचें. पांच वर्षांनंतर जो विद्यार्थी हें प्रयोगक्षेत्र सोडून जाईल, त्याला या प्रयोगक्षेत्रांत पांच वर्षें मेहनत केल्याबद्दल पांचशें रुपये रोख द्यावयाचे. पण हे रुपये घेऊन त्यानें स्वतःची शेतजमीन वाढविली पाहिजे किंवा सावकाराकडे गहाण वगैरे असल्यास ती जमीन ऋणमुक्त केली पाहिजे. येथें शेतकरी विद्यार्थ्यांना शेतीचें सर्व शिक्षण देऊन बेतापुरतें लिहिणें, वाचणें व हिशोबठिशोब शिकवावयाचें. शेतीच्या अवजारांची किरकोळ मोडतोड झाल्यास ती अवजारें नीट कशी करावयाची व जनावरांची जोपासना कशी ठेवावयाची, हेंहि त्यांना शिकवावयाचें. तसेच आपल्या शेतांत उत्पन्न झालेला माल कशा रीतीनें विकला असतां फायदा होईल, हेंहि त्यांना शिकवावयाचें. या प्रयोगक्षेत्रामुळें शेतकऱ्यावर निःसंशय उपकार होऊन मी स्थापणाऱ्या संस्थेसहि फारसे नुकसान येईल, असे वाटत नाही. माझी तर अशी समजूत आहे कीं, पुष्कळ बुद्धिवान् तरुण आपणास कांही उद्योगधंदा नाहीं, म्हणून जी कुरकुर करीत बसतात, त्यांनीं स्वतः शेतीचें शिक्षण मिळवून अशीं प्रयोगक्षेत्रें स्थापन केली, तर त्यांना चांगलीं शिकणावळ मिळून शेतकऱ्यांवरहि फार उपकार होतील. हिंदुस्थान हा शेतकऱ्यांचा देश असल्यामुळें अशा प्रयोग-शाळा प्रत्येक गांवीं निघाल्या, तरी त्या चांगल्या रीतीनें चालतील अशी माझी समजूत आहे. ”

पांडुरंगाची ही कल्पना यमुनेला फारच आवडली. ती म्हणाली, “ हिंदुस्थानांत अशा शेंकडों प्रयोगशाळा निघून जर सर्वत्र शेतकऱ्यांची स्थिति सुधारली, तर

हिंदुस्थानची अर्धी विपत्ति दूर झाली, असें म्हणावयास कांहीं हरकत नाहीं. पण शेतकऱ्यांबरोबर इतरांची स्थिति कशी सुधारेल ?"

"देशांतल्या शेंकडा ऐशीं लोकांना आपलें हितानहित कशांत आहे, हें समजावयाला लागलें म्हणजे सर्व देशाची स्थिति आपोआप सुधारेल. आपण जर देशांत उत्पन्न होणाऱ्या कापडाशिवाय अन्य कापडास शिवलोंहि नाहीं, तर आपले साळीकोष्टी व कापडाच्या गिरण्यांतून काम करणारे मजूर यांना भरपूर भाकरी मिळेल, असें या शेतकऱ्यांना एकदां समजलें, म्हणजे ते आपल्या देशावर जिवापलीकडे प्रेम करतील. परदेशांतून येणाऱ्या कोणत्याहि चैनीच्या वस्तूला स्पर्श करावयाचा नाहीं, दारू व त्यासारख्या कोणत्याहि मादक पदार्थाला शिवावयाचें नाहीं, आणि स्वदेशी कापडाशिवाय कापड वापरावयाचें नाहीं; हा निश्चय जर देशांतल्या शेंकडा ऐशीं लोकांनीं केला व त्याप्रमाणें ते वागले, तर खरोखर हिंदुस्थानचें दारिद्र्य दूर होईल."

"आपला हा विचार दादासाहेबांना पसंत पडला का ?"

"हो. प्रथम त्यांचा व माझा मतभेद होता, पण शेवटीं त्यांनीं माझें म्हणणें कबूल केलें. पैशाची मदत देण्याचें त्यांनीं कबूल केलें आहे, आणि येथें राहून पत्रद्वारेंहि ते मला सल्लामसलत देणार आहेत."

पांडुरंग व यमुना या दोघांचें याप्रमाणें बोलणें झाल्यावर पांडुरंग दुसरीकडे निघून गेला. अलीकडे त्याचा बहुतेक वेळ या संस्थेच्या योजनेंतच जात असे. सर्व तयारी झाल्यावर त्यानें इंदूचा, आईचा व दादासाहेबांचा निरोप घेतला आणि तो यमुनेसह पुण्याजवळच्या एका खेड्यांत असलेल्या आपल्या संस्थेंत येऊन दाखल झाला. हळूहळू शेतकरी विद्यार्थ्यांची संख्या पुरी होऊन त्याची प्रयोग-शाळा जेव्हां चालू झाली, तेव्हां पांडुरंगास मोठा आनंद झाला व मातृभूमीच्या उपयोगी आज आपण थोडे तरी पडलों, असें त्याच्या चित्तांत समाधान उत्पन्न झालें. एका वर्षाच्या आंत त्याची ती प्रयोग-शाळा नांवारूपास आली व महाराष्ट्रांत तो एक चर्चेचा विषय झाला. पांडुरंगाची ही संस्था पुष्कळांना आवडली व तिच्यापासून राष्ट्राचें खरोखर कल्याण होत आहे, असेंहि पुष्कळांना स्पष्ट दिसून आलें; परंतु दुःखाची गोष्ट ही कीं, अशा प्रकारच्या आणखी कांहीं संस्था काढण्याचें कोणाच्याहि मनांत येईना. यावरून एवढें मात्र सिद्ध झालें कीं, राष्ट्रांत बोलके देशभक्त पुष्कळ आहेत; पण स्वतःच्या कृतीनें देशाचें हित साधणारा एकहि नाहीं. हिंदु-

स्थानच्या दुर्भाग्याची साक्ष यापेक्षां अधिक ती कोणती ! कल्पनातरंगांत वहात जाऊन दुराराध्य साध्यासाठीं वाक्जाळ पसरविणारे देशभक्त आमच्या राष्ट्रांत सहस्रावधि आहेत; पण राष्ट्राच्या पदरांत ताबडतोब फायदा टाकणाऱ्या उपयुक्त संस्थांकडे लक्ष देणारे फारच थोडे आहेत, हें पांडुरंगाच्या या वेळीं चांगलें लक्षांत आलें.

पांडुरंग गेल्यावर दादासाहेबांना कांहीं दिवस करमलें नाहीं; परंतु इंदूचा सहवास अक्षय असल्यामुळें पांडुरंगाची गैरहजेरी त्यांना तितकी जाणवली नाही. नानासाहेबांनी कांहीएक कारण नसतां त्यांची अशी दुर्दशा केल्यामुळें त्यांना अत्यंत खेद वाटे व केव्हां केव्हां तर ते इतके चिंतामग्न होत कीं, जवळपास काय होत आहे, याचीहि त्यांना दाद नसे. अशा चमत्कारिक स्थितींत दादासाहेबांचे कांही दिवस गेले हें खरें, पण त्यांच्या वृत्तींत हळूहळू पालट होऊं लागला व झालें हें बरें झालें, असें त्यांना वाटूं लागलें. आपला कोणताहि अपराध नसतां ज्याअर्थी आपणावर ही आपत्ति आली आहे, त्याअर्थी त्यांत परमेश्वराचा कांहींतरी हेतु असला पाहिजे, असें दादासाहेबांना वाटलें आणि त्या दृष्टीनेंच त्या स्थितीचा ते विचार करूं लागले. स्वतः दादासाहेब कच्च्या दिलाचे नसल्यामुळें आणि वारंवार इंदूची सल्लामसलत मिळत असल्यामुळें या नवीन परिस्थितींत कशामुळें समाधान प्राप्त होईल, हें त्यांना सहज ठरवितां आलें. वानप्रस्थाश्रमी गृहस्थाप्रमाणें अत्यंत साधेपणानें वागावयाचें, या डोंगराळ भागांत राहणाऱ्या दरिद्री बांधवांना यथाशक्ति मदत करावयाची आणि अध्यात्मविषयाचा अभ्यास करावयाचा, असा त्यांनी संकल्प केला आणि त्याप्रमाणें ते वागूंहि लागले. इंदिरेच्या स्वभावाची जी इतका वेळ वाचकांना ओळख पटवून दिली आहे, त्यावरून अध्यात्मविषयाची इंदिरेला स्वभावतःच गोडी होती, हें वाचकांच्या लक्षांत आलेंच असेल. दादासाहेबांना त्या बाबतींत इंदिरेकडून आडकाठी न होतां उलट उत्तेजन मिळत होतें. इतकेंच नव्हे, तर त्या विषयांत तिनें अधिक ज्ञान संपादन केलेलें आहे, असे पाहून दादासाहेब आपल्या शंका इंदिरेजवळून दूर करून घेत असत. सकाळीं उठून कुशावर्तात स्नान करावयाचें, त्यानंतर बराच वेळ ध्यानधारणेंत घालवावयाचा व नंतर त्या डोंगराळ भागांत पायीं पायीं हिंडून गोरगरिबांचा समाचार घेत घेत जेवण्याच्या वेळेला घरीं यावयाचें, हा दादासाहेबांचा सकाळचा क्रम होता. दुपारीं बराच वेळ चांगल्या ग्रंथांचें वाचन करून जे कोणी दीन दरिद्री आले असतील त्यांचा परामर्ष घ्यावयाचा व सायंकाळच्या वेळीं इंदिरेसह एकाद्या रमणीय जागीं जाऊन तेथें परमेश्वरचिंतन करावयाचें हा दादासाहेबांचा दुपारचा क्रम होता. दुःखितांचें सांत्वन करावयाचें, रोग्याला औषध देऊन शुश्रूषा

करावयाची, गरिबांना अन्नवस्त्र द्यावयाचें आणि साधुसंत दृष्टीस पडल्यास त्यांची सेवा करावयाची, असा क्रम जेव्हां दादासाहेबांचा चालू झाला, तेव्हां स्वतःच्या संस्थानापेक्षांहि एकाद्या सुखमय राज्याचीं आपण सूत्रें चाळीत आहों, असें दादासाहेबांना वाटूं लागलें. आणि खरोखर जे मिथ्या जगाला सोडून सत्य ब्रह्माच्या प्राप्तीसाठीं अशा रीतीनें झटूं लागले, त्यांना सुखमय अनश्वर राज्याची प्राप्ति झाल्याप्रमाणें वाटावें, यांत आश्चर्य तें कोणतें ?

नानासाहेबांसारख्या विषारी सर्पानें त्यांना दंश केल्यापासून त्यांच्या अंतःकरणांत कांहीं तामसिक भाव साहजिक आश्रय करून राहिले होते. नानासाहेबांनीं आपणांस जो निष्कारण त्रास दिला, त्याचें नानासाहेबांना चांगलें प्रायश्चित्त द्यावें, असे विचार केव्हां केव्हां दादासाहेबांच्या मनांत येत होते; परंतु वानप्रस्थाश्रम स्वीकारून अध्यात्मविषयाचा कांहीं दिवस अभ्यास झाल्यावर अंतःकरणांतील तामसिक भाव नाहींसे होऊन तेथें सात्त्विक भाव उत्पन्न होऊं लागले आणि नानासाहेबांसारख्या शत्रूसंबंधानेंहि त्यांच्या हृदयांत दया उत्पन्न झाली. दादासाहेबांचें विषारी अंतःकरण शुद्ध करण्याचें मांत्रिकाचें काम या वेळीं इदिरेनें केलें होतें व यामुळें तिला आपण पतीची सेवा आज खरी बजाविली असें समाधान वाटत होतें. गृहिणी या लहानशा शब्दांत केवढालीं गहन तत्त्वें सांठविली आहेत, तें इदिरेसारखे असें एकादें चरित्र दृष्टीपुढें उभें राहिलें म्हणजे लक्षांत येतें. पतीचें पारमार्थिक कल्याण जी स्त्री साधते (तीच) खरी गृहिणी होय. भलत्याच शिक्षणानें गर्विष्ठ झालेल्या महिलांना गृहिणी या शब्दाची वरील व्याख्या दुस्सह वाटेल; पण त्याला कांहीं इलाज नाहीं.

## प्रकरण तेरावें

# उपसंहार

बऱ्याच लांबलेल्या या कथानकाचा निष्कर्ष आतां वाचकांच्या लक्षांत आला असेलच असें जाणून हें लांबलेलें कथानक या प्रकरणांत संपविण्याचें आम्हीं ठरविलें आहे पांडुरंगानें स्थापन केलेल्या प्रयोग-शाळेस आतां तीन वर्षें होऊन गेलीं होतीं व हातं घेतलेलें कार्य खरोखरच लोकोपकारक आहे, असें त्याच्या प्रत्यक्ष दृष्टोत्पत्तीस आल्यामुळें त्याची वृत्तीहि समाधानी होत चालली होती. त्याच्या प्रयोग-शाळेचें महत्त्व लक्षांत आल्यामुळें त्याची सर्वत्र प्रशंसा होत होती; परंतु त्या प्रशंसेमुळें खोट

अभिमान असा त्याच्या चित्ताला शिवला देखील नाहीं. मी आपलें कर्तव्य बजावीत आहें आणि कर्तव्य बजावणें यांत प्रशंसेसारखें कांहींच नाहीं, उलट मीं आपलें कर्तव्य न बजाविल्यास मी निंदेला मात्र पात्र होईन, असें तो म्हणत असे. तीन वर्षें बाहेर काढल्यावर एकदां दादासाहेबांची गांठ घ्यावी असें त्याला वाटलें व तो यमुनेसह सोमेश्वर येथें गेला.

असो. सोमेश्वर येथें आल्यावर दादासाहेबांची पालटलेली स्थिति जेव्हां पांडुरंगाच्या लक्षांत आली, तेव्हां पांडुरंगास मोठें आश्चर्य वाटलें. दादासाहेबांच्या वृत्तींत इतकें विलक्षण स्थित्यंतर दृष्टीस पडेल अशी त्याची कल्पना नव्हती; परंतु प्रत्यक्ष दादासाहेबांना पाहिल्यावर आपणास एकाद्या महात्म्याचेंच दर्शन झालें, अशी पांडुरंगाची समजूत झाली. पांडुरंगाचे सोमेश्वर येथें दोन दिवस गेल्यावर त्यानें पूर्वीप्रमाणें दादासाहेबांशीं वादविवाद करण्यास आरंभ केला; कोणत्याहि वादाचें स्वरूप दादासाहेब मोठ्या युक्तीनें अध्यात्मविषयांत पालटीत व मग मात्र पांडुरंग निरुत्तर होत असे. तो एकदां दादासाहेबांना म्हणाला, "दादासाहेब, तुमचें पूर्वींचें असें म्हणणें होतें कीं, हिंदी जनतेला कायदे करण्याचा आणि कायद्याची बजावणी करण्याचा हक्क साम्राज्य सरकारकडून मिळविल्यावांचून हिंदुस्थानचें खरें कल्याण होणार नाहीं. म्हणजे साम्राज्याकडून जेव्हां हिंदुस्थानला स्वराज्य मिळेल, तेव्हांच देशाचें खरें कल्याण होईल असें तुमचें मत होतें. हें मत अद्याप कायम आहे का ? माझा विश्वास स्वराज्यापेक्षां स्वावलंबनावर अधिक आहे व त्यापासून हिंदुस्थानचें कितपत कल्याण होईल, याची साक्ष माझें प्रयोग-क्षेत्र केव्हांहि देण्यास तयार आहे."

या प्रश्नाचें उत्तर दादासाहेबांनीं पूर्वीप्रमाणें घाईनें व जोरानें दिलें नाहीं. ते शांतपणें व गंभीर स्वरानें म्हणाले, "पांडुरंगराव, मला आतां या भानगडीशी कांहीं कर्तव्य नाहीं. अहो, त्या परमेश्वरानें साऱ्या विश्वाचें साम्राज्य दिल्यावर, हें लहानसें स्वराज्य आतां कशाला पाहिजे ! तथापि तुम्ही विचारितां म्हणून सांगतों कीं, माझें तें पूर्वींचें मत ध्रुवाप्रमाणें ठाम आहे. इतिहासाचें चांगल्या रीतीनें तुम्हीं जर अध्ययन केलें, तर तुम्हांला हें कळून येईल कीं, कायदे करणें आणि कायद्यांची अम्मलबजावणी करणें, हे हक्क जनतेला असल्यावांचून कोणत्याहि देशाचें कल्याण झालेलें नाहीं. हिंदुस्थानालाहि हेच हक्क मिळाले पाहिजेत. तुम्हीं काढलेली संस्था फार चांगली आहे, हें कोणीहि कबूल करील; पण कल्पना करा कीं, उद्यां जर 'अशा संस्था काढूं नयेत' असा कायदा झाला, तर या संस्थेचें महत्त्व कोठें राहिलें ? तेंच

आतां उलट पहा कीं, जर हिंदी जनतेला कायदे करण्याचा हक्क मिळाला, तर 'असल्या संस्था प्रत्येक तालुकानिहाय असल्या पाहिजेत' अशा प्रकारचा ती कायदा करील. यावरून माझें म्हणणें किती यथार्थ आहे, हें तुम्हांस कळून येईल. माझें हें मत जरी ठाम असलें, तरी स्वराज्यप्राप्तीचा माझा मार्ग मात्र बदलला, हें मी कबूल करतों. हिंदुस्थानच्या सद्यःस्थितीचें सूक्ष्म अवलोकन केल्यास आम्ही आतां अगदीं स्तब्ध राहिलें पाहिजे आणि हें स्वराज्य आम्हीं परमेश्वराजवळ मागितलें पाहिजे, अशी माझी आतां समजूत झाली आहे. जो करुणामय परमेश्वर साम्राज्यें देतो, तो हिंदुस्थानला लहानशा स्वराज्याचे हक्क सहज देईल; पण हें सर्व आत्मविश्वास आणि स्वावलंबन यांवर अवलंबून आहे. त्या दयाघनावर बळकट विश्वास टाकून त्याचीच करुणा भाका आणि स्तब्ध रहा. पांडुरंगराव, स्तब्ध राहणें हें तुम्हांस सोपे वाटत असेल; पण तसें समजू नका. स्तब्धता हा एक योग आहे, आणि तो फार कठीण आहे. हिंदुस्थाननें खरी स्तब्धता स्वीकारून एक आठ दिवस परमेश्वर-चिंतनांत घाल-विले, तरी सर्व जगाचे डोळे हिंदुस्थानाकडे लागतील. मग त्या दयाघनाच्या चिंतनांत कांही दिवस घालविल्यावर तो हिंदी जनतेला कां प्रसन्न होणार नाहीं? आमची परमेश्वरावर दृढ भावना नाहीं, हेंच आमच्या अधोगतीचें कारण होय. ही अधोगती टाळावयाची असेल, तर त्याचीच करुणा भाकली पाहिजे. जो दयाघन सर्व विश्वाचा संसार चालवितो, तो आमच्या या टीचभर हिंदुस्थानची उपेक्षा करील, असें कोणींहि मनांत आणूं नये. या कार्यासाठीं विशेष साहित्याचीहि गरज नाहीं. ईश्वरावर अढळ श्रद्धा, आत्मविश्वास आणि स्वावलंबन, इतकीं साधनें असलीं, म्हणजे त्या भगवंतास आमची दया आल्यावांचून राहणार नाहीं."

दादासाहेबांचे हे अगदींच नवे विचार ऐकून पांडुरंगास मोठें आश्चर्य वाटलें. एवढालीं उदात्त तत्त्वें दादासाहेबांकडून ऐकावयाला मिळतील, अशी त्याची कल्पना नव्हती; परंतु तीं ऐकावयाला मिळालीं एवढेंच काय, पण तीं तत्त्वें प्रत्यक्ष दादासाहे-बांच्या आचरणांत आहेत, हें पाहून पांडुरंगास जितका विस्मय वाटला, तितकीच त्याच्या अंतःकरणांत दादासाहेबांविषयीं पूज्यबुद्धीहि उत्पन्न झाली. खऱ्या साधूप्रमाणें दादासाहेबांची साधी व प्रेमळ वागणूक पाहून पांडुरंगाची अशी खात्री झाली की, संसाराचे पाश तोडण्याची दादासाहेबांच्या अंगीं शक्ति आली असून त्याप्रमाणें ते एकसारखे पुढें चालले आहेत. इंदूची स्थितीहि तशाच प्रकारची त्याच्या दृष्टोत्पत्तीस आली. दोघांची अशी आध्यात्मिक उन्नति पाहून पांडुरंगास वाईट न वाटतां समाधा-नच वाटलें, हें निराळें सांगावयाला नको.

पांडुरंग सोमेश्वर येथें आल्यावर तीन चार दिवसांच्या आंत तेथें दिनकरहि अन्नपूर्णेसह येऊन पोहोंचला. पांडुरंगानें स्थापन केलेली संस्था त्यानें प्रत्यक्षच पाहिली होती; पण दादासाहेबांविषयीं त्याला चांगलीशी कल्पना नव्हती. ते आपला बहुतेक वेळ ध्यान-धारणेंत घालवितात, एवढें त्याला समजलें होतें; पण तेवढ्यावरून दादासाहेब आपणास अगदीच निराळे दृष्टीस पडतील अशी त्याची कल्पना नव्हती. सोमेश्वर येथें आल्यावर त्यानें जेव्हां दादासाहेबांना पाहिलें, तेव्हां हे एक विजयगडचे तरुण श्रीमान् गृहस्थ आहेत, असे दिनकरला न वाटतां एका तरुण योग्याचें आपणास दर्शन होत आहे, असेंच त्याला वाटलें. नानासाहेबांनीं त्यांच्यावर आणलेल्या आपत्तीसंबंधानें दादासाहेबांच्या चेहऱ्यावर आज विषादाची किंवा खेदाची एकादी पुसटशी रेषाहि दिसत नाहीं, हें पाहून दिनकरचें हृदय विस्मयानें दाटून आलें. बालपणापासूनचे तिघेहि स्नेही आणि तिघीहि मैत्रिणी आज तीन वर्षांनीं एकत्र जमल्यामुळें त्या सर्वांना साहजिक मोठा आनंद झाला. त्या सर्वांचा येथें एकेक दिवस इतक्या सुखानें चालला होता, कीं सूर्य उगवतो केव्हां आणि मावळतो केव्हां याचें देखील त्याना भान रहात नसे.

"बहुतेक ठिकाणीं असें आढळून येतें की, चार स्नेही एकत्र झाले, म्हणजे आपापल्या स्थितीचे गोडवे अथवा रडगाणी त्यांच्यांत सुरू होतात. सार्वत्रिक हितानहिताची गोष्ट तेथें बहुधा निघावयाची नाही. ही स्थिति साधारण शिकलेल्या गृहस्थांचीच असते असें नाहीं, तर ज्यांना आपण मोठे विद्वान् आहों असें वाटतें, त्यांच्यांत देखील हीच स्थिति दृष्टोत्पत्तीस येते. आपल्या स्वतःच्या संसाराला ते इतके चिकटलेले असतात कीं, अशा गृहस्थांना पाहिल्याबरोबर घाणींतल्या किड्यांची आठवण होते. एकाद्या दयाळू गृहस्थाला शेणांतल्या किड्याची दया आली आणि त्यानें तो किडा तेथून काढून चांगल्या दुर्वांकुरांवर ठेवला, तर तेथें त्याला गोड वाटणार नाहीं. तो पुन्हां धडपड करून घाण शोधील आणि त्यांत जाऊन बसेल. अशा लोकांच्या गोष्टीहि संसारासंबंधाच्याच असणें हें स्वाभाविक आहे. फार झालें, तर त्यांच्यांत आपापल्या कचेरीच्या गप्पा सुरू व्हावयाच्या आणि मग माझा साहेब असा आहे, साहेबाची गाडी अशी आहे, साहेब असें असें बोलतो, वगैरे गोष्टी ऐकूं यावयाच्या. यापेक्षां अधिक कांहीं तरी कर्तव्य बजाविण्यासाठीं परमेश्वरानें आपणास मनुष्य-जन्म दिला आहे ही कल्पना त्या बिचाऱ्यांना कधीं शिवत देखील नाहीं. खावें, प्यावें आणि मजा करावी, संसार करावा, पैसा मिळवावा, फार झालें तर स्वतःच्या मुलांना विश्वविद्यालयीन शिक्षण द्यावें; म्हणजे आपली इतिकर्तव्यता

संपली, असेंच बहुतेकांना वाटत असतें. राष्ट्र, समाज आणि आत्मा यांविषयींचीं कांहीं ऋणें आपणावर आहेत आणि तीं ऋणें सव्याज फेडल्यावांचून आपणास आपली अधोगति टाळतां यावयाची नाहीं; ही गोष्ट व्यासपीठावरून जगाला शहाणपणा शिकविणाऱ्यांच्याहि लक्षांत आलेली दिसली नाहीं, यावरून 'हिंदुस्थानाला अक्षय सुप्तावस्था असो' असा कोणी शाप दिला आहे कीं काय, अशी भीति वाटते. महाराष्ट्रांत पगाराचीं ओझींच्या ओझीं मिळविणारीं जीं माणसें होऊन गेलीं, त्यांनीं आपल्या राष्ट्राच्या हितासाठीं अमूक एक गोष्ट केली आहे, असें कोठेंहि दिसत नाहीं. खालच्या वर्गाच्या दारिद्र्याची गोष्ट निघाली, म्हणजे क्वचित् सहभोजनाचा प्रतिध्वनि ऐकूं येतो; परंतु यांत राष्ट्राच्या हिताचा वास कोठेंच येत नाहीं. एकाद्या चांभाराला आपल्या शेजारीं जेवावयाला बसवून मोठें शतकृत्य मानण्याचें खरोखर कांहीं कारण नाहीं. उलट स्वाभिमानी चांभार यामुळें आपला अपमान झाला, असें मात्र मानील. सहानुभूति बाळगावयाची तर सर्व चांभार-जातीविषयीं बाळगा. तुम्ही घरीं असें चमचमीत जेवतां, तसें जेवण चांभारांना प्रत्यहीं मिळावें म्हणून या समाज-सुधारकांनीं काय खटपट केली आहे? एकीकडे चांभाराला शेजारीं जेवावयाला बसवावयाचें आणि दुसरीकडे पधरा रुपयांचा परदेशी बूट घेऊन चांभाराच्या पोटाला चिमटा घ्यावयाचा, हा न्याय कोठला? धिक्कार असो असल्या सहभोजनाला. चांभाराविषयीं जर खरी कळकळ असेल, तर हिंदुस्थानांतल्या प्रत्येकानें हिंदी चांभाराजवळूनच सर्व प्रकारचें कातड्याचें सामान घेतलें पाहिजे, असा स्वतः निश्चय करा आणि तो इतरांनाहि पाळावयाला लावा. हिंदुस्थानानें हें व्रत निग्रहानें पाळलें, तर आमच्या चांभारांना पोटभर भाकरी दररोज मिळेल, हें सांगावयाला कोणी ज्योतिषी नको. हाच न्याय साळी, कोष्टी, सुतार, लोहार, गिरण्यांतले मजूर वगैरे सर्व जातींसंबंधानेंहि लागू होण्यासारखा आहे. आमच्या समाजाची सुधारणा अशा रीतीनें व्हावयाला पाहिजे; पण दुर्दैव आमच्या मातृभूमीचें कीं तिचे पुत्र या खऱ्या सुधारणा न करतां समाजांत निष्कारण ढवळाढवळ मात्र करीत आहेत. पण मीं यांना मातृभूमीचे पुत्र म्हणण्यांत चूक केली! हे तर कुऱ्हाडीच्या दांड्याप्रमाणें आत्मघातास प्रवृत्त झाले आहेत!! आर्यभू, तुझ्या उदरांत काय दादासाहेब आणि पांडुरंग एवढीं दोनच रत्नें आहेत? तसें असेल, तर या विशाल देशाला त्यांचा किती उपयोग होणार? हिंदभू, अशी निर्दय होऊं नकोस. तुझ्या उदरांत असतील तितकीं रत्नें या वेळीं बाहेर टाक आणि त्यांच्याकडून तुझी सेवा करून घे."

वर दिलेले विचार दिनकरचे होत. सोमेश्वर येथें आल्यावर जेव्हां दादासाहेब आणि पांडुरंग यांचें चारित्र्य त्याच्या दृष्टीस पडलें, तेव्हां एके रात्रीं अंथरुणावर पडून विचार करीत असतां त्याच्या अंतःकरणांत वरील विचार आले आणि तो स्वतःचाच धिक्कार करूं लागला. सामर्थ्य असून आपण यांच्याप्रमाणें स्वदेशाच्या उपयोगी यत्किंचितहि पडलों नाहीं, याबद्दल त्याचें मन त्याला खाऊं लागलें आणि आपल्या हातीं कोणतें कार्य घ्यावें, याचा तो विचार करूं लागला. हिंदुस्थानचा मुख्य धंदा शेती हाच होय; पण हिंदुस्थानचा हा धंदा खालावल्यामुळें सर्व हिंदुस्थान दरिद्री झाला आहे, असें त्याच्या लक्षांत आलें आणि त्यानें पांडुरंगास सहाय्य करण्याचें ठरविलें. सध्यां अमेरिकेंत शेतीचा धंदा अत्यंत उन्नतीस पोहोंचला असून त्या धंद्याचें शिक्षण हिंदी विद्यार्थ्यांना देण्यासंबंधानें अमिरिकेनें इतर अनुदार राष्ट्रांसारखा कृपणपणाहि स्वीकारलेला नाहीं, हें पाहून दिनकरनें आणखी सात आठ सहाध्यायी गोळा करून अमेरिकेंत जाण्याचें ठरविलें. परत आल्यावर पांडुरंगाच्या संस्थेंत शिरूं, नाहीतर स्वतंत्र संस्थाहि काढतां येईल, असा विचार करून दिनकरनें दुसऱ्या दिवशीं आपला तो बेत पांडुरंग व दादासाहेब यांना सांगितला. दिनकरसारखा श्रीमंत व सदुद्यमशील तरुण या व्यवसायांत पडूं इच्छित आहे, हें पाहून त्या दोघांनाहि आनंद झाला व त्यांनीं मोठ्या संतोषानें दिनकरला उत्तेजन दिलें.

ही सर्व मंडळी एकत्र झाल्यावर एके दिवशीं सोमगडावर जाण्याचा बेत झाला व त्याप्रमाणें पहांटे उठून ते सर्व मोठ्या उत्साहानें सोमगडावर गेले. तेथें आपणास गुरुमहाराजांचें दर्शन होईल, अशी कोणाचीच समजूत नव्हती; परंतु गुहेंत गेल्यावर गुरुमहाराज व त्यांच्या समोर तापसी वेषानें बसलेली शारदा या दोघांना पाहून त्या सर्वांना किती आनंद झाला असेल याची कल्पनाच केली पाहिजे. विशेषतः शारदेनें आपली सर्व हकीकत सांगितल्यावर त्या सगळ्यांच्या अंतःकरणांत जें प्रेम दाटून आलें, तें शब्दांनीं सांगणें अशक्य होय. गुरुमहाराज हंसत हंसत म्हणाले, "पांडुरंग, मी इंदूच्या लग्नाच्या आधीं तुझ्या घरीं आलों होतों, त्या वेळीं 'सर्वांच्या भेटी सोमगडावर होतील' असें म्हणालों होतों, तें तुला आठवत असेलच!" पांडुरंग संतोष दर्शवून म्हणाला, "होय महाराज. आम्ही ही आपली कृपाच समजतों." नंतर महाराज दादासाहेबांना म्हणाले, "दादासाहेब, आपणास संस्थानचें आधिपत्य पाहिजे असल्यास, चला. तें मी आपणास मिळवून देतों." दादासाहेब विनयानें म्हणाले, "नको. आपले चरण हेंच आतां विश्वसाम्राज्य. तें सोडून कोठेंहि जाण्याची इच्छा होत नाहीं." गुरुमहाराज यावर गंभीर वाणीनें म्हणाले, "तुम्ही त्रिवर्गांनीं

जो आत्मत्याग आपल्या मातृभूमीसाठीं केला तसला आत्मत्याग हें ब्राम्हणांचें आद्य कर्तव्य होय आणि मातृभूमीला असल्या आत्मत्यागी पुत्रांचीच आतां आवश्यकता असल्यामुळें आपण सर्व त्या परमेश्वराजवळ हेंच मागणें मागूं कीं, देवा! आर्यमातांच्या कुशींतून हिंदभूला अशा लक्षावधी आत्मत्यागी सुपुत्रांचा लाभ होऊं दे!"